# फॅनी हिल,

## अर्थात

# एका वारांगनेची स्मृतिचित्रे

मूळ इंग्रजी कादंबरी:

Memoirs of a Woman of Pleasure
by
John Cleland

(प्रथमावृत्ती: लंडन, १७४८-४९)

मराठी भाषांतर:

जयदीप चिपलकट्टी

भाषांतरासाठी मी पुढील आवृत्ती वापरली आहे:

Memoirs of a Woman of Pleasure, by John Cleland. Edited with an Introduction and Notes by Peter Sabor. Oxford World's Classics, Oxford University Press, 1985.

मूळ इंग्रजी कादंबरीची प्रथमावृत्ती दोन भागांत प्रकाशित झाली. त्यांतला volume I हा १७४८ च्या नोव्हेंबरमध्ये, आणि volume II हा १७४९ च्या फेब्रुवारीमध्ये, फेन्टन ग्रिफिथ्स ह्या लंडनमधल्या प्रकाशकाने छापून विक्रीला आणला. त्यामागचा इतिहास, नंतरच्या आवृत्त्या, ह्या कादंबरीवर लिहिले गेलेले समीक्षाग्रंथ, आणि जॉन क्लीलंडचा जीवनक्रम इत्यादि विषयांवर पीटर सेबर यांनी त्यांच्या पुस्तकात अधिक माहिती दिलेली आहे. त्यांनी दिलेल्या निर्वाळ्याप्रमाणे (किता, पान xxvii), मुद्रणदोष काढून टाकणे, जुन्या पद्धतीचा ſ बदलून त्याचा s करणे, इत्यादि किरकोळ दुरुस्त्या वगळता त्यांनी संपादित केलेल्या आवृत्तीत आणि पहिल्या आवृत्तीत कोणतेही फरक नाहीत. कादंबरी 'Fanny Hill' ह्या नावाने जास्त प्रसिद्ध आहे, आणि इंटरनेटवर ती अनेक ठिकाणी आहे.

मूळ कादंबरीचे volumes I and II हे इथे 'पत्र पहिले' आणि 'पत्र दुसरे' ह्या शीर्षकांखाली आलेले आहेत. प्रत्येक पत्राचे केलेले पाच भाग प्रथमावृत्तीत जरी नसले तरीसुद्धा अनेक आधुनिक आवृत्त्यांत आढळतात, आणि मीही ते तसेच ठेवलेले आहेत. भाषांतराचे काम चालू असताना मला आलेल्या शंकांचे यथाशक्ति निरसन केल्याबद्दल मिशेल फोबेर आणि पीटर सेबर यांचा मी आभारी आहे.

– जयदीप चिपलकट्टी

❊

# अनुक्रमणिका

## पत्र पहिले



## पत्र दुसरे

# पत्र पहिले

## भाग पहिला

मदाम,
तुमच्या इच्छेला मी अनुल्लंघनीय आज्ञा समजते, याचा बिनतोड पुरावा देण्याकरिता मी आज लिहायला बसले आहे.

ज्यांच्याशी कुप्रतिष्ठा निगडित आहे, असे जे टप्पे माझ्या आयुष्यक्रमात आले; परंतु कालांतराने त्यांतून बाहेर पडून, आरोग्य, संपत्ती व स्नेह ह्या त्रयीला जी वरदाने देणे शक्य आहे त्या सर्वांचा मी उपभोग घेतला; आणि याचबरोबर, पैशाच्या सुबत्तेने व बिनकष्टाच्या दैनंदिनीने उपलब्ध करून दिलेल्या सवडीचा उपयोग करण्याची संधी तारुण्याचा तजेला अजूनही टिकून असल्यामुळे टळून गेलेली नाही, अशा परिस्थितीत मूळची टाकाऊ नसलेली माझी समज आणखी वाढवू शकले; ते सारे स्मृतीसमोर बोलावून तुम्हाला दाखवीत जाण्याचं काम अप्रिय असलं तरीदेखील मी करणार आहे. अनिर्बद्ध सुखभोगांच्या वावटळीत भिरभिरत असतानाही माझी ही समज जगरहाटीचं जितकं निरीक्षण करून गेली, तितक्या प्रमाणात माझ्या हतभागी पेशातल्या इतरांनी ते केलेलं सरसकट पाहण्यात येत नाही, कारण विचारीपणा हा आपला कट्टर शत्रू आहे असं समजून त्याला त्या एकतर शक्य तितका लांब तरी ठेवतात, किंवा दयामाया न दाखविता स्वत:मधून उखडून तरी काढतात.

पाल्हाळिक आणि गैरलागू प्रस्तावनांचा मला आत्यंतिक तिटकारा असल्यामुळे आता मी तुमच्यावर तेवढी मेहेरबानी करत्ये; आणि जितक्या निरंकुशपणे मी तो जगले तितक्याच निरंकुशपणे लिहून काढलेला माझ्या जीवनातला हा बेबंद कालखंड पाहण्यासाठी तुमची पूर्वतयारी करण्याव्यतिरिक्त अवांतर स्पष्टीकरणे देत बसत नाही. सत्य, नागडं ढळढळीत सत्य, हा माझा परवलीचा शब्द आहे; आणि त्यावर झिरझिरीत कापडाची चिंधोटी लावण्याचीही तसदी न घेता, किंवा शिष्टाचारांचे जे नियम माझ्यासारख्या नि:संकोच स्वभावांसाठी बनवलेलेच नव्हते त्यांचीही विशेष पत्रास न ठेवता, कोणताही प्रसंग प्रत्यक्षात माझ्यासमोर जसा आला तसाच मी तो रंगवीन; आणि तुम्ही इतक्या शहाण्यासुरत्या आहात, **वास्तवाला** इतक्या पुरेपूर ओळखून आहात, की औचित्यभंगाचं अवडंबर माजवून आणि आपल्या सहजस्वभावाच्या विरुद्ध जाऊन **वास्तवाच्या चित्रांना** नाकं मुरडणाऱ्यांत

तुमची गणना होणार नाही. ज्यांची अभिरुची पक्की आणि परिपक्व आहे, असे बड्यांतले बडे महाभागदेखील आपल्या घरांतले खाजगी कोनाडे नग्नचित्रांनी सजवायला संकोचत नाहीत; मग भले हलकट लोकापवादाची बूज राखण्याकरिता म्हणून, जिन्यांत किंवा दिवाणखान्यांत ती शोभेसाठी लावणं कदाचित ते प्रशस्त मानत नसतीलही.

यापेक्षा अधिक पूर्वपीठिकेची गरज नसल्यामुळे आता मी थेट माझ्या वैयक्तिक इतिहासात शिरत्ये. माझं पाळण्यातलं नाव फ्रान्सिस हिल. लँकेशायरमध्ये, लिव्हरपूलजवळच्या एका लहानशा खेड्यात माझा जन्म झाला; माझे आईवडिल अतिशय गरीब होते, आणि माझा असा गाढा विश्वास आहे की अतिशय सदाचारी होते. वडिलांचा पाय अपघातात अधू झाला असल्याकारणाने, पोट जाळण्याकरिता खेड्यांपाड्यांत जी एकसुरी, कंटाळवाणी कामं असतात, त्यांपैकी विशेष काबाडकष्टाची असतील ती त्यांना करता येत नसत; आणि मासे पकडण्याची जाळी विणून जी तुटपुंजी मिळकत ते घरी आणीत, त्यात आईने आसपासच्या मुलींसाठी चालविलेली छोटीशी शाळा फारशी भर घालीत नसे. त्यांना अनेक मुलं झाली, पण माझ्याखेरीज कोणी वाचलं नाही; आणि निसर्गानेच मला खणखणीत शरीरप्रकृती दिलेली असल्यामुळे मी तेवढी मोठी होऊन वयात आले.

चौदा वर्षांची होईपर्यंत मला जे काही शिक्षण मिळालं, त्याला अतिशय रद्दी यापेक्षा बरं म्हणवत नाही; एकेक अक्षर लावीत वाचता येणं, इतरांना वाचता येणार नाही असं गिचमिड लिहिता येणं, आणि थोडंफार शिवणटिपण एवढाच काय तो त्याचा आवाका होता; आणि ज्या कोवळ्या वयात बाकी कशाहीपेक्षा एखादी गोष्ट नवीन असल्यामुळे तिचा बाऊ वाटतो किंवा भीती वाटते, त्या वयातला माझ्या नीतिमत्तेचा अख्खा पाया, अनीतीबद्दल थोडीही माहिती नसणं व आपल्या स्त्रीजातीत सरसकट आढळणारा बुजरा घाबरटपणा यापलिकडे विस्तारलेला नव्हता. पण पुरुष हा मला खायला उठलेलं जनावर आहे अशा दृष्टीने तरुण मुलगी त्याच्याकडे पाहायची जेव्हा हळूहळू थांबते, तेव्हा निरागसपणाची किंमत देऊन ही भीती गेलेली आहे असं फार वेळा घडतं. माझ्या बिचाऱ्या आईचा सगळा वेळ तिच्या विद्यार्थिनी आणि घरकामाच्या कटकटी यांतच जात असल्यामुळे माझ्या शिकवणीकरिता त्यातला फारच थोडा शिल्लक राहात असे; आणि तिला स्वत:ला कसल्याच अनिष्टाची जाणीव नसल्याकारणाने, माझं त्यापासून रक्षण करायला हवं असा पुसटसाही विचार कधी शिवला नाही.

आता मी वयाच्या पंधराव्या वर्षात शिरत असताना माझ्यावर कोसळलेलं अरिष्ट असं की माझे लाडके आईबाबा एकमेकांपासून काही दिवसांतच देवीच्या रोगाने निवर्तले; म्हणजे वडिल आधी गेले आणि

त्यामुळे आईचा मृत्यू जवळ आला; त्यातदेखील माझे वडिल मूळचे केंटमधले असून योगायोगाने आमच्या गावी स्थलांतरित झालेले असल्यामुळे, कोणी स्नेहाचं नाही की कोणी काळजी करणारं नाही अशी माझी दशा झाली. ज्या भयंकर व्याधीमुळे त्यांचा बळी गेला तिची लागण मलाही झाली होती, पण माझ्यात उद्भवलेली लक्षणं फार मवाळ असून त्यांतून मी लगेचच उठले, आणि ज्या गोष्टीचं मोल तेव्हा मला कळलं नव्हतं ती अशी की अंगावर काहीही व्रण उरले नाहीत.

या करुण प्रसंगी साहजिक मला जे दु:खक्लेश झाले, त्यांचं वर्णन गाळून पुढे जात्ये. माझी ही जी कायमची हानी झालेली होती तिच्यासंबंधाने माझ्या काळज्या, थोडेफार दिवस लोटताच माझ्यातल्या तारुण्यसुलभ फुलपाखरी वृत्तीमुळे (काहीशा लवकरच) उडून गेल्या; आणि ज्या घटनेमुळे तिची बोच कमी होण्यात दुसऱ्या कशाहीपेक्षा जास्त मदत झाली ती अशी: एस्थर डेव्हिस नावाच्या मूळच्या तिथल्याच, पण आता लंडनमध्ये असलेल्या, मैत्रिणींना भेटण्यासाठी गावात सध्या तात्पुरत्या येऊन लवकरच परत जाण्याचा बेत असलेल्या तरुण मुलीने, लंडनला जाऊन तिथे चाकरी पाहण्याची कल्पना ताबडतोब माझ्या डोक्यात घुसवली, आणि ह्या कामी मला सर्व प्रकारची मदत व सल्लामसलत देऊ केली. माझं तिथे कसं होईल याबद्दलच्या विशेष काळजीपोटी ह्या योजनेला मोडता घालील अशी कोणीही व्यक्ती त्या वेळेपर्यंत गावात जिवंत राहिलेली नसल्यामुळे, आणि माझ्या आईवडिलांच्या मृत्यूनंतर माझा सांभाळ करणाऱ्या बाईकडून तिला उलट प्रोत्साहनच मिळाल्यामुळे, लंडनमध्ये दाखल होऊन, विशाल जगात पदार्पण करून, आपलं 'नशीब काढण्याचा' मी निश्चय केला. (ह्या शब्दप्रयोगाने गावांतल्या जितक्या हरहुन्नरी तरुणतरुणींचं भलं केलेलं आहे, त्यापेक्षा कितीतरी अधिकांचं वाटोळं केलेलं आहे, हे जाताजाता नमूद करत्ये.)

एस्थर डेव्हिसच्या राहणीचा आवाका जितपत होता, त्यात मावणाऱ्या लंडनमधल्या सरसकट सगळ्या मनोरंजनांनी – म्हणजे उदाहरणार्थ, वेस्टमिन्स्टर ॲबीमध्ये असलेली बड्या लोकांची थडगी, टॉवरमधले दगडी सिंह, राजा आणि राजघराण्यातली माणसं, मस्तपैकी नाटकं आणि ऑपेरे, अशा सगळ्या छानछान दृश्यांनी – तिने माझं बालिश कुतूहल चाळवल्यामुळे तिच्याबरोबर जाण्याकरिता माझी उत्कंठा वाढण्यास झालेली मदत थोडीथोडकी नव्हती; आणि ही असली सारी वर्णनं ऐकून माझं डोकं पुरतं सैरभैर होऊन गेलं. भरड सदरे व स्वस्तातल्या सुती गाउन्सच्या पलीकडे ज्यांचे चर्चला जाताना घालायचे कपडे कधी गेले नाहीत, अशा आम्हा गरीब मुलींना एस्थरचे सॅटिन गाउन्स, इंचभर लेसची झालर लावलेल्या टोप्या, भडक रंगाच्या रिबनी, चंदेरी रंगाच्या नाड्या असलेले बूट, असा सरंजाम बघून किती निरागस कौतुक वाटत असे (अर्थात यात चवीपुरती असूया नव्हती असं नाही), ते आठवून आता हसू आल्याखेरीज राहात नाही; ह्या साऱ्या चीजांचं पीक लंडनमध्ये येतं असं

आम्हाला वाटे, आणि मलापण त्यांचा वाटा मिळायला हवा असा माझा निर्धार होण्यात ह्या कौतुकाच्या भावनेची पुष्कळच चिथावणी होती.

ते काही असलं, तरी मी लंडनचा प्रवास करायचा तर तिथल्या माहितगार बाईची मला सोबत असावी हे किरकोळ कारण एस्थरला माझा ताबा घेण्यासाठी पुरेसं होतं, आणि तिच्या पद्धतीने व तिच्या धाटणीत ती मला म्हणाली, "गावातल्या बऱ्याच पोरींनी आपापली आणि आपापल्या भाईबंदांची कायमची सोय करून घेतलेली आहे: आधीपासूनच स्वत:चा पडदा सांभाळून ठेवून, नंतर आपल्या मालकाशी संधान बांधून त्यांच्याशी लग्न केलेलं आहे, मग त्यांना घोडागाड्या मिळाल्या, वाटेल तशा चैनीत मजेत राहतात, त्यातल्या काही डचेसपण होतात – सगळं नशीबावर आहे, त्यांचं होतं तर तुझं का नाही होणार?" इत्यादि बरीच भविष्यवाणी ह्या विषयावर वर्तवल्यानंतर, त्या आशादायी प्रवासावर निघायला मी एका पायावर तयार झाले; कारण जे खरंतर माझं जन्मगाव, पण सोडून गेलं तर वाईट वाटावं असे कोणी नात्याचं तिथे राहिलं नसल्यामुळे, आणि आधी फुलासारखी वाढवले गेल्यानंतर, ज्या एकुलत्या ओळखीच्या घराकडून मला मदतीची व आसऱ्याची थोडीफार अपेक्षा होती तिथेदेखील कोरड्या दानधर्मावर जगण्याची पाळी आल्यामुळे, ते आता मला अगदी नकोसं वाटू लागलं होतं.

पण तरीदेखील सगळी देणी व दफनाचा खर्च भागवून झाल्यानंतर ज्या काही फुटकळ वस्तू शिल्लक राहिल्या, त्यांचे पैसे करण्यात एस्थरने माझी मदत केली हे खरं; आणि निघताना माझी जी सर्व मालमत्ता तिने माझ्या हाती ठेवली, तिची गोळाबेरीज अशी: नेआण करायला सुटसुटीत अशा पेटीत बसवलेले अगदी मोजके कपडे, शिवाय एका स्प्रिंगच्या कशात ठेवलेली, आठ गिन्न्या अधिक चांदीच्या नाण्यांत सतरा शिलिंग इतकी मी पूर्वी केव्हाही एकत्र न पाहिलेली गडगंज संपत्ती. ही कधीकाळी संपून जाईल अशी शक्यताही माझ्या कल्पनेपलीकडे होती; आणि इतक्या अवाढव्य पुंजीची मालकीण असल्याच्या आनंदात मी इतकी रममाण होते, की तिच्या जोडीला जो पुष्कळसा शहाणपणाचा सल्ला मला देण्यात आला, त्याकडे मी फारच कमी लक्ष दिलं.

लंडनला जाणाऱ्या वॅगनमध्ये मी आणि एस्थर यांच्याकरिता जागा मुक्रर केल्यानंतर, दु:ख आणि आनंद यांच्या मधल्या अवकाशात राहून मी थोडेफार अश्रू ढाळून निरोपसमारंभ साजरा केला; पण त्याला इथे महत्त्व नसल्यामुळे हा प्रसंग वगळून पुढे जात्ये, आणि तेच कारण लागू असल्यामुळे रस्त्यावर असताना जे जे काही घडलं त्या साऱ्याचं वर्णन करीत बसत नाही (उदाहरणार्थ, वॅगनवाल्याने मला लोचटपणे न्याहाळणं किंवा माझ्यासंबंधी काही सहप्रवाशांनी रचलेले बेत

इत्यादि); माझी आईप्रमाणे काळजी घेतल्याचं श्रेय जिला द्यायला हवं, त्या एस्थरच्या जागरूकपणाने हे बेत हाणून पाडले; पण याचबरोबर, संरक्षण दिल्याचा मोबदला म्हणून तिचा सगळा प्रवासखर्च तिने मला करायला लावला; तो मी अत्यंत हसतमुखाने भागवला, आणि या व्यवहारात आपलाच फायदा झाला आहे अशी समजून करून घेतली. परंतु अव्वाच्या सव्वा पैसे आकारले जाणार नाहीत, कोणी गैरफायदा घेणार नाही, शक्य तितक्या कमी खर्चात भागेल याची तिने फार दक्षता घेतली; उधळेपणा हा दोष तिच्यात नव्हता.

दिवस उन्हाळ्याचे होते, आणि सहा घोडे असूनसुद्धा सावकाशीने चालणाऱ्या गाडीतून आम्ही लंडनमध्ये येऊन पोहोचलो तेव्हा संध्याकाळ बरीच होऊन गेलेली होती. आमच्या इनकडे नेणाऱ्या मोठमोठ्या हमरस्त्यांतून जात असताना, घोडागाड्यांचा गोंगाट, लगबग, पायी चालणाऱ्यांची गर्दीगजबज, नव्या दुकानांची आणि घरांची दृश्यं, हे सारं पाहून मी आनंदून व आश्चर्यचकित होऊन गेले.

पण आम्ही इनमध्ये पोहोचताच, आणि आमचं सामानसुमान आम्हाला आणून दिलं जाताच, प्रवासभर माझ्याशी फार कनवाळूपणे वागणारी व आत्ता जो सणसणीत आघात माझ्यावर होणार होता त्याकरिता माझी काहीच पूर्वतयारी न करणारी सहप्रवासिनी, आणि ह्या अनोळखी जागी मला जिच्यावर विसंबता येईल अशी माझी एकमेव मैत्रिण, एस्थर डेव्हिस, जणू काही मी तिच्यावर ओझं बनेन अशी भीती वाटल्यामुळे, जेव्हा माझ्याशी अचानक परकेपणाने व थंडपणाने वागू लागली, तेव्हा मला किती अचंबा वाटून मी शरमिंदी झाली असेन याचा अंदाज तुम्हीच करा. तिच्या ज्या मदतीवर माझी भिस्त होती व जिची मला आत्ताइतकी गरज पूर्वी कधीही जाणवलेली नव्हती, ती मला यापुढेही देऊ करण्याऐवजी, प्रवास सुखरूप पार पडेपर्यंत माझी सोबत केल्याने आपल्यावरची जबाबदारी संपली अशी समजूत करून घेऊन, ती माझ्याशी जशी वागत होती त्यात काहीच विसंगत किंवा जगावेगळं नाही असं मानून जेव्हा निरोप घेण्याकरिता ती मला मिठी मारू लागली; तेव्हा मी इतकी बावचळून जाऊन बधीर झालेली होते, की तिने मला जिथे आणलेलं होतं त्या ठिकाणाबद्दलच्या तिच्या माहितगारपणाचा व अनुभवाचा उपयोग व्हावा अशी माझी अपेक्षा व आशा आहे, हे तिला बोलून दाखवण्याइतकंही अवधान मला राहिलं नाही.

अशा प्रकारे बोलती बंद होऊन जेव्हा मी बथ्थडपणे उभी होते, तेव्हा आपण दुरावणार असल्यामुळे मी खिन्न झाले आहे इतकंच कारण यामागे असणार असं बहुतेक तिला वाटलं, आणि मग तिने

पुढीलप्रमाणे बडबड करून माझी ही खिन्नता कदाचित थोडी कमी केली: आता आपण हातीपायी धड लंडनला आलेल्या आहोत, तेव्हा मला माझ्या चाकरीच्या जागी गेलं पाहिजे, तूही एक चाकरी लवकरात लवकर शोधावीस हे चांगलं; इथे गल्ल्याबोळांत चर्चेस जितकी आहेत त्यापेक्षा चाकऱ्या जास्त आहेत, तेव्हा मिळेल की नाही ही भीती नको; माझा सल्ला असा की चाकऱ्यांची यादी ठेवणाऱ्या कचेऱ्या असतात तिथे तू जा; आणि मला काही कसली हालचाल दिसली तर तुला शोधून काढून कळवीनच; तोपर्यंत कुठेतरी एक खोली भाड्याने घेऊन रहा आणि मला पत्ता कळीव; तू मार्गाला लागावीस अशीच माझी इच्छा आहे; प्रामाणिकपणे वाग, आणि आईबापांच्या नावाला बट्टा लागेल असं काही करू नकोस. इतकं बोलून तिने माझी रजा घेतली, आणि जितक्या हळुवारपणे मला तिच्या हाती सोपवलेलं होतं, तितक्याच हळुवारपणे, जणू काही माझ्या स्वत:च्याच हाती मला परत दिलं.

खिशात पैसे नाहीत व कोणी स्नेहाचं माणूस जवळ नाही अशा अवस्थेत एकटं सोडून दिलं जाताच, ही ताटातूट किती जाचक आहे याची फार कडवट चव माझ्या तोंडात लागू लागली; आणि हा प्रसंग इनमधल्या ज्या एका लहानशा खोलीत घडला होता, तिथे एस्थरची पाठ फिरल्यानंतर, अगतिक व चमत्कारिक अवस्थेमुळे माझ्यात दाटून आलेलं दु:ख डोळ्यांतून अश्रुपुरासकट बाहेर येऊन मनावरचं ओझं खूपच कमी झालं; पण तरीही मी मठ्ठपणे उभी होते, आणि स्वत:चं काय करावं याबद्दल मला बिलकुल काहीही सुचत नव्हतं. त्याचवेळी एका वेटरने आत येऊन 'काही पाहिजे का?' असं अचानक विचारून माझ्या गोंधळात भर टाकली. त्याला मी निरागसपणे 'नको' असं उत्तर दिलं, पण मग 'मला रात्रीपुरती जागा कुठे मिळेल का' असं विचारलं. तो म्हणाला की मी जाऊन मालकिणीशी बोलेन; त्याप्रमाणे ती आली, आणि मी ज्या केविलवाण्या अवस्थेत असलेली तिला दिसत होते त्यात बिलकुल न शिरता कोरड्या आवाजात म्हणाली, की एक शिलिंगला रात्रीपुरता बिछाना मिळेल, लंडनमध्ये तुझ्या ओळखीचे कुणी असतील असं मी समजत्ये (इथे मी एक खोल आणि निष्फळ सुस्कारा सोडला!), तेव्हा सकाळी तू तुझी काय ती व्यवस्था बघ.

आयुष्यातल्या फार मोठ्या आणीबाणीच्या प्रसंगी माणसाचं मन किती किरकोळ दिलाशांना धरून ठेवेल, ह्याचं अंमळ नवल वाटतं. त्या रात्री झोपायला बिछाना मिळेल, केवळ इतक्या आधारामुळे माझ्या मनाची भगभग शांत झाली; आणि मला मदत मागता येईल असे माझ्या ओळखीचे इथे कुणी नाहीत ही गोष्ट इनच्या मालकिणीला सांगण्याची लाज वाटत असल्यामुळे, एस्थरने एका हँडबिलाच्या मागे चाकऱ्यांची नोंद ठेवणाऱ्या कचेरीचा पत्ता लिहून दिलेला होता, तिथे दुसऱ्याच दिवशी सकाळी जाण्याचं मी ठरवलं. माझ्यासारख्या गावाकडून आलेल्या मुलीला जमेलशी चाकरी कुठे मिळेल व माझं

बस्तान कसं बसेल, याबद्दल माझ्याकडचं डबोलं संपण्याआधी तिथे काही माहिती मिळावी एवढा भरवसा मी बाळगलेला होता; आणि एस्थरने मला अनेकदा सांगितलेलं होतं, की जर शिफारस मागितली तर ती मी देईन असं समज; तेव्हा ती अशा तऱ्हेने मला सोडून गेल्यामुळे मला वाईट जरी वाटलं असलं, तरीदेखील तिने जे केलं ते रीतसरच आहे, आणि जगाबद्दल मीच अडाणी असल्यामुळे सुरवातीला त्याबद्दल माझी अशी प्रतिक्रिया झाली, अशी मी स्वत:ची समंजसपणाने समजूत काढली, व अजूनही तिच्यावर विसंबण्याचं पूर्णपणे सोडून दिलं नाही.

त्याप्रमाणे, दुसऱ्या दिवशी सकाळी, माझ्या गावठी कपड्यांच्या बेगमीतून जितका शक्य झाला तितका स्वच्छ व नीटनेटका पोषाख करून, माझी पेटी मुद्दाम सांगून मालकिणीकडे ठेवून, माझी मी बाहेर पडले; आणि जिच्याकरिता प्रत्येक पाटी आणि प्रत्येक दुकान हा डोळे वटारून पाहणारा सापळा होता, अशा जेमतेम पंधरा वर्षांच्या गावंढळ तरुण मुलीला सर्वसाधारणपणे जितकी अडचण येईल त्यापेक्षा जास्त न येता, ईप्सित चाकरी देणाऱ्या त्या कचेरीपर्यंत येऊन पोहोचले.

कचेरीची व्यवस्था एका वयस्क बाईकडे होती; समोर मोठ्या ऐटीत एक नोंदवही घेऊन, आणि जिथेजिथे कामाला माणसं पाहिजेत त्या ठिकाणांचे पत्ते आधीच लिहून ठेवलेली बरीचशी कागदाची भेंडोळी बाजूला मांडून, गिऱ्हाईकांचं स्वागत करायला ती बसलेली होती. डोळे न उंचावता किंवा माझ्याचसारख्या कामाकरिता तिथे आलेल्या आजूबाजूच्या कोणाहीकडे दृष्टिक्षेप न टाकता या भारदस्त व्यक्तिविशेषापर्यंत मी पोहोचले, आणि तिच्यासमोर गुडघ्यात वाकवाकून नमस्कार करून, कसाबसा धीर वेचून, ततपप करीत माझं काम तिला सांगितलं. एखाद्या किरकोळ राज्यमंत्र्याप्रमाणे गांभीर्य व आढ्यता चेहऱ्यावर आणून बाईसाहेबांनी माझं म्हणणं ऐकून घेतलं, आणि माझ्या रूपावर टाकलेल्या एका कटाक्षात मला पूर्णपणे जोखून, सुरवातीचा एक शिलिंग माझ्याकडे मागण्यापलीकडे काही प्रत्युत्तर केलं नाही; तो मिळताच ती मला म्हणाली, की बायकांकरिता चाकऱ्या मिळण्याची अतोनात चणचण आहे, आणि त्यात म्हणजे कष्टाचं काम करायचं तर तू फार लहानखुरी दिसतेस; तरीपण मी नोंदवही तपासून काय करता येईल ते बघत्ये, तेव्हा इतरांचं काम होऊन त्यांना मी वाटेला लावेपर्यंत तू इथेच थांब. माझ्या सध्याच्या परिस्थितीत असह्य होईल अशी जबरदस्त अनिश्चिती या वाणीतून उघड होत असल्यामुळे मी कमालीची शरमून गेले व दचकून काहीशी मागे झाले.

थोड्या वेळाने माझा धीर चेपल्यानंतर, मला वाटत असणाऱ्या अस्वस्थतेपासून लक्ष विचलित करण्याच्या उद्देशाने मी माझं डोकं थोडंसं वर उचलून माझ्या दृष्टीला खोलीची सहल करण्यासाठी जेव्हा पाठवलं, तेव्हा एका प्रतिष्ठित बाईच्या दृष्टीशी तिची समोरासमोर टक्कर झाली (माझ्या कमालीच्या भाबडेपणामुळे तिच्याविषयी मी तसा ग्रह करून घेतला होता); ही बाई खोलीच्या एका कोपऱ्यात बसलेली असून तिने मोठा मखमली कोट घातलेला होता (तेही भर उन्हाळ्यात, हे ध्यानात घ्या), तिचं बॉनेट उतरवलेलं होतं, आणि गलेलठ्ठ, बसकट, लाल चेहऱ्याची व किमान पन्नास वर्षांची, अशी ती दिसत होती.

डोक्यापासून पायापर्यंत मला न्याहाळीत, आपल्या डोळ्यांनी मला खाऊन टाकील अशा आविर्भावात तिने जेव्हा माझ्याकडे पाहिलं, तेव्हा तिच्या रोखून पाहण्यामुळे मी शरमिंदी झाले व बावचळले याची तिने थोडीही पर्वा केली नाही; आणि मी तिच्या कामी येण्यासारखी आहे याची सर्वात गोळीबंद हमी तिला माझ्या याच प्रतिक्रियेमुळे मिळाली होती, यात शंका नाही. माझं रंगरूप व सर्वसाधारण धाटणी यांची काटेकोर परीक्षा करण्यात काही वेळ घालवल्यानंतर ती पुढे आली (मी मान उंचावून, नखरे करून, चांगली दिसेन असे पवित्रे घेऊन, ही परीक्षा मला अनुकूल पडेल अशी माझ्या बाजूने शिकस्त केली), आणि अत्यंत मऊपणाने बोलू लागली:

"मुली, तुला काम हवं का?"

"हो, हवं आहे. अँड प्लीज यू! " जमिनीपर्यंत खाली गुडघे टेकून.

यावर ती मला म्हणाली, की कामाला कुणी मिळते का हेच बघायला मी कचेरीत आले होते, पण मला वाटतं तुला थोडंसं शिकवलं की तू चालून जाशील, तुझ्या दिसण्यावरूनच तू प्रामाणिक आहेस हे कळतं आहे तेव्हा तीच शिफारस मानून घ्यायला मी तयार आहे, लंडन ही फार खराब, वाईट जागा आहे, तेव्हा तू माझं सगळं ऐकशील आणि वाईट संगत टाळशील तर बरं. थोडक्यात काय, तर लंडनमधल्या जुन्या मुरलेल्या धंदेवालीला जे जे काही सुचलं असतं, ते सगळं तिने मला बोलून दाखविलं; वास्तविक रस्तोरस्ती हिंडावं लागतं की काय अशी भीती वाटणाऱ्या माझ्यासारख्या भाबड्या खेडवळ मुलीला ठकवण्यासाठी जितकं पुरलं असतं, त्यापेक्षा हे भाषण खूपच ऐसपैस होतं; तेव्हा ही जी बाई माझ्या गोडगोड स्वप्नाळू कल्पनेला इतकी भारदस्त आणि मायाळू वृत्तीची वाटली, तिने आसरा देऊ करताच लागलीच मी उड्या मारीत हो म्हणाले.

कचेरी सांभाळणाऱ्या ज्या सुमहिलेच्या अगदी नाकाडाखालीच मला कामावर घेण्यात आलं होतं, तिचं बेरकी हास्य व खांदे उडवणं मला दिसल्याखेरीज राहिलं नाही, पण मला इतक्या लवकर चाकरी

मिळाल्याबद्दल तिला आनंद झाला आहे असा मी त्याचा निरागस अर्थ लावला; पण नंतर मला कळलं ते असं, की या थेरड्यांचं एकमेकींशी उत्तम संगनमत असतं; आणि माझी मालकीण, मिसेस ब्राउन, तिच्या गिऱ्हाईकांच्या वापराकरिता व स्वत:च्या फायद्याकरिता काही नवीन माल आला आहे का, याचा अजमास घेण्यासाठी या बाजारात अनेकदा येत असे. पण मालकीणबाई मात्र आपण पटवलेल्या सौद्यावर इतकी खूष झालेली होती, की दुसऱ्या कुणी जास्त चांगला सल्ला दिल्यामुळे किंवा काही अपघातामुळे मी तिच्या हातून निसटते की काय याची माझ्या अंदाजाप्रमाणे तिला भीती वाटली असावी; तेव्हा ती मोठ्या मानभावीपणे तिच्या घोडागाडीतून मला माझ्या इनकडे घेऊन गेली; खुद्द तिनेच माझी पेटी मागवली, आणि मी तिथे हजर असल्यामुळे, मी कुठे चालले आहे याबद्दल कसलीही शंका न काढता किंवा स्पष्टीकरण न मागता ती आमच्या सुपूर्द करण्यात आली. हे काम होताच तिने कोचमनला गाडी सेंट पॉल चर्चयार्डजवळच्या एका दुकानाकडे न्यायला सांगितली, तिथून हातमोज्यांची एक जोडी मला खरेदी करून दिली; मग पुन्हा कोचमनला – स्ट्रीटवरच्या तिच्या घरी चलायला सांगितलं, आणि त्याप्रमाणे आम्ही तिच्या घरी आलो; येत असताना वाटेत माझी कळी खुलावी म्हणून ज्या साळसूद थापा मारण्यात आल्या, त्यातल्या एकाही शब्दातून, अत्यंत जोरावर असलेल्या माझ्या सद्भाग्यामुळे मला अतिशय कनवाळू मालकीणच नव्हे तर अखिल विश्वात एकमेवाद्वितीय अशी प्रियसखीच मिळाली आहे, याखेरीज दुसरा कुठलाही निष्कर्ष निघत नव्हता; त्याप्रमाणे मी अगदी पूर्ण निर्धास्त व हर्षभरित होऊन तिच्या घराच्या दारातून आत शिरले, आणि त्याचवेळी असा निश्चय केला की माझं बस्तान थोडंसं बसलं की मी अनपेक्षितरित्या सुदैवी ठरल्याची बातमी एस्थर डेव्हिसपर्यंत पोहोचवीन.

हमरस्त्यावरच्या इन्समध्ये जशा बेताच्या खोल्या असतात त्यांच्यापेक्षा बऱ्या मी कधी कुठे पाहिलेल्या नसल्यामुळे, माझ्या समजुतीप्रमाणे उंची सामानसुमान असलेल्या ज्या बॅकपार्लरमध्ये मला नेण्यात आलं, तिथला थाटमाट पाहून त्या जागेविषयीचं माझं प्रथमदर्शनी झालेलं चांगलं मत घसरलं नाही एवढं मात्र नक्की. सोनेरी कडा असलेले दोन उभट आरसे तिथे लावलेले होते, आणि एका मोठ्या लाकडी टेबलावर चिनीमातीच्या झगमगीत प्लेट्स मांडलेल्या होत्या; ह्या साऱ्यामुळे दिपून जाऊन, एका मोठ्या लब्धप्रतिष्ठित घराण्यात मी आले आहे अशी माझी पक्की खात्री पटली. माझी मालकीण प्रथम आपल्या भूमिकेत शिरून मला म्हणाली, की तू हसतमुख राहा आणि माझ्याशी मोकळेपणानं वागायबोलायला शीक; घरकाम करायला साधी मोलकरीण म्हणून मी तुला आणलेलं नाही, तर एक प्रकारे माझी सोबतीण म्हणून आणलेलं आहे; जर तू समजूतदारपणे वागलीस तर पिशवीभर आया जितकं करणार नाहीत तितकं मी तुझ्यासाठी करेन; आणि ह्या सगळ्याला, मी आदबीची परिसीमा करून, कमालीची अवघडून जाऊन, गुडघ्यांत वाकवाकून नमस्कार करीत, "हो बाई, नाही बाई,

चालेल की!" अशी एकदोन शब्दांची उत्तरं केली. मालकिणीने घंटीला हात लावताच, जिने मघाशी घराचं दार उघडलं होतं, तीच थोराड मोलकरीण आत आली. मिसेस ब्राउन म्हणाली, "मार्था, माझ्या कापडचोपडाची उस्तवार बघायला ह्या मुलीला मी आत्ताच कामावर घेतलं आहे, तेव्हा लगेच तिला तिची खोली दाखीव; मला ही पोरगी फार आवडलेली आहे आणि हिच्यासाठी मी किती करेन ते काही सांगता येणार नाही, तेव्हा तू माझा जितका मान राखतेस तितकाच हिचाही राखायला हवास."

मार्था ही बया या प्रकारात लोणच्यासारखी मुरलेली होती, आणि हा सगळा बनाव तिला नेहमीचाच होता, तेव्हा इशारा अचूक ओळखून तिने गुडघ्यांत अर्धवट वाकून मला नमस्कार केला, आणि तिच्याबरोबर वर यायला सांगितलं; यानंतर लागलीच दोन जिने चढून, मोठा सुंदर पलंग असलेल्या एका छानदार खोलीत घेऊन जाऊन ती मला म्हणाली, की मालकीणबाईंची एक आतेबहिण (घरंदाज तरुण बाई आहे –) इथे तुझ्याबरोबर झोपेल; आणि ती तुझे खूप लाड करील याबद्दल काही शंकाच नको! आणि मग आपल्या मालकिणीचं लटकं कौतुक करण्याचा तिने सपाटाच सुरू केला, की ती किती गोड स्वभावाची आहे! किती मोठ्या मनाची आहे! मला ती सापडली हे माझं केवढं मोठं भाग्य! मुद्दाम तयार करूनही मला यापेक्षा चांगली मिळाली नसती! असं काही ती अव्वाच्या सव्वा बोलू लागली, की जे कुणी अगदीच कच्चं आणि बावळट असेल, आयुष्याचा ज्याला काही अनुभव नसेल, आणि तिच्या प्रत्येक शब्दाचा जो अर्थ मी घ्यावा अशी तिची अपेक्षा होती अगदी तसाच सरळ घ्यायला तयार असेल, असं माणूस वगळता कुणालाही त्याचा संशय येऊ लागला असता; पण माझा चाणाक्षपणा कितपत आहे हे तिने पटकन जोखलं, आणि माझ्या पिंजऱ्यावर मी खूष राहून त्याचे गज मला दिसू नयेत यासाठी जशा प्रकारे माझ्यासमोर शीळ घालून गाणी गायली, त्यात तिने माझं माप अगदी अचूक घेतलं हे खरं.

अशा रीतीने, माझं तिथलं काम काय असणार आहे याची खोटी स्पष्टीकरणं दिली जात असतानाच, आम्हाला खाली बोलावणारी घंटी वाजली व त्याच दिवाणखान्यात मला परत आणण्यात आलं; तिथे एका टेबलावर तीन डिशेस झाकून ठेवलेल्या होत्या, आणि त्या घरातली एकूण सूत्रं जी हलवते व माझ्यासारख्या कच्च्या शिंगरांना रपेटीसाठी तयार करणं ही जिची जबाबदारी आहे, अशी माझ्या मालकिणीच्या मर्जीतली पोरगी तिने बोलावून घेतलेली होती; तेव्हा आता तो हेतू मनात ठेवून, माझ्याबरोबर खोलीत झोपायला सोबतीण म्हणून मला ती देण्यात आली, आणि तिला जास्त अधिकार प्राप्त व्हावा याकरिता सदर शिक्षणसंस्थेच्या अध्यक्षा असलेल्या माननीय बाईसाहेबांनी स्वत:ची आतेबहिण असं पद तिला बहाल केलं.

मिसेस फीबी एअर्स असं नाव असलेल्या ह्या माझ्यासाठी नेमलेल्या मास्तरणीकरवी माझी पुन्हा एकदा पाहणी झाल्यानंतर तिचं पूर्ण समाधान झाल्यासारखं दिसलं, आणि ती यापुढे माझी काळजी घेईल व मला शिकवून तयार करेल, अशी तिची माझ्याकडे प्रेमपूर्वक शिफारस करण्यात आली. आता जेवण टेबलावर मांडलेलं जरी असलं, तरी मला जी थोडीफार रीतभात कळत होती त्यानुसार इतक्या मोठ्या बाईसाहेबांच्या बरोबरीने आपण बसणं योग्य अथवा शिस्तीनुसार होणार नाही असं मला वाटू लागलं; पण मला सोबतीण म्हणून वागवणं या मिसेस ब्राउनच्या धोरणाला अनुसरून, मी अत्यंत नम्रपणे आणि अत्यंत चाचरत घेतलेले सर्व आढेवेढे, निर्णायकपणे वाद संपवणाऱ्या आवाजात तिने तडकाफडकी निकालात काढले.

टेबलापाशी असताना, मुख्यत्वेकरून या दोन धंदेवाईक बायांनीच संभाषणाला टेकू देऊन द्वयर्थी शब्दप्रयोग वापरून ते चालू ठेवलेलं होतं; आणि मध्येमध्ये थांबून त्यांनी माझ्याकरिता जे कनवाळूपणाचे आश्वासक आवाज काढले, त्याच्या परिणामी माझ्या तात्कालिक परिस्थितीबद्दल मला वाटत असणारं समाधान आणखी दृढ होत गेलं: त्यात भर घालणं त्यांना जमलं नसतं, इतकी तेव्हा मी नवखी होते. ज्या भूमिकेत मी दिसणार होते, तिला साजेसे कपडे माझ्यासाठी आणले जाईपर्यंत काही दिवस मी कुणाच्या दृष्टीला पडू नये असं ठरवण्यात आलं; त्याचबरोबर माझ्या मालकिणीच्या सखीने असं निरीक्षण नोंदविलं, की प्रथमदर्शनी माझी कशी छाप पडते यावर कदाचित पुढचं बरंच अवलंबून राहील; आणि माझे गावंढळ कपडे बदलून लंडनचा झकपक पोषाख करण्याच्या प्रलोभनामुळे कोंडून राहण्याची अट माझ्या सहज पचनी पडेल, हा जो याबाबतीतला त्यांचा अंदाज होता, तो अगदी अचूक निघाला. पण वास्तविक गोष्ट अशी होती, की श्रीमंत बाईसाहेबांच्या सेवेत रुजू होताना जो पडदा मी बरोबर घेऊन आलेले होते (किंवा निदान तसं दिसत तरी होतं), त्याकरिता चांगली किंमत मिळेपर्यंत, तिचे गिऱ्हाईक किंवा त्यांना पुरवल्या जाणाऱ्या मुली (यांना 'हरणी' असं म्हणण्याची पद्धत पाडलेली होती), यांपैकी कुणीही माझ्याशी बोलावं किंवा मला बघावं, असं मिसेस ब्राउनला वाटत नव्हतं.

माझ्या कथानकाकरिता बिनमहत्त्वाच्या असलेल्या किरकोळ तपशीलाला फाटा देऊन मी आता झोपायच्या वेळेपर्यंत पोहोचत्ये; थोडक्यात सांगायचं तर मधल्या कालावधीत, या भल्या माणसांकडे मला सुखाची चाकरी मिळालेली आहे असं पटवून देणारे जे प्रसंग माझ्यासमोर येत गेले, त्यांमुळे मी अधिकाधिक खूष होऊन गेले; आणि रात्रीचं जेवण झाल्यानंतर मला माझा बिछाना दाखवून देऊन नोकराणी बाहेर निघून जाताच, फीबीसमोर बाकीचे कपडे उतरवून आतल्या झिरमिरीत सदऱ्यावर बिछान्यात जायला मी काहीशी अनुत्सुक आहे असं तिच्या लक्षात येताच ती माझ्याजवळ आली,

आणि माझ्या रुमालाच्या व गाउनच्या पिना काढू लागून, पुढचे कपडे काढत राहण्याकरिता तिने मला प्रोत्साहन दिलं; तेव्हा आता सदऱ्यापर्यंत कपडे उतरवून अनावृत्त झाले असल्याकारणाने लाजून जाऊन मी घाईने पांघरुणाखाली अदृश्य होऊन गेले. फीबी हसली, आणि फार वेळ न गमावता बिछान्यात माझ्याशेजारी आली. आपलं वय पंचवीस आहे ही तिने पुरवलेली माहिती फार संशयास्पद होती, आणि ह्या आकड्यात तिने कुठेतरी किमान दहाएक वर्षं गडप केलेली सरळसरळ दिसत होती; अर्थात अनेक वर्षे वारंवार वापरली गेल्यामुळे झालेली झीज, आणि लंडनमधल्या वेगवेगळ्या 'हमामखान्यां'त केलेले प्रकार, यांमुळे तिच्या प्रकृतीचं जे काही वाटोळं झालं असेल त्याचाही हिशेब इथे जमेस धरला पाहिजे; एकूण अशा साऱ्यापायी, गिऱ्हाईक गाठण्याऐवजी इतरांना गाठून द्यावं लागणं ही जी एक शिळपट अवस्था तिच्या व्यवसायातल्या बायकांची होते, तिथपर्यंत ती आत्ताच येऊन पोहोचलेली होती.

माझ्या मालकिणीची ही बहुमूल्य पडछाया बिछान्यात आडवी होते न होते तोच, लंपटपणा करण्याचा कोणताही प्रसंग उपलब्ध झाल्यास कधीही मागे न राहणारी ही बया माझ्या दिशेला वळली, आणि मोठ्या उतावळेपणाने मला मिठी मारून तिने माझं चुंबन घेतलं. हा प्रकार मला नवा आणि चमत्कारिक होता, पण यामागे शुद्ध कनवाळूपणा असणार, आणि कुणास ठाऊक तो व्यक्त करण्याची ही लंडनमधली पद्धत असणार असा माझा समज झाला; तेव्हा तिच्या तुलनेने आपण कमी पडू नये असा माझा निश्चय असल्यामुळे, संपूर्ण निरागसतेतून उद्भवलेल्या उर्मीने मीही तिच्या मिठीची व चुंबनाची परतफेड केली. यामुळे प्रोत्साहन मिळून जसजसे तिचे हात अतिशय मोकळेपणाने माझ्या साऱ्या शरीरावर इतस्तत: फिरू लागले; तसतसं त्यांचं मला स्पर्श करणं, दाबणं आणि कुस्करणं, यांमुळे धक्का बसण्याऐवजी अथवा धास्ती वाटण्याऐवजी, त्यातल्या नवेपणामुळे काही अनपेक्षित भावनांची जाणीव होऊ लागून माझं रक्त वेगाने सळसळू लागलं. चढाया करीत असताना मध्येमध्ये तिने केलेली कौतुकाच्या शब्दांची पखरण, हा प्रकार मी निमूटपणे असाच चालू देण्याकरिता लाच म्हणून कमी उपयोगी पडली असं नाही. दुसऱ्याला इजा करणं मला माहित नसल्यामुळे, दुसऱ्या कोणाकडून इजा पोहोचेल अशी भीतीही मला वाटली नाही; आणि त्यातही विशेषेकरून, सैलसर खाली लोंबणाऱ्या व लिंगभेदाची खूण पटवण्याकरिता अगदी पुरून उरेल एवढा आकारविस्तार असलेल्या स्तनांच्या जोडीकडे माझे हात नेऊन जिने तिच्या स्त्रीत्वाबद्दल शंका घ्यायला जागा ठेवलेली नव्हती, अशा व्यक्तीकडून तर नाहीच नाही; इथे अर्थात पुरून उरेल म्हणजे निदान माझ्याकरिता, कारण तुलना करायची तर मी दुसरा कुठलाच नमुना कधी पाहिलेला नव्हता...

आणि अगदी तिच्या इच्छेप्रमाणे मी हालचाल न करता निपचिप पडून राहिलेले असतानाच, तिच्या स्वैराचरणामुळे एक प्रकारच्या आगळया, व आत्तापर्यंत कधीही न जाणवलेल्या सुखसंवेदना माझ्या मनात उफाळून आल्या. एखाद्या चमकणाऱ्या विस्तवाप्रमाणे माझ्या संपूर्ण शरीराच्या पृष्ठभागावर अलगद फिरत राहात, जिथे पोहोचतील तिथला थंडपणा वितळवीत जाणाऱ्या तिच्या हाताच्या बेलगाम हालचालींना माझ्या देहाचा कोपरान् कोपरा खुला झाला होता. माझ्या स्तनांमुळे (आत्ता कुठे डोळयांत भरू लागलेल्या किंवा स्पर्शाला जाणवू लागलेल्या, वर येऊ पाहणाऱ्या, दोन घट्टसर आणि टणक उपशैलांकरिता जर ही संज्ञा वापरणं औद्धत्याचं होत नसेल तर), तिच्या हातांना काही काळ काम मिळून त्यांचं रंजन झालं; यानंतर गुळगुळीत रस्त्याने खाली घसरताच, गेल्या काही महिन्यांतच तिथल्या रम्य पर्वतावर पखरण करू लागलेली, आणि त्या क्षणापर्यंत जे संपूर्ण अनभिज्ञ निरागसतेचं, पण आता मात्र परमोच्च कोटीच्या सुखसंवेदनेचं आसन होतं, त्यावर कृतज्ञतापूर्वक निवारा तयार करू पाहणारी मऊ रेशमी गादी तिच्या स्पर्शाला किंचितमात्र जाणवली. निसर्गाने एकाच वेळी भूषण म्हणून व उपयुक्त वस्तू म्हणून बनवलेल्या त्या हिरवळीच्या कोवळया तुऱ्यांमध्ये तिची बोटं खेळू लागली, आणि गुंतून राहण्याची खटपट करू लागली.

पण या बाहेरील नाक्यांवर तिचं समाधान न होता तिने आता मुख्य दरवाज्यावरच मोहीम आखली, व आधी बोटाने किंचित चाळवून, मग त्याची फिरवाफिरव करून, शेवटी ते प्रत्यक्ष कपारीमध्येच आत घुसवण्याचा प्रयत्न करू लागली; आणि तेही अशा पद्धतीने, की लक्षातही न येतील इतक्या लहान टप्प्याटप्प्यांनी तिने आपली वाटचाल केल्याचा परिणाम म्हणून, स्त्रीसुलभ लज्जेला यापुढे खेचून धरणं शक्य होऊ नये अशा सीमारेषेपलीकडे जर माझा कामज्वर उधळला नसता, तर मी बिछान्यातून ताडकन उठून बसून असल्या विचित्र हल्ल्यापासून माझा बचाव व्हावा म्हणून मदतीसाठी ओरडा केला असता. पण याउलट तिच्या कामातुर स्पर्शांमुळे एक नवा विस्तव चेतवला जाऊन माझ्या रक्तवाहिन्यांमध्ये थैमान घालू लागला, व अनोळखी हात जिथे पहिल्यावहिल्यांदाच त्या ठिकाणचे ओठ चाचपडण्यात, आवळून आणि दाबून ठेवण्यात, मधोमध एक बोट घालून पुन्हा उघडण्यात गुंगून गेलेले होते, त्या निसर्गाने त्यांच्यासाठी मुक्रर केलेल्या केन्द्रामध्ये वेगाने शिरकाव करून बसला; आणि आता मात्र त्या अभंग बोगद्याच्या चिंचोळेपणामुळे आणखी खोल जाण्यासाठी प्रवेश बंद होऊन, तिने मला दुखावलं आहे असं सूचित करणारा एक 'ओ!' माझ्या तोंडून बाहेर पडला.

ह्या मधल्या कालावधीत, माझे निश्वास, लांब पसरलेले अवयव, शरीराचं ताणलेलं शैथिल्य आणि वेगाने होणारी छातीची धपधप, अशा साऱ्या लक्षणांनी संगनमत करून, तिने चालविलेल्या ह्या प्रकारामुळे मी रुष्ट जितकी झाले आहे त्यापेक्षा तो मला आवडला अधिक आहे, अशी त्या अनुभवी

लंपट स्त्रीची खात्री पटवून दिली. त्याची खुमारी वाढवण्याकरिता म्हणून तिने माझी पुन्हापुन्हा चुंबने घेतली, आणि "काय गोड पोरगी आहेस गं तू! तुला जो बाई करील तो पुरुष खरंच किती भाग्याचा... तुझ्यासाठी म्हणून मी पुरुष असायला हवे होते..." अशासारखे हर्षोद्गार काढले; शिवाय त्याच्याच जोडीला, पुरुषवर्गाकडून मला मिळाली असतील त्यांपेक्षा ज्यांच्यातला हिंस्रपणा व जोरकसपणा कमी नाही, अशा चुंबनांनी आपल्या अडखळत्या शब्दोच्चारांत सततचा व्यत्यय आणला. माझ्या बाजूने सांगायचं तर मी वाहवत गेले, बावचळून गेले व बेभान झाले; इतक्या नव्या संवेदना माझ्या सहनशक्तीपलीकडल्या होत्या. तप्त होऊन सैरभैर झालेल्या संज्ञा अशा प्रकारे माझ्यात बंड करून उठल्या होत्या, की स्वतंत्रपणे विचार करण्याची सारी क्षमता हिरावली जावी; माझ्या डोळ्यांतून आता सुखातिरेकाचे अश्रू वेगाने वाहू लागून, सर्व अंगभर थैमान घालणारा वडवानल त्यांनी काहीसा शांत केला.

मला वाटतं असं की अति वापराने मळलेल्या, सगळं करून भागलेल्या, सुख घेण्याच्या सर्व पद्धती व सर्व युक्त्याप्रयुक्त्या पुरेपूर माहितीच्या व नित्याच्या असलेल्या फीबीला, कोवळ्या पोरींना रगडून मोडण्याचं हे तिचं कसब वापरात आणीत असताना, जिच्यामागची कारणसंगती देता येत नाही अशी काही चाकोरीबाहेरची चव भागल्याचं समाधान मिळत असे. तिला पुरुषांचं वावडं होतं असं नाही, किंवा स्त्रियांपेक्षा पुरुषांची संगत जास्त पसंत नव्हती असंही नाही; पण धोपट मार्गावरून मिळणाऱ्या गंमतीजमतींचा वीट आलेला असल्यामुळे, आणि कदाचित तिचा गुप्त कल दुसरीकडे असल्यामुळे, आत्तासारखे प्रसंग जेव्हाजेव्हा येतील तेव्हा त्यांचा शक्य तितका फायदा घेऊन, जिथे लिंगभेद नाही अशा संबंधांतूनच मिळेल तितकं सुख घेण्याची तिची प्रवृत्ती होती. आणि आता यादृष्टीने, हे उद्दिष्ट साध्य करण्याकरिता तिने आपल्या स्पर्शांकरवी मला पुरेपूर चाळवलेलं आहे अशी तिची बालंबाल खात्री पटताच, हलक्या हातांनी तिने पांघरूण गुंडाळून खाली आणलं, तसा माझा आतला सदरा मानेपर्यंत वर सरकवलेल्या स्थितीत मी नग्नावस्थेत पसरले असल्याचं मला दिसून आलं; पण याला विरोध करण्याइतकं बळ किंवा अवधान माझ्यापाशी नव्हतं. लालभडक होऊन फुलून आलेल्या माझ्या चर्येमधून लज्जेपेक्षा अभिलाषाच अधिक दिसून येत होती, आणि याचवेळी शेजारी धगधगती ठेवलेली मेणबत्ती (अर्थात विसरून जाऊन मुळीच नव्हे), माझ्या संपूर्ण शरीरावर प्रकाशझोत फेकीत होती.

"नाही!" फीबी म्हणाली, "गोडाबाई, तू हे सगळे चमचमीत पदार्थ माझ्यापासून लपवायला बघू नकोस! माझ्या स्पर्शाला जशी मेजवानी हवी, तशी माझ्या दृष्टीलाही हवी! हे वरखाली होणारे वक्ष मला माझ्या डोळ्यांनी फस्त करून टाकू दे. मला त्यांची पापी घेऊ दे. ते कितीही बघितले तरी माझी तृप्ती होत नाही! ही बघ पुन्हा एकदा मी त्यांची पापी घेते. किती गुळगुळीत, घट्टसर, पांढराशुभ्र

उठाव आहे हा! आणि किती नाजुक घाट आहे! आणि ही मऊमऊ गादी! ओहो! मला ही इवलीशी, नाजुकशी, सुंदरशी चीर बघून घेऊ दे! आता अगदी राहवत नाही गं! मी आता.. मी किनई..." आणि मग एका धुंदीतच ती माझ्या हाताला धरून तुम्हाला सहज ओळखता येईल अशा ठिकाणी घेऊन गेली. पण त्याच वस्तूच्या स्वरूपात तिथे किती फरक होता! घनदाट केसांच्या वाढलेल्या रानामुळे वयात आलेली पूर्ण स्त्री ओळखू येत होती. आणि मग ज्या भेगेपर्यंत ती माझा हात धरून घेऊन गेली त्याने तो सहज स्वीकारला, व तिला तो आतमध्ये जाणवताच, तिने इतक्या वेगाने घर्षण करून वरखाली हालचाल केली की लागलीच मी काढून घेतला तेव्हा गिळगिळीत ओलसर झालेला होता; आणि यानंतर ताबडतोब दोनतीन निश्वास सोडून, अगदी खोलातून 'ओ!' असे उद्गार काढून, तिचा प्राणच तिच्या ओठांतून बाहेर पडावा असं एक चुंबन मला देऊन फीबी काहीशी शांत झाली, व तिने आम्हा दोघींवर पुन्हा पांघरूण ओढून घेतलं. तिला कसलं सुख सापडलं हे आता मी काय सांगणार; पण मला इतकं ठाऊक आहे, की निसर्गाने पेटवलेल्या विस्तवाच्या पहिल्या ठिणग्या आणि व्यभिचाराच्या पहिल्या बीजकल्पना त्या रात्री माझ्यात शिरल्या; आणि हेही सांगते की स्त्रीजातीतल्याच वाईट प्रवृत्तींशी संधान हे अनेकदा पुरुषजातीने दाखविलेल्या सर्व प्रलोभनांच्या एकत्रित परिणामाइतकंच निरागसतेचा खून पाडायला कारणीभूत ठरतं.

असो. जेव्हा फीबीचा प्रक्षोभ शांत झाला (जसा अजूनतरी माझा मुळीच झालेला नव्हता), तेव्हा तिच्या सद्गुणी मालकिणीचे माझ्याविषयीचे जे जे बेत होते, ते अंमलात आणण्याकरिता आवश्यक असणारी माहिती तिने मोठ्या खुबीने माझ्याकडून काढून घेतली; आणि मी आडपडदा न ठेवता मोकळी उत्तरं दिल्यामुळे, तिला यश मिळणं हे ज्या प्रमाणात माझ्या अडाणीपणावर, भाबडेपणावर व अविचारीपणावर विसंबून होतं, त्या प्रमाणात ते शंभर हिस्से मिळेल अशी तिची खात्री न व्हायला कसलंच कारण शिल्लक उरलं नाही. बराच वेळ हितगुज केल्यानंतर माझी शय्यासोबतीण मला आराम करायला सांगून झोपून गेली, आणि ज्या भावनांच्या कल्लोळात मला नेण्यात आलेलं होतं, केवळ त्यांमुळे प्रचंड शीण येऊन मला झोप लागली; माझ्यातल्या नैसर्गिक ऊर्मी फार चाळवून ढवळल्या गेलेल्या असल्यामुळे कोणत्या ना कोणत्या मार्गाने निचरा झाल्याखेरीज शांत होणाऱ्या नव्हत्या, तेव्हा ज्यामधला उन्माद जागेपणीच्या वास्तवातील क्रियांपेक्षा किंचितही कमी नाही, असं एक मिठ्ठास स्वप्न पाडून त्यांनी माझी सुटका केली.

सकाळी दहाच्या सुमारास मी ताजीतवानी होऊन उत्साहाने जागी झाले. फीबी माझ्या आधी उठलेली होती; तिने गोड आवाजात, कशी आहेस, झोप कशी लागली, भूक लागली आहे की नाही असं विचारलं; पण त्याचवेळी तिच्या चेहऱ्याकडे पाहिल्यामुळे मला वाटू लागलेला जो अवघडलेपणा

तिच्या लक्षात आलेला होता, त्यात रात्रीच्या शय्याप्रसंगाचा ओझरतादेखील उल्लेख होऊन भर पडू नये, अशी काळजी तिने घेतली. मी तिला म्हणाले, की तुम्ही म्हणत असाल तर मी तयार होऊन सांगाल त्या कामाला लागत्ये. ती हसली, नोकराणीने चहाचा सरंजाम आत आणला, आणि मी माझे कपडे कसेबसे पांघरले होते, तेवढ्यात मालकीण डुगडुगत आत आली. मी उशीरा उठले यावरून ही मला रागावणार, निदान काहीतरी शेरेबाजी करणार अशी माझी अपेक्षा होती, पण तिने मी किती छान ताजीतवानी दिसते यावरून माझं कौतुक करून माझा सुखद अपेक्षाभंग केला. मी "सौंदर्याची कलिका" आहे (तिची बोलण्याची पद्धत अशी होती), किंवा "सगळे मोठमोठे लोक माझ्यावर केवढेतरी भाळतील!"– आणि या सगळयाला मी दिलेली उत्तरं माझ्या घरगुती वळणाला बट्टा लावणारी नव्हती हे नक्की; त्यांना आशा होती तितकीच ती साधी व बावळट होती, आणि शिक्षणामुळे किंवा जगाविषयीच्या माझ्या अनुभवामुळे मला समज आलेली आहे असं जर त्यांतून उघडकीस आलं असतं तर झाला असता, त्यापेक्षा कितीतरी जास्त आनंद त्यांना या उत्तरांमुळे  झाला.

आमचा ब्रेकफास्ट खाऊन संपला, आणि चहाची व्यवस्था आवरली जाते न जाते तोच कापडचोपडाच्या दोन गुंडाळया आत आणण्यात आल्या; थोडक्यात, त्यांच्या भाषेत, मला मखरात बसवण्यासाठी जे जे काही आवश्यक, ते ते सगळं हजर करण्यात आलं. मदाम, कुठूनतरी जुन्या बाजारातून आणलं असलं तरी मला अगदी नवं म्हणून खपवलेलं, चंदेरी फुलं डकवलेलं पांढरं झुळझुळीत स्वस्त रेशीम, लेस लावलेली ब्रसेल्स कॅप, दोऱ्यादोऱ्यांचे बूट, आणि तसल्याच धाटणीचे यच्चयावत दुसऱ्यांनी आधी वापरलेले, आजच्या प्रसंगाकरिता मिसेस ब्राउनने लगबग व खटपट करून तातडीने आणलेले छानछोकी कपडे, हे सारं बघून माझ्यातल्या नटव्या पोरीचं हृदय कसं आनंदाने धडधडलं असेल याची तुम्हीच कल्पना करा; तिने माझ्यासाठी आणलेलं गिऱ्हाईक यादरम्यान घरातच असून, त्याच्यासमोर माझ्यातल्या सौदर्यलक्षणांची पारख होणार होती; कारण जशा प्रकारच्या ठिकाणी मी होते, ती जागा माझ्या आडपडद्यासारखी नाशवंत वस्तू सुरक्षित ठेवण्याकरिता फार भरवशाची नव्हे असा शहाणपणाचा विचार करून, आत्ताच्या आत्ता मला इमारत पाहायला मिळायला हवी, पण एवढंच नव्हे तर पसंत पडल्यास लागलीच माझ्या ताब्यात दिली जावी, असा आग्रह त्याने धरलेला होता.

मला कपडे चढवून बाजाराकरिता सजवण्याची कामगिरी फीबीवर सोपवण्यात आली; व तिने ती उत्तमपणे जरी नसली, तरीसुद्धा कपडे घालून झालेले पाहण्यासाठीचा माझा उतावळेपणा सोडला तर इतर मागण्या पुऱ्या होतील इतपत बजावली. हा प्रकार संपून जेव्हा मी स्वत:ला आरशात पाहिलं, तेव्हा माझ्यातल्या परिवर्तनामुळे मला झालेला बालिश आनंद लपवता न येण्याइतकी भाबडी आणि

निरागस मी खचितच होते; पण खरी गोष्ट अशी की ह्या प्रकाराची एकूण दिशा घसरतीचीच होती, कारण जिच्याबद्दलचा माझा नवखेपणा लपवणं मला साधत नव्हतं, त्या बेंगरूळ, विरूप आणि सस्त्यातल्या छानछोकीपेक्षा, माझ्या गावाकडच्या कपड्यांचा नीटनेटका साधेपणा मला खूप जास्त शोभून दिसला असता. आपलं रूप कसं आहे ह्याविषयी सर्वांत प्रथम माझ्या मनात तयार झालेल्या ज्या कल्पना होत्या, त्या दृढ व्हायला फीबीने केलेल्या कौतुकाची कमी मदत झाली असं नाही (अर्थात यामध्ये मला सजवण्यातला तिचा वाटा ती विसरलेली नव्हती); पण एकूण आत्मप्रौढीचा दोष न लागता असं म्हणता येईल, की माझ्यावर कुणी भाळल्यास ते समर्थनीय ठरावं इतपत माझं रूप तेव्हा बरं होतं, आणि त्याचं अनलंकृत वर्णन इथे दिल्यास ते अस्थानी होणार नाही.

मी उंच होते, पण पूर्वी म्हटल्याप्रमाणे जेमतेम पंधरा वर्षांची होते त्यामानाने अति उंच नव्हते; अंगकाठी सरळसोट होती, आणि घट्ट बॉडीस वापरलेले नसूनही मी निमुळत्या कमरेची, हलकी व मोकळी होते; माझे चमकदार, किरमिजी रंगाचे रेशमासारखे मुलायम केस मानेवर सहजगत्या लाटालाटांनी ओघळत, आणि गुळगुळीत गोऱ्या त्वचेवर खुलून दिसत; चेहरा काहीसा आरक्त असला तरी त्यावरील नाकडोळे नाजूक होते, आणि त्याच्या लंबगोलाकार आकाराला माझ्या हनुवटीवरची खळी बिलकुल विजोड दिसत नसे; डोळे काळेकभिन्न होते, आणि लखलखते असण्यापेक्षा काहीसे म्लान जरी असले तरी काही विशिष्ट प्रसंगी त्यांतून वेगाने ठिणग्या बाहेर येत असं मला सांगण्यात आलेलं आहे; दात लहान, एकसारखे व पांढरेशुभ्र होते (शेवटपर्यंत मी ते व्यवस्थित जतन केले); माझ्या वक्षस्थळांना सुंदर उभार आलेला होता, आणि त्यावेळेस ते प्रत्यक्ष वाढलेले असण्यापेक्षा वर्तुळाकार व घट्टसर बनतील असं केवळ आश्वासन जरी देत असले, तरी ते त्यांनी लवकरच पुरं केलं. सारांश असा की ज्या सौंदर्यस्थळांची सदासर्वकाळ चलती असते ती सारी माझ्यापाशी होती; किमानपक्षी या विषयातले आपले सर्वोच्च न्यायाधीश जे पुरुष, ते सर्वजण किंवा निदान त्यांपैकी माझ्या संपर्कातले सर्वजण, मला अनुकूल असा निवाडा देत असल्यामुळे त्यावर शंका व्यक्त करणं माझ्या स्वाभिमानाच्या आड येत असे; आणि स्त्रीवर्गामध्येदेखील, माझी बाजू न्याय्य असल्याचं नाकारण्याइतक्या खालच्या पातळीवर आल्या नाहीत अशा माझ्या परिचयात कित्येकजणी असल्या; तरीदेखील याउलट काही अशा होत्या, की माझ्यातल्या ज्या लक्षणांची उत्कृष्टता विवाद्य नाही त्यांचं मोल कमी लेखण्याचे धडपडते प्रयत्न करून त्या माझी अनपेक्षितरित्या स्तुतीच करीत.

ही आत्मश्लाघा काहीशी जोरदार झाली हे मी कबूल करत्ये, पण ज्या रूपामुळे मी इतक्या वारेमाप सुखाची व संपत्तीची वाटेकरी झाले, त्याने बहाल केलेल्या एवढ्या मौल्यवान भेटवस्तूंचा उल्लेख केवळ विनयाचा आव आणून मी दाबून टाकला, तर तो त्याच्याशी व त्यामागे उभ्या असलेल्या

निसर्गदेवतेशी कृतघ्नपणा नाही का ठरणार?

ठीक आहे – मला कपडे तर घालून झाले; आणि ह्या ज्या छानछोकी पेहरावाचं भाबडं श्रेय मी मिसेस ब्राउन नामक भल्या स्त्रीच्या कनवाळू व लाघवी स्वभावाला देत होते, तो सारा प्रकार म्हणजे बळी सजवण्याखेरीज दुसरं काही नव्हे हे माझ्या डोक्यातही आलं नाही; शिवाय याच मिसेस ब्राउनने, माझ्या प्रवासातल्या खर्चानंतर जो काही फुटकळ खुर्दा माझ्याकडे शिल्लक होता (असं त्याला मी आता म्हणत्ये), तो सुरक्षित ठेवण्याच्या मिषाने जराही न कचरता हस्तगत केलेला होता, हे मी नमूद करायला विसरतच होत्ये.

मग काही काळ आरशासमोर अत्यंत आनंदात घालवल्यानंतर (आणि त्यातलासुद्धा फारसा स्वत:ला निरखण्यात नव्हे, कारण यात जवळजवळ सगळाच वाटा माझ्या नव्या कपड्यांचा होता), मला खाली पार्लरमध्ये बोलावण्यात आलं; तिथे ह्या म्हातारीने मला ये ये म्हणत, माझ्या नव्या कपड्यांवरून माझं कोडकौतुक केलं, आणि मला आयुष्यभर उंची मालाखेरीज दुसरं काही घालायची सवयच नसावी इतके ते चांगले बसताहेत असं म्हणायला ती शरमली नाही; पण अशी काय थाप असू शकेल, की जी खरी मानण्याइतकी मी तिला दुधखुळी वाटत नव्हते? आणि मग याचवेळी, तिने स्वत: तयार केलेला एक मामेभाऊ माझ्यासमोर आणला; मी खोलीत येताच हा काहीसा वयस्क गृहस्थ उठून उभा राहिला, मी त्याला गुडघे वाकवून नमस्कार टाकताच त्यानेही मान वाकवून तो परतवला, यानंतर मी फक्त माझा गाल चुंबनासाठी पुढे केल्यामुळे तो काहीसा रुष्ट झाल्यासारखा दिसला, आणि ही चूक (जर ही चूक असेलच तर) त्याने तडकाफडकी त्याचे ओठ माझ्या ओठांवर चिकटवून दुरुस्त केली. त्याच्या या कृतीतल्या धसमुसळेपणामुळे मी खूष व्हावं असा कल त्याच्याकडे पाहून माझ्यात बिलकुल निर्माण झालेला नव्हता, कारण त्याच्या रूपापेक्षा हिडीस व किळसवाणं काही असणं शक्य नसून, विद्रूप किंवा अनाकर्षक हे शब्द त्याला न्याय देण्याकरिता फार मिळमिळीत होते.

साठी केव्हाच उलटून गेलेला, गिड्डा, बेढब, प्रेतासारखा पिवळट वर्ण असलेला, गळफास लावला असावा अशा प्रकारे मोठाल्या बटबटीत डोळ्यांनी वटारून पाहणारा, ज्यांना सुळे म्हणणं रास्त ठरेल असे दोन दात तोंडातून बाहेर डोकावताहेत, ओठ फिकुटलेले आहेत आणि श्वासांना संडासाचा वास आहे, असा माणूस तुमच्या मनासमोर आणा. त्याच्या हसण्यामध्ये असा एक चमत्कारिक विकटपणा होता, की जेणेकरून छातीत जबरदस्त धडकी भरेल इतकंच नव्हे तर कदाचित गरोदर बाईला दृष्टसुद्धा लागेल; पण पुरुषजातीची मस्करी करण्यासाठीच म्हणून त्याची एकंदर घडण झालेली असली, तरीदेखील स्वत:च्या ढळढळीत दिसून येणाऱ्या व्यंगांबद्दल तो इतका अनभिज्ञ होता, की

इतरांच्या नयनसुखाकरिताच आपण जन्मलेले आहोत आणि पाघळून न जाता कुठलीही बाई आपल्याकडे पाहू शकत नाही असा त्याचा समज होता. अशा कल्पनेने मनात घर केल्यामुळे, या माणसाबद्दल प्रेमभाव दाखविण्याचं ढोंग करण्याइतपत ज्या गरजू बायका स्वत:वर संयम बाळगू शकत असत त्यांच्यावर तो प्रचंड पैसे खर्च करी, आणि याउलट त्याच्याकडे पाहून होणारी वांतीची भावना छपवण्याइतका धोरणीपणा किंवा धीर ज्यांच्यापाशी नव्हता, त्यांच्याशी तो हिंस्रपणे वागायला कमी करीत नसे. सुखाच्या अत्युच्च पातळीपर्यंत चढवण्याकरिता जी उत्तेजना त्याला कमी पडे, ती त्याने वैविध्यपूर्ण अनुभवांत शोधण्याचा प्रयत्न करावा, यामागे गरजेपेक्षाही त्याची नपुंसकता हेच कारण अधिक होतं, पण इतकंच नव्हे तर त्याच्या क्षमतेने त्याला दगा दिल्यामुळे अनेकदा हे सुखही त्याच्या तावडीतून निसटून जात असे: असं झाल्यास हटकून त्याच्या अंगभर रागाची सणक उठे, आणि त्याच्या तात्कालिक वासनेचं लक्ष्य झालेल्या अश्राप स्त्रीवर याचा जमेल तितका वचपा तो काढी.

त्या प्रांतात त्याला अनेक वर्षे माल पुरवीत राहणाऱ्या माझ्या सद्विवेकी उपकारकर्तीने ह्या असल्या हैवानाला तोंड देण्याची पाळी माझ्यावर आणलेली होती, आणि त्याला माझी पारख करता यावी यासाठी मुद्दाम मला खाली बोलावून घेण्यात आलेलं होतं. ह्या बेताप्रमाणे तिने मला त्याच्यासमोर उभं रहायला लावलं, गोल फिरवून दाखवलं, माझ्या रुमालाच्या पिना काढून, नुकत्याच भरू लागलेल्या स्तनांचा गोरेपणा, घाट, आकुंचन आणि प्रसरण, यांवर त्याच्यासमोर टीकाटिपणी केली; नंतर मला चालून दाखवायला लावलं आणि माझ्या चालीचं गावरान वळण त्याच्या लक्षात आणून देऊन, माझ्यातल्या आकर्षणांचा साठा काहीसा फुगवून दाखवला: थोडक्यात काय, तर आपल्या मालाची तरफदारी करण्याची एकही संधी तिने दवडली नाही, आणि या सर्व प्रकाराला प्रत्युत्तर म्हणून तो माझ्याकडे लाळ गाळत पाहात खूष होऊन औदार्यपूर्वक मान डोलावीत राहिला: कारण मी जेव्हा मध्येमध्ये डोळ्याच्या कोपऱ्यातून चोरून त्याच्याकडे कटाक्ष फेकला, तेव्हा त्याची हपापलेली व तापलेली नजर सामोरी येताच जबरदस्त भीती व दहशत वाटून जी मी दुसरीकडे पाहू लागले, त्यामागचं कारण माझा स्त्रीसुलभ लाजाळूपणा (किंवा निदान तसा अभिनय) हेच असणार, अशी त्याने अर्थातच स्वभावानुसार स्वत:ची समजूत करून घेतलेली होती.

ते काही असलं तरी मला लवकरच बाहेर जायला सांगण्यात येऊन फीबी मला माझ्या खोलीत घेऊन गेली; आणि जी बेअक्कल नाही अशा कुठल्याही व्यक्तीच्या मनात आत्तासारख्या प्रसंगाला सामोरं जावं लागल्यानंतर साहजिकच जे विचार येतील, ते माझ्या मनात येण्यासाठी वेळ मिळू नये या हेतूने मला एकटं राहू न देता ती माझ्याशी चिकटून राहिली; पण माझा अजिंक्य मठ्ठपणा, किंवा निदान व्यापक बावळटपणा असा होता की मिसेस ब्राउनचा कावा ओळखण्यासाठी अजूनही माझे डोळे

उघडलेले नव्हते; आणि तिच्या त्या नामधारी मामेभावामध्ये, तिच्या एकूण भाऊबंदांबद्दलचा माझा आदर कमी व्हायला कारणीभूत ठरण्याव्यतिरिक्त ज्याच्याशी आपल्याला काहीही देणंघेणं नाही असा एक भयंकर ओंगळ माणूस, यापलीकडे मी काही पाहिलं नव्हतं ही गोष्ट मला इथे शरमेने कबूल करावी लागेल.

फीबी मात्र या हैवानाविषयी माझ्या हृदयाची भूमिका काय आहे व त्याचे ठोके किती जोरात पडताहेत याची शहानिशा करू लागली, आणि असा 'फाईन जेंटलमन' मला नवरा म्हणून कसा वाटेल असा प्रश्न तिने विचारला. (मला वाटतं त्याने अंगभर लेस थापलेली असल्यामुळे ती त्याला 'फाईन जेंटलमन' म्हणाली असावी.) मी तिला सरळ म्हणाले की नवरा करण्याबद्दल मी काही विचार केलेला नाही, पण जर निवडायचाच झाला तर माझ्याच पायरीचा निवडेन हे बरीक नक्की! ह्या घाण माणसाच्या विद्रूट रुपड्याकडे पाहिल्याने शिसारी येऊन सर्वच 'फाईन जेंटलमेन' लोकांबद्दल माझ्या मनात अशी अढी बसली होती व माझ्या डोक्यात अशा चुकीच्या कल्पना घुसल्या होत्या, की जणू काही 'जेंटलमन' या स्तरातले सगळेजण त्याच साच्यातून घडवलेले असावेत! पण फीबी इतक्यावर थोपवून धरता येण्यासारखी नव्हती, आणि त्या आतिथ्यशील घरामध्ये मी नीट सामावून जावं याकरिता मला मऊ करून वितळवण्याच्या हेतूने तिने प्रयत्न चालूच ठेवले: पुरुषजात या सर्वसाधारण विषयावर जोपर्यंत तिचं बोलणं चालू होतं, तोपर्यंत मी राजी होण्याकरिता अनेक कारणं तिला समोर दिसत असल्यामुळे याबाबतीत निराशा होण्याची तिला विशेष धाकधूक नव्हती: पण तरीदेखील, त्या भेसूर मामेभावाबद्दल माझ्या मनात जी पक्की अढी बसलेली होती ती निघणं, ही सौदा पुरा होण्यासाठी सोयिस्कर असलेली गोष्ट सहजासहजी घडणार नाही, हे न उमगण्याइतका तिचा अनुभव तुटपुंजा नव्हता.

मधल्या कालावधीत, नंतर मला समजलं त्याप्रमाणे, ह्या लंपट म्हाताऱ्या बोकडाबरोबर ब्राउनमातेने व्यवहाराच्या अटी निश्चित केल्या होत्या त्या अशा: माझ्यावर प्रयत्न करून पाहण्याची मुभा मिळण्याकरिता ठोक पन्नास गिन्न्या, आणि माझ्या कौमार्यावर विजय मिळवून त्याची पूर्ण इच्छातृप्ती झाल्यानंतर आणखी शंभर; याखेरीज त्याच्या खुशीचा व औदार्याचा जसा कल असेल त्याप्रमाणे माझी सोय लागणार होती. हा अनैतिक करार करून झाल्यानंतर ताबा घेण्यासाठी तो इतका उतावळा झाला होता, की त्याच दिवशी दुपारी मी हिच्याबरोबर चहा पिण्यास येईन व त्यावेळी आम्हा दोघांना एकटं सोडण्यात यावं, असा त्याने आग्रह धरला: तरीदेखील माल पुरवणारीने त्याला असा सबुरीचा सल्ला दिला होता, की मी अशा प्रकारच्या मोहिमेकरिता पुरेशी पिकून तयार झालेली नाही, व मला घरात येऊन कसेबसे चोवीस तास झालेले असल्यामुळे अजून फार कोवळी

आणि ओढाळ आहे; पण अधिरेपणा हा कामेच्छेचा स्थायीभावच असल्यामुळे त्याने तो सगळा कानाआड केला, आणि अशा प्रसंगी कुमारिका नेहमीच आढेवेढे घेतात ह्या त्याच्या समजुतीपेक्षा वेगळी काही शंका मनाला शिवू नये इतकं त्याचं स्वत:बद्दलचं मत चांगलं असल्यामुळे, हा बेत पुढे ढकलण्याचे सगळे प्रस्ताव नाकारले. परिणामी, माझ्या नकळत, माझ्या कसोटीची वेळ त्याच संध्याकाळी मुक्रर करण्यात आली.

दुपारच्या जेवणाच्या वेळी, ह्या गुणसंपन्न मामेभावाची तोंडफाड स्तुती करण्यापलीकडे मिसेस ब्राउन आणि फीबी या दोघींनी दुसरं काही केलं नाही – तो जिला आपल्या प्रेमयाचना अर्पण करण्याचा मान देईल, ती स्त्री त्यांच्या मते फार भाग्याची होती; सारांश असा की मी त्या स्वीकाराव्यात हे मला पटवून देण्याच्या कामी ह्या दोन्ही बडबड्या टवळ्यांनी त्यांच्याकडचं सगळं वाक्चातुर्य संपवून टाकलं: "तुला पाहताक्षणीच त्याला प्रेमाचा जहरी दंश झालेला आहे... तू जर आपलाच हेका न चालवता, समजूतदारपणा दाखवून त्याचं ऐकलंस तर तुझं नशीब फळफळेल... त्याच्यावर तू विश्वास ठेवायला हवास... तुझ्या आयुष्याची ददात मिटेल, तुला हिंडायफिरायला घोड्यांची गाडी असेल..." माझ्यासारख्या बावळट आणि वेडपट मुलीने तिचं डोकं गमावून बसावं यासाठी ही भरताड अगदी लागू पडण्यासारखी होती: पण माझं सुभाग्य असं, की त्याच्याविषयीची किळस माझ्यात इतकी घट्ट रुतून बसली होती, आणि माझ्या संवेदना माझ्या हृदयाचा त्याच्यापासून असा खंदा बचाव करीत होत्या, की स्वत:च्या भावना लपवून ठेवण्याची कला मला अवगत नसल्यामुळे, त्यांच्या गिऱ्हाईकाचा माझ्याविषयीचा हेतू निदान सहजासहजी साध्य होईल अशी थोडीदेखील आशा मी त्यांच्यात निर्माण केली नाही. आतापर्यंत समोरचा पेला कवायत करणाऱ्या पलटणीसारखा झरझर वरखाली होऊ लागला होता; चढाईची वेळ जवळ येत असताना माझं रक्त तापविणं, हा बहुतेक त्यामागचा हेतू असावा.

मला त्यांनी बराच वेळ टेबलाशी खोळंबून ठेवलं, आणि संध्याकाळी सहाच्या सुमारास मी माझ्या खोलीत परत गेले असताना, टी-बोर्ड चा सरंजाम होताच, माझी सन्मान्य मालकीण आत आली; यानंतर लागलीच जेव्हा तिच्या मागोमाग तो बोकडअंग्या त्याचं वैशिष्ट्यपूर्ण हास्य हसत प्रवेश करता झाला, तेव्हा जीवनाचा कंटाळा आणणाऱ्या त्याच्या उपस्थितीचा परिणाम म्हणून, पहिल्या वेळी त्याला बघताच माझ्या मनात जी तिडीक उत्पन्न झालेली होती, तिच्यावर अगदी शिक्कामोर्तब झालं. तो मला सामोरा बसला होता, आणि चहा पीत पीत ज्या प्रकारे मला न्याहाळीत होता त्यामुळे बावचळून जाऊन मला अगदी नकोसं झालं; मी लाजाळू असून मला माणसांची सवय नसल्यामुळे त्याची ही अशी लक्षणं दिसताहेत, असं स्पष्टीकरण त्याने दिलं. चहा संपताच ही आतिथ्यशील

म्हातारी म्हणाली, की मला फार तातडीचं काम आहे तेव्हा गेलं पाहिजे (आणि हे खरंच होतं), तेव्हा मी परतेपर्यंत तू आपल्या दोघांच्या वतीने माझ्या भावाला काय हवं नको ते पहा; आणि मग "सर, प्लीज जरा सांभाळून बरं का! मुलगी गोड आहे, तिच्याशी नाजुकपणे वागा" असं म्हणून ती खोलीबाहेर इतक्या भरकन निघून गेली, की काय करावं ते न कळून मी तोंड वासून एकटक बघत राहिले.

आता आम्ही दोघेच होतो, आणि याची जाणीव होताच मी अचानक थरथरू लागले. मी फार घाबरले होते, पण ते का आणि कशाला घाबरायचं ह्याची माझ्यापाशी स्पष्ट कल्पना नव्हती; तेव्हा मी विस्तवाशेजारच्या सेटीवर न हलता दगडासारखी बसून राहिले, माझ्यात काही त्राण नव्हतं, आणि कुठे बघावं, काय करावं मला काही कळेना. पण अशा बथ्थड अवस्थेत मला फार काळ राहावं लागलं नाही: कारण हा दैत्य माझ्याशेजारी सेटीवर धपकन येऊन बसला, यापुढे अधिक उपचार अथवा प्रस्तावना करीत न बसता त्याने माझ्या गळ्याभोवती हात टाकले, आणि मोठ्या बळजोरीने मला त्याच्याजवळ ओढून, मी त्याच्या तावडीतून सुटण्याची झटापट करीत असतानादेखील, त्याच्या गुदमरून टाकणाऱ्या रुगणाईत चुंबनांचा स्वीकार करणं मला भाग पाडलं. माझा काहीच प्रतिसाद नाही किंवा मी विरोध करीत नाही, असं पाहून त्याने माझ्या गळ्याभोवतालचा रुमाल फाडून काढून तिथलं सगळं काही त्याच्या डोळ्यांना आणि हातांना मोकळं केलं, तरीही न कचरता मी हे सर्व सहन करीत राहिले; आता माझ्यात बोलण्याची किंवा ओरडण्याची शक्ती नसल्यामुळे जो मूक सोशिकपणा फक्त उरला होता, त्यामुळे त्याचं धारिष्ट्य वाढून त्याने मला सेटीवर खाली आडवं पाडण्याचा प्रयत्न केला: माझ्या एकमेकींविरुद्ध वळवून ठेवलेल्या उघड्या मांड्यांवर त्याचा हात खाली मला जाणवला, आणि त्या अलग करण्याकरिता त्याने खटपट केली...

पण आता मात्र निपचिप सहन करण्याच्या अवस्थेतून मी जागी झाले, त्याला अनपेक्षित अशा चपळाईने थाडकन त्याच्याखालून बाहेर पडून त्याच्या पायांवर लोळण घेतली, आणि अतिशय केविलवाण्या आवाजात, मला मारू नका, मला दुखवू नका अशी त्याला भीक मागितली. "अगं, मी तुला दुखवेन का?" तो पशू म्हणाला, "तुला दुखवावंसं मला कसं वाटेल?... माझं तुझ्यावर प्रेम आहे असं तुला बाईंनी सांगितलं नाही का? मी तुला खूप काही देईन..." मी म्हणाले, "तिनं मला खरोखरीच तसं सांगितलं आहे, पण मला तुमच्यावर प्रेम करणं शक्य नाही. अगदी शक्य नाही हो! मला सोडा... मला जर सोडून निघून गेलात तर मात्र मी तुमच्यावर खूप प्रेम करेन..." पण मी वाऱ्याशी बोलत होते; कारण माझं रडणंभेकणं, माझी दशा व माझ्या कपड्यांचा अस्ताव्यस्तपणा यामुळे एकतर त्याला नवा हुरूप आला, किंवा ज्यांना वेसण घालता येऊ नये अशा वासनांचा अंमल

त्याच्यावर जमलेला होता; काय ते कुणास ठाऊक, पण कामेच्छेने बेभान होऊन नाकपुड्यांतून सूं सूं आवाज करीत तोंडाला फेस आलेल्या अवस्थेत त्याने पुन्हा चढाई केली, मला पकडलं आणि सेटीवर फाकवून दाबून धरण्याचा प्रयत्न केला; आणि यात त्याला इतपत यश आलं की त्याने मला खाली पाडून माझा पेटिकोट डोक्यापर्यंत वर उडवला व मांड्या उघड्या पाडल्या; पण त्या मी चिवटपणाने जवळ धरून ठेवल्या, आणि त्याने गुडघ्याने जोर लावून त्या वेगळ्या करायचा जरी प्रयत्न केला तरीही मुख्य रस्त्याचा ताबा घेण्याची संधी मिळेल अशी त्याला व्यवस्था करता आली नाही; त्याच्या कोटाची व पाटलोणीची बटणं काढलेली असली, तरी मी रागाने झटापट करीत व धास्तीने मरत खाली पडलेले असताना मला फक्त त्याच्या अंगाचा भार माझ्यावर जाणवला; पण आता तो अचानक थांबला, धापा टाकीत, फुस्कारे सोडत, शिव्याशाप देत उठून बसला, आणि मी बचावाची तुंबळ लढाई करीत असताना माझ्या तोंडून चिडून निघालेले 'ओंगळ थेरडा' हे शब्द पुन्हापुन्हा म्हणून दाखवू लागला. मला नंतर समजलेली गोष्ट अशी, की ह्या पशूची वासना शेवटापर्यंत सांभाळण्याइतका त्याचा दम टिकला नव्हता, आणि त्याच्या उतावळेपणामुळे व झटापट केल्यामुळे ती उकळून उतू जाऊन त्याची सगळी सांडासांड माझ्या मांड्यांवर व कपड्यांवर झाली होती.

हा प्रकार संपताच आवाजात नाराजी आणून त्याने मला उठायला सांगितलं, आणि तो मला म्हणाला की यापुढे तुझा विचार करण्याइतका भाव मी तुला देणार नाही... त्या हरामखोर म्हातारडीनं हवं तर दुसरा कुणी भोटम शोधून काढावा... मी गावाकडची सालस मुलगी आहे असला बनाव करणाऱ्या इंग्लंडमध्ये फार झालेल्या आहेत, पण त्यांना बधणारा मी नव्हे... तुझा पडदा तू गावातल्याच कुठल्यातरी मोळ्याबरोबर सोडून देऊन तुझं पाणचट दूध खपवायला लंडनला आलेली दिसतेस... या आणि अशाच शिव्यांचा त्याने माझ्यावर भडिमार केला, आणि एखाद्या स्त्रीने तिच्या प्रियतमाकडून प्रणयाची याचना ऐकावी त्याहीपेक्षा जास्त आनंदाने मी तो ऐकून घेतला; कारण त्याच्याबद्दल जो पराकोटीचा तिटकारा मला वाटत होता, त्यात आणखी भर पडणं शक्य नसल्यामुळे, तो आपल्या घाणेरड्या मिठ्या पुन्हा मला मारणार नाही याची हमी, अशीच त्या शिव्यांबद्दल माझी भूमिका होती.

आणि आता मिसेस ब्राउनचे हेतू धडधडीत स्पष्ट झालेले असले, तरीदेखील त्यांच्यासंबंधाने माझे डोळे उघडावेत इतकं धाडस अथवा बळ माझ्यापाशी नव्हतं: त्या म्हाताऱ्या सटवेवर मी जी अवलंबून होते तो संबंध तोडणं शक्य होऊ नये, इतकी मी स्वत:ला मनाने व शरीराने तिची समजत होते; किंवा खरं सांगायचं तर माझं तिच्याविषयीचं चांगलं मत तसंच ठेवून मी स्वत:ला फसविण्याची धडपड केली,

आणि जवळ एक कपर्दिकादेखील नाही व मदत मागायला कोणी नाही अशा अवस्थेत उपासमार होण्यासाठी रस्त्यात हाकलून दिलं जाण्यापेक्षा, तिच्या हातून माझं जे काही वाटोळं व्हायचं ते होण्याची वाट पाहात राहिले: ही भीती हाच माझा अविचार ठरला.

अशा प्रकारे उलटसुलट कल्पनांचा गोंधळ माझ्या मनात चालू असताना, उद्विग्न अवस्थेत मी विस्तवापाशी बसलेले होते, डोळे पाण्याने भरले होते, गळा अजून उघडाच होता, व डोक्यावरची टोपी झटापटीत उडून पडल्यामुळे केस कसे विस्कटले असतील ह्याची तुम्ही कल्पना करू शकाल; आणि तेव्हाच, अजून त्याने न भोगलेला व अर्थातच ज्याबद्दलचं त्याचं आकर्षण मावळलं नव्हतं असा हा माझ्या यौवनाचा फुलोरा पाहून, त्या खलपुरुषाची वासना पुन्हा झिरपू लागली.

थोडा वेळ थांबून, त्याने मला आता अगदी मऊ केलेल्या आवाजात विचारलं, की म्हातारी परत येण्याआधी जर तू माझ्या मनासारखी वागलीस तर माझा राग जाईल आणि सगळं ठीक होऊन माझी तुझ्यावर पुन्हा मर्जी बसेल; आणि हे बोलत असतानाच त्याने माझं चुंबन घेण्याचा व माझे स्तन हाताळण्याचा प्रयत्न केला. पण आता माझ्या मनातली आत्यंतिक घृणा, भीती व संताप यांचा एकत्रित परिणाम होऊन, माझ्या सहजप्रकृतीपेक्षा जास्त बळ माझ्यात येऊन, मी त्याच्या कचाट्यातून सुटले, आणि त्याला काही कळण्यापूर्वीच घंटीकडे पळत जाऊन इतक्या त्वेषाने ती खाणकन वाजवली, की काय झालं आणि साहेबांना काही पाहिजे का ते बघायला नोकराणी धावत आली; यापुढे तो काही वावगं करू धजण्याआधीच खोलीत घुसली, आणि मी जमिनीवर आडवी पडले आहे, केस सगळे अस्ताव्यस्त झाले आहेत, नाकातून भळभळा रक्त वाहतं आहे (यामुळे प्रसंगाच्या कारुण्यात चांगलीच भर पडली), आणि माझ्या किंकाळ्यांना व शोचनीय अवस्थेला न जुमानता हा किळसवाणा छळवादी आपला पाशवी हेतू पुढे घुसवायला अजून पाहतोच आहे, असं दृश्य पाहून तीच बावचळून गेली व काय बोलावं हे तिला कळेना.

अशा तऱ्हेचे व्यवहार मार्थाला कितीही सरावाचे होऊन तिचं मन दगड झालेलं असलं, तरीदेखील हे दृश्य पाहून तिला काहीच वाईट वाटलं नसतं, तर सारंच स्त्रीत्व तिच्या हृदयातून गळून गेलेलं आहे असा त्याचा अर्थ झाला असता. याखेरीज हा सारा प्रकार वरकरणी पाहून, गोष्टी वास्तविक ज्या थराला गेल्या होत्या त्याच्या पलीकडे त्या गेल्या आहेत व माझ्याबाबतीत गृहप्रवेश होऊन गेल्यामुळे माझी अशी दैना झाली आहे असं तिला वाटलं: ही कल्पना डोक्यात शिरल्यामुळे तिने ताबडतोब माझी बाजू घेतली; ती त्याला म्हणाली की साहेब तुम्ही आता खाली जा आणि हिला आराम करू द्या;

आणि मग "हिचं आता काही खरं नाही... मिसेस ब्राउन आणि फीबी बाहेर गेल्या आहेत, त्या परत आल्यानंतर तुम्हाला काय हवं नको ते बघतील... ह्या गरीब बिचारीकरता जरा दम धरलात तर काही बिघडायचं नाही... मला तर बाई... इतकी भीती वाटते... हा असला अगोचर प्रकार बघितला की काय बोलावं काही कळत नाही... मालकीणबाई येत नाहीत तोवर मी पोरीजवळच थांबते..." असं सगळं ही पोरटी निर्णयी सुरात बोलल्यानंतर आता इथे थांबून परिस्थिती सुधारणार नाही हे त्या हैवानाच्या लक्षात आलं, आणि आपली हॅट उचलून, पुटपुटत व एखाद्या म्हाताऱ्या वांदराप्रमाणे भुवया कुस्करत तो खोलीबाहेर जाताच, भेडसावणाऱ्या आणि नकोनकोशा झालेल्या अशा त्याच्या उपस्थितीपासून माझी सुटका झाली.

तो निघून जाताच मार्था मला अतिशय कनवाळूपणाने म्हणाली की तुझं सगळं हवं नको मी पाहीन; आणि काही स्मेलिंग सॉल्टचे थेंब देत्ये, तेवढे घेऊन झोपून रहा असं ती म्हणत होती, पण हा हैवान पुन्हा येऊन मी झोपेत असल्याचा गैरफायदा घेईल अशा भीतीने मी सुरवातीला तरी अगदी निक्षून नाही म्हणाले. मग माझा दादापुता करून, मला त्या रात्री तरी कोणी त्रास देणार नाही अशी समजूत घालून तिने मला बिछान्यावर पडायला लावलं; आणि मी झटापट करून इतकी दमून गेले होते, भेदरवून टाकणाऱ्या कल्पनांनी इतकी खचले होते, आणि मला दहशत अशी बसली होती, की उठून बसून राहण्याची, किंवा मार्थाने औत्सुक्याने टोचून टोचून विचारलेल्या व मला बुचकळ्यात टाकणाऱ्या प्रश्नांना धड उत्तरं देण्याची देखील ताकद माझ्यात राहिलेली नव्हती. माझं नशीब असं खडतर, की मिसेस ब्राउनच्या समोरही यायला मला धास्ती वाटत होती, जणू काही मी गुन्हेगार असून तीच दुखावली गेलेली होती; पण मी जो विरोध केला होता त्यामागे नीतिमत्तेचा किंवा कौमार्य टिकवून धरण्याच्या हट्टाग्रहाचा थोडादेखील भाग नसून, केवळ माझ्या कोवळ्या निरागसतेचा फायदा घेणाऱ्या पहिल्या हिंसक दैत्याबद्दल मनात निर्माण झालेली विशिष्ट घृणा होती, हा फरक जेव्हा तुम्ही लक्षात घ्याल तेव्हा या चुकीचं इतकं आश्चर्य वाटणार नाही.

धास्ती आणि हताश मनस्थिती यांच्या दुहेरी परिणामामुळे, मिसेस ब्राउन घरी परतेपर्यंतचा काळ ज्या चलबिचल अवस्थेत मी घालवला, तिची कल्पना करणं सोपं आहे.



## भाग दुसरा

मिसेस ब्राउन केव्हा परत येईल याची वाट पाहात राहण्याचा शेवटी कंटाळा येऊन, मिस्टर क्रॉफ्ट, म्हणजेच माझा रानगेंडा, घराबाहेर चालता झाल्यानंतर, रात्री अकराच्या सुमारास माझ्या या दोन्ही सख्या घरी परतल्या; मार्थाने जिन्यातून धावत खाली जाऊन त्यांना आत आणताच व शुभवर्तमान त्यांच्या कानी घालताच त्या धडधड करीत वर आल्या; तेव्हा माझं फिकट पडलेलं अंग, रक्ताळलेला चेहरा व पुरता रडकुंडीला आलेला अवतार पाहताच माझी समजूत काढून मला धीर देण्याची त्यांची खटपट सुरू झाली, आणि त्या मला टाकून बोलतील अशी जी धास्ती मनाच्या दौर्बल्यापोटी मी बाळगून होते (आणि तेसुद्धा उलट त्यांची निर्भर्त्सना करण्यासाठी माझ्यापाशी जास्त सबळ व न्याय्य कारण असूनही), तसं मात्र घडलं नाही.

मिसेस ब्राउन निघून गेल्यानंतर फीबी माझ्या बिछान्यात आली, आणि माझ्याकडून काढून घेतलेली उत्तरं व तिचं स्वतःच्या पद्धतीने चाचपडून पाहणं याचा गोळाबेरीज परिणाम म्हणून, मला इजा फारशी न होता भीतीच अधिक वाटलेली आहे हा शोध तिला लवकरच लागला; शिवाय माझ्या समजुतीप्रमाणे तिलाच आता अनावर झोप आल्यामुळे, सगळ्या संथा व सूचना उद्या सकाळवर ढकलून देऊन तिने मला अनिद्रेच्या आधीन केलं असंच म्हटलं पाहिजे; कारण जवळजवळ अख्खी रात्र बिछान्यावर उलटसुलट होत राहात, आणि धडधडीत चुकीच्या समजुतींनी व बागुलबुवांनी स्वतःचा छळवाद करून घेत, केवळ थकवा आल्यामुळे शेवटी मी एक प्रकारच्या भासमान गुंगीत जाऊन पडले; आणि मग उशीरा सकाळी तिच्यातून बाहेर येऊन फणफणत्या तापात सापडले: ही घटना परिस्थितीला कलाटणी देणारी अशामुळे ठरली, की हा जो हरामी माणूस मला मरणापेक्षा अनंतपटींनी भयंकर वाटत होता, त्याच्या तावडीतून माझी तात्पुरती का होईना पण सुटका झाली. ह्या कुंटिणीने जुळवून आणलेला व्यवहार पुरा व्हावा व पुढचे प्रयोग सहन करण्याकरिता मला शक्ती यावी, इतपत मला बरं करण्याच्या हेतूने त्या पाताळयंत्री बायांनी माझी जी सहेतुक शुश्रूषा केली, तिचा माझ्या भिडस्त स्वभावावर असा प्रभाव पडला, की माझी प्रकृती सुधारावी म्हणून त्यांनी काळजी घेतली एवढंच नव्हे तर माझ्यावर घाणेरडा अतिप्रसंग करून माझ्या आजारपणाला कारणीभूत झालेल्या त्या लुटारूचं नुसतं नावही जरी घेतलं तरी माझी मती फिरते हे पाहून त्याला माझ्यासमोर येऊ दिलं नाही, ह्या त्यांच्या उपकारांमुळे माझ्यावर त्यांचं ऋण आहे असं मला वाटू लागलं.

तरुणपणी उभारी पटकन येते, तेव्हा माझ्या तापाचा जोर कमी होण्याकरिता काही दिवसच पुरेसे होते; पण मी खडखडीत बरी होऊन मला पुन्हा जगण्याची उमेद वाटू लागण्यात अगदी योग्य वेळेला मिळालेल्या एका बातमीचा फार उपयोग झाला ती अशी, की मोठा व्यापारउदीम सांभाळणाऱ्या मिस्टर क्रॉफ्टला काहीतरी बेकायदेशीर धंदा चालवल्याच्या आरोपावरून अटक झालेली होती, जवळजवळ चाळीस हजार पाउंड रकमेचा हा प्रश्न होता; आणि त्याला तडकाफडकी तुरुंगात डांबलेलं असून तिथून तो लगबग करून बाहेर येण्याची काहीही शक्यता नसल्यामुळे त्याचे सगळेच व्यवहार इतके कमालीच्या वांध्यात होते, की तशी इच्छा जरी असती तरीदेखील पुन्हा माझ्यावर डोळा ठेवणं आता त्याच्या शक्तीबाहेर होतं.

आगाऊ देऊन अगदीच फुकट घालवलेल्या त्याच्या पन्नास गिन्न्या मिसेस ब्राउनने मुठीत दाबलेल्या होत्या, आणि बाकीच्या शंभरांची आशा मात्र पुरती गमावली होती, तेव्हा ह्या माणसाची जी संभावना मी केली त्याकडे ती आता अधिक उदार दृष्टीने पाहू लागली; आणि माझा स्वभाव अतिशय गरीब व त्यांच्या शब्दांबाहेर न जाणारा आहे असं त्यांच्या लक्षात आलेलं असल्यामुळे, मिसेस ब्राउनच्या दिग्दर्शनानुसार निमूटपणे वागायला मी राजी होईन अशी माझी मनस्थिती घडावी ह्या दृष्टीने माझ्याशी संभाषण करण्याची संथा देऊन, तिच्या कळपातल्या सर्व मुलींना माझी भेट घ्यायला पाठवण्यात आलं. अशा रीतीने त्यांना माझ्या अंगावर सोडून दिलं जाताच, डोकं हवेत असलेल्या त्या टवळ्या ज्या टिवल्याबावल्यांत आणि उथळ हसण्याखिदळण्यात आपला रिकामा वेळ घालवीत, त्यामुळे मला त्यांच्या अवस्थेची आकर्षक बाजूच फक्त दिसून त्यांच्याबद्दल असूया उत्पन्न झाली; तीदेखील या थरापर्यंत, की त्यांच्यापैकीच एक होणं हीच माझी महत्त्वाकांक्षा बनली, आणि ती त्यांनी फार काळजीपूर्वक जोपासली देखील; परिणामी आता माझी एवढीच इच्छा उरलेली होती की आपण पूर्ण बऱ्या व्हावं, जेणेकरून दीक्षासमारंभ करून घेता येईल.

ज्या माझ्या जन्मजात निरागसपणाला शिक्षणाचा मूलाधार मिळालेला नव्हता, त्याला नासवण्याच्या कामी त्या घरातलं संभाषण व प्रत्यक्ष वर्तनाचे दाखले, म्हणजे थोडक्यात सर्वच गोष्टी कारणीभूत झाल्या; आणि याचबरोबर, निदान माझ्या वयात जिला पेट घ्यायला वेळ लागत नाही अशा ज्वालाग्राही कामेच्छेने माझ्या अंगात अनागोंदी मांडली; माझ्यात शिकवणुकीमुळे नव्हे तर केवळ सवयीने आलेली जी काही नैसर्गिक शालीनता होती, ती सूर्याच्या उष्णतेत सापडलेल्या दवाप्रमाणे उडून जाऊ लागली; आणि अर्थात, बाहेर घालवून दिलं तर पोटाचे फाके पडतील ही जी सततची

भीती मला होती, तिच्यापोटी गरजेचं रूपांतर मी कुमार्गात केलं.

मी आता जवळजवळ पूर्ण बरी झाले होते, आणि दिवसातल्या काही ठराविक वेळांत मला घरभर हिंडण्याची मुभा होती, पण लॉर्ड बी– जोपर्यंत बाथहून परत येत नाही तोपर्यंत मी कुणा पाहुण्याच्या दृष्टीस पडणार नाही अशी खबरदारी घेण्यात येत असे; कारण अशा प्रकारच्या पूर्वप्रसंगी लॉर्ड बी– ने आपल्या औदार्याचा प्रत्यय आणून दिलेला असल्यामुळे, ज्याची काल्पनिक किंमत फार मोठी असते अशा ह्या माझ्या दागिन्याची बोली त्याला प्रथम विचारण्याचं मिसेस ब्राउनने ठरवलेलं होतं; आणि लाटसाहेब पंधरवड्याच्या आतच लंडनमध्ये हजर होतील अशी अपेक्षा असल्यामुळे, तोपर्यंत माझं रूप व यौवन अगदी पहिल्यासारखं परत आलेलं असेल, आणि मिस्टर क्रॉफ्टबरोबर केला होता त्यापेक्षा जास्त चांगला सौदा करण्याची संधी मिळेल, असा तिचा अजमास होता.

मध्यंतरीच्या काळात, ज्याला पूर्ण कह्यात घेणं म्हणतात तशी माझी गत केली गेलेली होती, आणि त्यांनी घातलेल्या शिळेबरहुकूम मी इतकी पाळीवपणे वागत होते, की माझ्या पिंजऱ्याचं दार उघडलं असतं तरीदेखील आपण आहोत तिथे थांबून राहण्याऐवजी कुठेतरी उडून जावं असं माझ्या मनात बिलकुल आलं नसतं; पण इतकंच नव्हे, तर माझ्या परिस्थितीबद्दल खंत करण्याचीही अक्कल माझ्यात नव्हती. याउलट मिसेस ब्राउनच्या करवी माझी काय सोय लागते याची मी गुपचूप वाट पाहात राहिले; आणि तिच्या बाजूने मात्र, माझ्या भवितव्याविषयीचे माझ्या मनातले सर्व चिकित्सक विचार सुस्तावून झोपी जातील, याची गरजेपेक्षा बरीच जास्त काळजी तिने व तिच्या हस्तकांनी घेतलेली होती. नीतिमत्तेच्या खोट्या नियमांची पढवणूक, झगमगीत रंगांत चितारलेली फुलपाखरी आयुष्याची चित्रं, मिठ्या, कोडकौतुकं व प्रलोभनं; थोडक्यात काय, तर मी पूर्णपणे ताटाखालची मांजर बनून जावं, आणि अधिक चांगला सल्ला घेण्याकरिता तिथून कुठेही बाहेर जाऊ नये, या दृष्टीने कशाचीच कमतरता ठेवली गेली नाही. आणि दुर्दैव असं, की मला तशा काही आकांक्षादेखील नव्हत्या.

आत्तापर्यंत माझी वृत्ती बिघडवण्याचं श्रेय केवळ त्या घरातल्या पोरींनाच होतं: ज्यामध्ये शालीनतेची फारशी पत्रास ठेवलेली नाही अशी त्यांची मिटक्या मारत केलेली बोलणी आणि पुरुषांबरोबर आपण कायकाय करणार आहोत याची वर्णनं, यांमुळे त्यांच्या व्यवसायाचं स्वरूप व त्यातल्या खुब्या याबद्दल मला सर्वसाधारण कल्पना आलेली होती, आणि उसळणाऱ्या उष्णोत्साही रक्ताची एक खाज त्याच वेळी त्यांनी माझ्या प्रत्येक धमनीतून खवळून उठवली होती: पण याहीपेक्षा, जिची मी निकटची

शिष्या होते त्या माझ्या शैयासोबतीण फीबीने, सुखाचे पहिले थेंब मी चाखावेत याकरिता आपलं कौशल्य खर्ची घातलं: इतक्या मनोवेधक नवनव्या गोष्टी सापडू लागल्यामुळे ज्या नैसर्गिक उर्मी उफाळून येऊन अधिक भुकेजू लागल्या होत्या, त्यांमुळे चाळवली गेलेली उत्सुकता फीबीने आपलं कसब वापरून आणखी वाढवली, आणि तिच्याच सुचवण्यावरून मला एका प्रश्नाकडून दुसऱ्या प्रश्नाकडे हात धरून घेऊन जात, शुक्राच्या अधिपत्याखाली येणाऱ्या त्या प्रांतातली सारी रहस्यं मला समजावून सांगितली. पण तिने दिलेल्या माहितीच्या आधारे मी ज्या कल्पना केलेल्या होत्या, त्यांपेक्षा अधिक काही प्रत्यक्षात पाहायला मिळू नये, हे अशा घरात राहून शक्य नव्हतं.

मी आता तापातून पुरती बरी झाले असताना, एके दिवशी दुपारी बाराच्या सुमारास काही कारणाने मिसेस ब्राउनच्या सामानाच्या खोलीत होते; तिथे खिडकी नसल्यामुळे आत अंधार होता, आणि मोलकरणीच्या लाकडी फळीवजा पलंगावर मी आराम करीत पडून राहिल्याला अर्धा तासही झाला नसेल, तेव्हाच ह्या खोलीपासून जी शेजारची बेडरूम फक्त काचेच्या दुहेरी दाराने विभागलेली होती, तिथे मला कसलीतरी खसपस ऐकू आली; या काचांवर मुसलमानी पद्धतीची वीण असलेले दोन पिवळे पडदे सरकवलेले होते, पण त्या खोलीतलं सगळं दृश्य ह्या खोलीतून दिसायला अडथळा व्हावा इतके ते एकमेकांना चिकटलेले नव्हते. लागलीच मी गुपचूप तिथपर्यंत जाऊन, मला सारं काही बारकाईने दिसेल पण मी कुणाला दिसणार नाही अशा रीतीने मोर्चेबांधणी केली; आणि आतमध्ये कोण आलंय हे पाहते तो काय, साध्वी गुरुमाता स्वत:च उपस्थित झालेल्या होत्या! अशा प्रकरणांच्या बाबतीत लंडनमधली ही जी सर्वाधिक अनुभवसंपन्न स्त्री, तिच्या खास निवडीचा, हर्क्यूलीसच्या नमुन्यावर घडवलेला, उंचनिंच व पिळदार स्नायूंचा असा एक घोडदळातला तरणाबांड शिपाई, तिचा हात धरून तिला आत घेऊन येत होता.

आवाज झाल्यामुळे माझ्या उत्सुकतेचा बोभाटा होऊ नये, किंवा बाईसाहेब स्वतः इकडे येऊ नयेत, याकरिता मी केवढी अळीमिळी गुपचिळी उभी होते म्हणून सांगू! पण या दोहोंपैकी कुठल्याच गोष्टीला धास्तावण्याची फारशी गरजही नव्हती, कारण या क्षणी तिच्यासमोर असलेल्या चिंतनविषयात ती एवढी गर्क होती, की इतर ठिकाणी देण्यासाठी तिच्याकडे अवधान शिल्लक नव्हतं. ही बेंगरूळ लठ्ठ मूर्ती बिछान्यात पायाकडच्या बाजूला धबक्कन बसलेली पाहणं मोठं मौजेचं होतं; आणि ती अशी माझ्या खोलीच्या दारासमोरच होती, की जेणेकरून तिची सारी सौंदर्यस्थळं मला अगदी पुरेपूर समोरून दिसावीत.

तिचा प्रियतम तिच्या शेजारी बसला: ह्या माणसाची शब्दसंपत्ती थोडी व भूक मोठी असावी; कारण लागलीच मुद्द्याला हात घालून त्याने तिची चांगली लसलसून चुंबने घेतली, आणि तिच्या स्तनांमध्ये आपले हात खुपसून ते त्यांच्याभोवती नाड्या लावून आवळून बांधलेल्या कापडी टरफलातून मोकळे केले; बंदिवासाविषयी तुच्छता व्यक्त करीत ते बाहेर फुटले, आणि किमान तिच्या बेंबीपर्यंत तरी लोंबून खाली आले. इतकी प्रचंड व खराब रंगाची जोडी माझ्या डोळ्यांनी पूर्वी कधीच पाहिली नव्हती; हे उभयता मलूल आणि मऊसर असून प्रेमाने एकमेकांत मिसळून गेलेले होते, पण ज्याची अभिरुची फारशी चोखंदळ नाही असा हा माणूस, ते जसे असतील तसे मोठ्या बीभत्स जोशाने पंजाळीत होता, आणि मटणाच्या सांध्यापेक्षा ज्याचा विस्तार फारसा कमी नाही अशा आपल्या हाताने त्यातला एखादा पकडता किंवा झाकता येतो का, हे पाहण्याचा वृथा प्रयत्न करीत होता. जणू काही त्यांची तितकी योग्यता असावी अशा मिषाने त्यांच्याशी थोडा वेळ चाळा करून त्याने तिला झटक्यात आडवी केली; आणि तिचा पेटिकोट वर उचलून, ज्याच्यावर लाजल्यामुळे नव्हे तर ब्रँडी ढोसल्यामुळे लालिमा आलेला आहे, अशा तिच्या रुंदाड चेहऱ्याला पुरेल न पुरेलसा मुखवटा तयार केला. तो मिनिटभर बाजूला उभा राहून आपल्या कोटाची व पाटलोणीची बटणे काढीत असताना, तिच्या जाडजूड, मांसल मांड्या ओघळून खाली येऊन, तिथलं सारं तुपाळ निसर्गचित्र माझ्या दृष्टीसमोर खुलं झालं; आणि जिच्यावर राखाडी रंगाच्या झुडपाची सावली पडली आहे, अशी तोंड वासलेली एक रुंदट भेग, अन्न मागणाऱ्या भिकाऱ्याच्या कटोरीप्रमाणे पुढे धरल्यासारखी दिसू लागली.

पण लवकरच एका याहीपेक्षा अधिक लक्षवेधी वस्तूने माझे दोन्ही डोळे खेचून घेऊन पूर्णपणे काबीज केले. तिच्या दमदार घोड्याने आता आपल्या पाटलोणीची बटणं सोडून, नागवं, टणटणीत व उभारी धरलेलं त्याचं चमत्कृतीपूर्ण अवजार बाहेर काढलं होतं; असं काही मी पूर्वी पाहिलं नसल्यामुळे, आणि माझ्या स्वत:च्या सुखाचं सिंहासन या प्रकारात फारच रस घेऊ लागल्यामुळे, मी डोळे फाडफाडून त्याच्यावर लावून धरले: पण माझ्या संवेदनांचा गोंधळ इतका वाढला होता, आणि माझ्यामधील चूड लागलेल्या बिंदूमध्ये इतक्या घनतेने त्या एकत्र आल्या होत्या, की ह्या यंत्राचा सर्वसाधारण आकार व रचना यापलीकडे काही डोळ्यांत साठविणं मला शक्य झालं नाही; तरीदेखील तेवढ्याच आधारावर, यापूर्वी जे काही मी ऐकलं होतं त्यापेक्षाही माझ्या निसर्गदत्त ऊर्मींकडूनच मला अशी स्पष्ट सूचना मिळाली, की एकमेकांत चपखल बसतील अशा बनवलेल्या त्या दोन अवयवांच्या संयोगामध्ये त्याने जे परमोच्च सुखाचं निधान ठेवलेलं आहे, ते मला ह्याच वस्तूकडून मिळणार आहे.

पण यापुढे फार वेळ न दवडता ह्या तरण्याबांड गड्याने हे हत्यार परजण्याच्या मिषाने म्हणून दोनतीनदा हलवलं, आणि तो तिच्या अंगावर कोसळला; तेव्हा मला पाठमोरा असलेल्या अवस्थेत तो ज्या दिशेने हलत होता ती विचारात घेता, इतकं ढळढळीत लक्ष्य चुकणं शक्य नसल्यामुळे, तो वेढला गेला असावा असा फक्त अप्रत्यक्ष निष्कर्ष मी काढू शकले; आता बिछाना असा गदगदा हलू लागला आणि पडदे असे करकरू लागले, की हा कार्यभाग चालू असताना सुरवातीपासून शेवटापर्यंतचे त्यांचे सुस्कारे व कुजबुजणं, सोडलेले उच्छ्वास व टाकलेल्या धापा, हे सारं मला कसंबसंच ऐकता येत होतं; ह्या दृक्-श्राव्य महोत्सवाने मी अंतर्बाह्य मोहरून गेले, आणि माझ्या शरीरातील हरएक धमनीतून वितळलेला विस्तव गोलगोल फिरू लागला: भावना अशा बेफाम झाल्या, की माझा श्वास जवळजवळ थांबला.

माझ्या मैत्रिणींच्या संभाषणांतून आणि फीबीच्या काटेकोर तपशीलवार वर्णनांतून मला पूर्वकल्पना मिळून माझ्या मनाची तयारी झालेलीच असल्याकारणाने, अशा प्रकारच्या दृश्याने माझ्या जन्मजात निरागसतेला शेवटचा प्राणघातक रट्टा द्यावा यात आश्चर्य नाही. हे दोघे रणधुमाळीच्या ऐन भरात असताना, केवळ माझ्यातल्या प्राकृतिक प्रेरणांच्या सांगण्यावरून मी माझा हात हलकेच पेटिकोटाच्या आत सरकवला, आणि बोटांनी पेट घेतलेला आहे अशा अवस्थेत माझ्या साऱ्या संवेदनांचं केन्द्रस्थळ हस्तगत करून अधिकच प्रज्वलित केलं: जणू काही स्तनांतून बाहेर उडी मारून येईल अशा प्रकारे माझं हृदय धडधडू लागलं, श्वास घेताना मला दुखू लागलं, मी मांड्या वेळावल्या आणि अजूनही अज्ञात असलेल्या त्या चिरेचे ओठ दाबून, आवळून धरले; फीबी ज्याप्रकारे तिथे हाताने कारागिरी करीत असे त्याचं यांत्रिक अनुकरण करून, जितक्या आतपर्यंत शिरकाव करणं शक्य होतं तिथपर्यंत तो केला, आणि सुखाचं माप ओसंडून जाताच ज्यामध्ये निसर्ग विरघळून शेवटी विलीन होतो, तो वितळत्या द्रवाचा ओघ, तो नेमका वेदनास्फोट, स्वत:वर ओढवून घेतला.

इतकं झाल्यानंतर, माझ्यासमोरच्या या नशीबवान जोडप्यामधली उरलेली देवाणघेवाण न्याहाळता यावी इथपर्यंत माझ्या संवेदना पुन्हा एकदा शांत झाल्या होत्या. हा गडी घोड्यावरून खाली उतरताच, आत्ताच मिळालेल्या खुराकामुळे नक्कीच शक्ती येऊन तरुणीला शोभेलशा चपळाईने म्हातारी एकदम टुणकन उठली; त्याला खाली बसवून त्याची चुंबने घेऊ लागली, त्याच्या गालांवर थापट्या मारून चिमटे काढू लागली, त्याच्या केसांशी चाळा करू लागली: आणि ह्या साऱ्याचं त्याने ज्या कमालीच्या बेफिकीरीने थंडं स्वागत केलं, त्यावरून हे मला दिसून आलं की सुरवातीला चढाईवर जाताना तो जसा होता त्यापेक्षा आता खूपच पालटलेला आहे.

पण माझी सदाचरणी मुख्याध्यापिका आणखी कुमक मागविण्याला नाक मुरडणाऱ्यांपैकी नसल्यामुळे, तिने बिछान्याजवळच्या एका लहानशा पेटीचं कुलूप उघडून दारू बाहेर काढली, आणि त्याला एक चांगला मोठ्ठा घोट पाजून आपल्यावरची निष्ठा सिद्ध करायला लावली: हा प्रकार संपून पुढे थोडंफार प्रेमळ संभाषण झाल्यानंतर बाईसाहेब पूर्वीसारख्याच बिछान्यात पायाच्या बाजूला बसल्या; आणि हा तरणा गडी तिच्या शेजारी उभा असताना, तिने धडधडीत निलाजरेपणाने त्याच्या पाटलोणीची बटणं सोडून, त्याचा सदरा बाजूला करून प्रकरण बाहेर ओढून काढलं, तेव्हा ते इतकं सुरकुतलेलं व खचून गेलेलं होतं, त्यातला सारा स्वाभिमान नष्ट होऊन त्याला डोकंही इतक्या अशक्तपणेच वर काढता येत होतं, की त्याच्या आत्ताच्या व पूर्वीच्या अवस्थेतला फरक मला जाणवल्याखेरीज राहिला नाही: पण आमच्या अनुभवी मातादीदींनी लवकरच त्याला हातांनी चाळवून, मला पूर्वी दिसलं होतं तेवढ्याच आकाराला व ताठरपणाला ते फुगून येईल, अशी व्यवस्था केली.

आणि मग पुन्हा एकदा नव्याने व अधिक बारकाईने केलेल्या निरीक्षणांती, पुरुषाच्या शरीरातला हा राजधानीचा प्रदेश कसा दिसतो याचं मला साश्चर्य कौतुक वाटू लागलं: टोपी काढून उभं असलेलं ते ज्वालेसारखं लालभडक डोकं, कांबीचा तो गोरेपणा, त्याच्या मुळाशी फोफावलेले किरमिजी रंगाचे कुरळे केस, तिथून खाली लोंबणारी गोलसर पिशवी, ह्या साऱ्या गोष्टींनी माझं उत्सुक लक्ष पुरेपूर वसूल करून घेतलं आणि माझ्यातला विस्तव पुन्हा प्रज्वलित केला. पण त्या कामसू बाईने हा मुख्य समारंभ जिथपर्यंत आणण्यासाठी इतके कष्ट घेतले होते तिथपर्यंत तो येऊन ठेपलेला असल्यामुळे, आपल्या कामाचा मोबदला मिळण्याकरिता आणखी खोळंबा होऊ देण्याच्या मनस्थितीत ती नव्हती; तेव्हा स्वत: खाली पडून तिने हळूच त्याला आपल्या अंगावर ओढून घेतला, आणि मघाच्याच रीतीने त्यांनी पुन्हा एकदा ह्या पारंपरिक गोंधळाचा पलिता विझवला.

हे प्रकरण संपताच ते दोघे एकमेकांना प्रेमाने बिलगून एकत्र बाहेर गेले, पण त्याआधी (मला जितपत पाहता आलं त्यावरून) म्हातारीने त्याला बक्षीस म्हणून तीनचार नाणी दिली. त्याच्या कार्यक्षमतेमुळे तो तिचा विशेष आवडता होता इतकंच नव्हे, तर तिथे कंत्राटावरच होता; आणि मी त्याच्या नजरेला पडू नये म्हणून बाईने आत्तापर्यंत बरीच दक्षता घेतलेली होती, कारण न जाणो माझे लाटसाहेब येईपर्यंत त्याला धीर धरवला न जाऊन आधीच त्यांच्याकरिता शबरीप्रमाणे चाखून पाहण्याचा जर त्याने आग्रह धरला असता, तर बाईवर त्याचा मोठा दबाव असल्यामुळे नाही म्हणणं तिला शक्य झालं नसतं; घरातली प्रत्येक मुलगी कधी ना कधीतरी त्याच्या पुढ्यात येतच असे, आणि त्याला

दिल्या जाणाऱ्या वेतनाचा मान राखायचा म्हणून म्हातारीला अध्येमध्ये क्वचित संधी मिळे; एकूण पाहता, पैशाच्या बदल्यात तो पुरेसं काम करीत नाही असा आरोप करायला मुळीच वाव नव्हता.

हे दोघे जिना उतरून खाली जाताना मी ऐकले न ऐकले, तोच हलक्या पावलांनी माझ्या खोलीत परत गेले (मी तिथे नसल्याचं सुदैवाने कुणाच्या लक्षात आलेलं नव्हतं); या ठिकाणी मला थोडा मोकळेपणी श्वास घेता येऊ लागला, आणि अशा प्रकारच्या भेटीचं दृश्य पाहिल्यामुळे माझ्यामध्ये जो उष्ण संवेदनांचा कल्लोळ उठला होता, त्याला वाट देता आली. मी बिछान्यावर अंग ताणून पडून राहिले, आणि माझ्यामध्ये पुन्हा एकदा धगधगू लागलेल्या अभिलाषांच्या संतप्त कोलाहलाचा निचरा करण्याकरिता अथवा तो शमविण्याकरिता काही ना काही तोडगा सापडावा अशी कळवळून याचना करू लागले; पण त्या साऱ्या एकाच ध्रुवाकडे स्पष्ट निर्देश करीत होत्या, आणि तो म्हणजे 'पुरुष'. माझ्या जागेपणीच्या स्वप्नात माझ्या हाती लागलेलं काहीतरी शोधते आहे अशा आविर्भावात मी बिछान्यात चाचपडून पाहू लागले; आणि ते मला न गवसल्यामुळे निराश होऊन रडण्याच्याच बेतात होते, कारण माझ्या शरीराचा प्रत्येक भाग चेतवणाऱ्या धगीने प्रदीप्त झालेला होता.

काही वेळ जाताच, मी शक्य असलेला एकमेव उपाय म्हणजेच आत बोटं घालण्याचा फोल प्रयत्न केला, पण रंगमंच अजून लहान असल्यामुळे त्यावर फारसं नाट्य घडायला पुरेशी जागा नव्हती, आणि आत शिरण्याचा प्रयत्न करणाऱ्या माझ्या बोटांमुळे मला तात्पुरतं किरकोळीचं सुख जरी मिळालं असलं, तरीदेखील बरोबरीने ज्या वेदना झाल्या त्यांनी एका भीतीचं बीज माझ्या मनात पेरलं; तेव्हा  फीबीपर्यंत ती पोहोचवून तिच्याकडून स्पष्टीकरण मिळवल्याखेरीज आता माझ्या जिवाला स्वस्थता वाटणार नव्हती. पण मी झोपी गेल्यानंतर बराच वेळ फीबी बिछान्यात न आल्यामुळे, ही संधी दुसऱ्या दिवशीच्या सकाळपर्यंत आली नाही. मात्र आम्ही दोघीही जाग्या होताच, लोळत लोळत केलेल्या आमच्या गप्पा मला अस्वस्थ करणाऱ्या विषयावर मी आणून पोहोचवणं साहजिकच होतं: आणि मी योगायोगाने ज्या प्रेमप्रसंगाला साक्षी राहिलेले होते, त्याचा वृत्तांत इथे प्रस्तावना म्हणून माझ्या उपयोगी पडला.

अनेकदा हास्याचे चीत्कार करून मध्येमध्ये अडथळे आणल्याखेरीज तो शेवटपर्यंत ऐकणं फीबीला अशक्य झालं, आणि वर्णन करून सांगण्याच्या माझ्या निरागस पद्धतीमुळे त्याच्या विनोदीपणात भर पडायला झालेली मदत कमी नव्हती. पण हे सगळं पाहून मला काय वाटलं हे ती माझ्याकडून काढून घेऊ लागताच, माझ्यात त्यामुळे उद्भवलेल्या सुखकारक भावना कमी करून सांगण्याचा अथवा

दडवण्याचा जरी मी प्रयत्न केला नाही, तरी त्याचवेळी तिला म्हणाले की एका गोष्टीबद्दल मला फार गहन शंका आहे. "खरंच?!", ती म्हणाली, "कशाबद्दल?" मी म्हणाले, "ह्या महाप्रचंड रुळाचा आकार मी जेव्हा फार बारकाईने व उत्सुकतेने निरखून पाहिला, तेव्हा निदान माझ्या धसकलेल्या कल्पनाशक्तीला तरी तो माझ्या मनगटापेक्षा कमी जाड वाटला नाही, आणि त्याची लांबी माझ्या वितीच्या किमान तिप्पट होती; तेव्हा ज्या माझ्या लहानखुऱ्या नाजुक अवयवाने तो स्वीकारावा अशी अपेक्षा आहे, त्याच्याशी तुलना केल्यानंतर, भयंकर वेदना होऊन मरून गेल्याखेरीज त्याला आत घेणं शक्य आहे असं मला तरी वाटत नाही, कारण तिथे बोट घातलं तरी मला किती अतोनात दुखतं हे तुला माहित आहे... आता माझ्या मालकिणीच्या व तुझ्या बाबतीत याचं माप माझ्यापेक्षा वेगळं आहे हे अनुक्रमे दृष्टीला आणि स्पर्शाला सहज कळून येतं; तेव्हा थोडक्यात काय, तर संभाव्य आनंद कदाचित मोठा असेलही, पण तरीही ह्या प्रयोगात दुखेल किती याची मला धास्ती वाटते."

हे ऐकून फीबी दुप्पट जोराने हसू लागली, आणि ह्या प्रकरणी मला वाटत असणाऱ्या भीतीचं व शंकांचं व्यवस्थित निराकरण होईल अशी माझी अपेक्षा असताना, ती मात्र मला इतकंच म्हणाली की त्या भयंकर अस्त्राने तिथल्या अवयवाला प्राणघातक जखम झाली अशी बातमी मी तरी कधीही ऐकलेली नाही, आणि तुझ्याइतक्याच नाजुक व तुझ्यापेक्षाही वयाने लहान अशा काही मुली ह्या शस्त्रक्रियेतून जिवंत बाहेर आलेल्या मला ठाऊक आहेत – जास्तीतजास्त काय तर तुला थोडं जास्त दुखेल; आता हे खरं आहे की नैसर्गिक जडणघडण, बाळंतपणं, राकट अवजारांमुळे झालेली सततची ओढाताण, अशा कारणांमुळे स्त्रियांतल्या त्या जागी आकाराचे सगळे नमुने आढळतात; पण एका ठराविक वयाच्या व धाटणीच्या मुलींबाबतीत, काही कृत्रिम युक्ती केलेली नाही व गोष्टी निसर्गतः असायला हव्यात तशाच आहेत असं गृहीत धरूनही, बाई कोण आणि कुमारिका कोण हे या क्षेत्रात मुरलेल्यांनासुद्धा ओळखू येत नाही: आता योगायोगाने असा एक प्रसंग तुला दिसलाच आहे, तर तसाच दुसरा मी तुला दाखवत्ये; जेणेकरून यावेळी तुझ्या डोळ्यांना जास्त चांगल्या चवीचं खायला मिळेल, आणि विजोड आकाराबद्दलच्या तुझ्या ज्या भ्रामक कल्पना आहेत त्यांचा निरास व्हायला पुष्कळच मदत होईल.

मग तिने मला विचारलं, "तुला पॉली फिलिप्स ठाऊक आहे ना?" मी म्हणाले, "प्रश्नच नाही! मी आजारी होते तेव्हा त्या गोड मुलीने माझी फार काळजी घेतली होती, आणि ह्या घरात येऊन तिला दोनच महिने झाल्याचं तू मला सांगितलेलं आहेस." फीबी म्हणाली, "तीच ती. तुला कितपत ठाऊक आहे मला माहित नाही, पण जेनोआच्या एका तरुण व्यापाऱ्याने तिला ठेवलेली आहे; हा पोरगा त्याच्या गडगंज श्रीमंत काकाचा लाडका पुतण्या आहे. काही हिशेब चुकते करण्याच्या सबबीवर

काकाने त्याला स्वत:च्या एका इंग्रजी व्यापारी मित्रासोबत इथे इंग्लंडात पाठवलेला आहे, पण आपल्या पुतण्याची प्रवास करण्याची व जग पाहण्याची हौस पुरवावी असा यामागचा अंतस्थ हेतू आहे. कुठल्यातरी पार्टीमध्ये एकदा पॉली त्याला दिसली, तो तिच्यावर भाळला, आणि ती फक्त त्याच्याकरिताच राहावी एवढा मोबदला तो तिला देतो. आठवड्यातून दोनतीनदा तो तिच्याकडे येतो, पहिल्या मजल्यावरच्या तिच्या खोलीत ती त्याला भेटते, आणि त्याच्या देशातल्या उष्ण हवामानामुळे किंवा कदाचित तिथल्या विवक्षित चालीरीतींमुळे त्याची रुची जशी घडलेली आहे, तिला अनुसरून तो तिचा आनंद घेतो. उद्या त्यांचा दिवस आहे, तेव्हा तुझ्या मालकिणीला व मलाच ठाऊक असलेली अशी एक जागा आहे, तिथून तुला त्यांच्यात कायकाय चालतं हे पाहायला मिळेलच; आता यापेक्षा जास्त काही मी बोलत नाही."

माझी जी अडचण झाली होती ती विचारात घेता, या बेताला माझी हरकत नव्हती व तो तडीस नेण्यासाठी मी एका पायावर तयार होते, हे सांगायला नकोच. दुसऱ्या दिवशी संध्याकाळी पाच वाजता, मी आपल्या खोलीत एकटीच बसलेले असताना, वचनाला जागून फीबी अगदी वेळेवर तिथे आली, आणि तिने मला आपल्यामागून चलण्याची खूण केली. मागच्या जिन्यावरून आम्ही अतिशय हलक्या पावलांनी खाली गेलो, आणि जुनाट टेबलखुर्च्या व दारूच्या बाटल्यांची खोकी ठेवलेल्या त्या छोट्याशा अंधाऱ्या फडताळाचं दार उघडून फीबीने तिच्यामागून मला आत घेतलं; एकदाचं दार लावून घेतल्यानंतर, आमची खोली व जिथे घडामोडी घडणार आहेत ती शेजारची खोली, यांमध्ये असलेल्या तावदानातल्या एका लांबलचक भेगेतून येणारा तेवढाच काय तो प्रकाश आत शिरत होता; आणि त्यामुळे ह्या बसक्या खोक्यांवर ठाण मांडून, तावदानाची पट्टी दुसऱ्या बाजूला वाकडी होऊन तयार झालेल्या भेगेला डोळे चिकटवताच, स्वत:चा मागमूसही लागू न देता, पलिकडच्या वस्तू आम्ही अगदी सहज व स्पष्टपणे पाहू शकत होतो.

तिथे दिसलेली पहिली व्यक्ती म्हणजे मला पाठमोरा उभा राहून एका चित्राकडे बघणारा तो तरुण. पॉली अजून आलेली नव्हती: पण एका मिनिटाभरातच दार उघडलं आणि ती आत आली; दाराचा आवाज होताच तो मागे वळला, आणि आनंदून जाऊन अतिशय मृदू आविर्भावाने तिला भेटायला पुढे गेला. भेटीचे प्राथमिक उपचार संपल्यानंतर तो तिला आमच्यासमोर पसरलेल्या दिवाणापर्यंत घेऊन गेला, दोघेही त्यावर बसले, आणि या जेनोवीज तरुणाने तिला एक ग्लासभर वाईन व त्याबरोबर एका प्लेटमध्ये नेपल्सची बिस्किटे आणून दिली. काही चुंबनांची देवाणघेवाण झाल्यानंतर, आणि एका बाजूने तोडक्यामोडक्या इंग्रजीत वास्तपुस्त करून झाल्यानंतर तो आपल्या कपड्यांची बटणे काढू

लागला, आणि आतल्या सदऱ्यापर्यंत तो आता उघडा झाला. सगळे कपडे काढून टाकण्याकरिता जणू काही हा ठरलेला संकेत असावा (आणि उष्म्याचे दिवस असल्यामुळे हीच योजना अत्यंत रास्त होती), अशा प्रकारे पॉली आपल्या पिना उचकटून काढू लागली, आणि बंद सोडण्यासाठी तिच्या अंगावर बॉडीस नसल्यामुळे, तिच्या प्रेमिकाने आपल्या कर्तव्याला जागून केलेली मदत स्वीकारून तीसुद्धा पटकन आतल्या सदऱ्यावर उतरली. हे पाहताच लगेच त्याने आपली पाटलोण सैल केली, आणि घोट्यांवरून सरकवून सरळ काढून टाकली; त्याच्या सदऱ्याच्या कॉलरचीही बटणे निघाली: यानंतर पॉलीला उत्तेजन म्हणून एक चुंबन देऊन आता त्याने तिचा सदरा तिच्या अंगावरून जणू काही हलकेच चोरून घेतला, पण माझ्या तर्कानुसार त्याच्या ह्या लहरीला ती परिचयाने सरावलेली होती; परिणामी ती जरी थोडीशी लाजली असली, तरीदेखील निसर्गाने मूलत: जशी निर्माण केलेली होती तशीच्या तशी पूर्ण नग्नावस्थेत उभी असलेली तिची छबी, झगझगीत गोऱ्याशुभ्र मानेवर व खांद्यांवर रुळून खाली ओघळणारे मोकळे काळेभोर केस, आणि ज्यांत गालांचा दाट लालिमा कलेकलेने चमकत्या बर्फात परिवर्तित होतो आहे अशासारख्या बदलत्या रंगछटा व लकाकी असणारी तिची कांती, हे सारं यक्षयोनीतून अवतरलेलं रूप पाहताच मीच जास्त लाजले.

ह्या मुलीचं वय अठराच्या पलीकडे नसावंच: तिचा चेहरा नीटस व गोड होता, बांधा विलक्षण देखणा होता; मांसाने लदलदलेले, सुरेख गोलाकार व इतके घट्ट की बॉडीस घालण्याची गरज न पडता त्यांची उभारी कायम राहावी, असे तिचे पिकलेले मोहक स्तन पाहून मला असूया वाटल्याखेरीज राहिली नाही: त्यांची बोंडं दोन वेगवेगळ्या दिशांना नेम धरून आपसांतले मैत्रीपूर्ण मतभेद अधोरेखित करीत होती; आणि त्यांच्याखाली तिच्या पोटाचा जो चविष्टसा सपाट प्रदेश होता, त्याचा शेवट मुश्किलीनेच लक्षात येईल इतक्या छोट्या, आणि शालीनपणे खाली सरकून दोन पुष्ट मांसल मांड्यात आसरा शोधू पाहणाऱ्या भेगेत होत होता: त्याच्या छानदार दर्शनी भागावर पसरून राहिलेले कुरळे केस अत्यंत भरजरी फरच्या कापडाची आठवण करून देत होते: एकूण तिच्या नग्नतेचा ताठा व डौल पाहता, स्त्रीसौंदर्याचा नमुना म्हणून आपल्यासमोर बसण्याकरिता चित्रकारांनी गळ घालावी अशीच खरोखर ती वस्तू होती.

मरणाच्या दारात असलेल्या संन्याशाला चेकाळून उठवतील अशा त्या सौदर्यस्थळांकडे अजून सदऱ्यातच असलेला हा इटालियन पोरगा एकटक भान हरपून पाहात राहिला; त्याच्या लहरीप्रमाणे जसे ती पवित्रे बदलीत होती, तसतसा तो आपल्या हावऱ्या डोळ्यांनी तिला खाऊन टाकीत होता;

आणि या राजेशाही मेजवानीतला त्याच्या हातांचा वाटा चोरून ठेवण्यात आलेला नव्हता, तर अत्यंत नखरेल स्पर्शवेदनेचा अनुभव देण्याची क्षमता असलेल्या तिच्या देहाच्या प्रत्येकन् प्रत्येक अवयवावर सुखाचे सावज शोधीत ते इंचन् इंच भटकत होते. हा प्रकार चालू असतानाच, पडद्यामागची परिस्थिती काय आहे हे दाखवून देणारा त्याच्या सदऱ्याला आलेला फुगवटा नजरेतून सुटण्याइतका नव्हता: पण यापुढे लवकरच त्याने तो सदरा डोक्यावरून सरकवून काढून टाकल्यानंतर, नग्नतेच्या बाबतीत एकमेकांना नावे ठेवायला त्यांना आता वाव उरला नाही.

हा उंच व बांधेसूद तरुण, फीबीच्या अंदाजानुसार, बावीसेक वर्षांचा असावा. त्याचं शरीर देखणं व अतिशय धष्टपुष्ट होतं, खांदे रुंद होते आणि छाती भरदार होती: विशेष टिपणी करण्यासारखं जरी चेहऱ्यामध्ये काही नसलं, तरी नाकाची ठेवण रोमन पद्धतीची होती, आणि डोळे मोठे, काळेभोर व चमकदार होते. याखेरीज गालांत असलेला रक्तिमा विशेष खुलून दिसण्याचं कारण असं, की त्याचा गव्हाळ वर्ण, ज्यातून कसलाच तजेला जाणवू नये अशासारखा काळसर धुळकट नव्हता, तर उलट रसरसता जिवंतपणा प्रदान करणारी एक ऑलिव्ह रंगाची नितळशार चमक त्यामध्ये होती; कदाचित ती शुभ्र गोरेपणाइतकी डोळे दिपवून टाकणारी नसेल, पण ज्यांना ती आवडते त्यांना तीच जास्त आवडते. मागे बांधण्याइतके त्याचे केस लांब नसल्यामुळे त्याच्या आखुडशा गोल बटा कशाबशा मानेपर्यंत खाली जात होत्या; आणि त्याच्या छातीला ताकदीचा व पौरुषाचा आविर्भाव आणण्याकरिता, काही तुरळक केसांचे अंकुर त्याच्या स्तनाग्रांभोवती पखरण करीत होते. मुळापासून मांड्यांभोवती सर्वत्र व पोटावर बेंबीपर्यंत पसरलेल्या कुरळ्या केसांच्या घनदाट जंगलांतून उद्भवलेला त्याचा बडा सुभेदार सरळसोट ताठरपणे उभा होता, आणि आकाराला एवढाला होता की त्याच्या संतापाचं लक्ष्य होऊ घातलेल्या त्या लहानशा नाजुक अवयवाबद्दल सहानुभूती वाटून मी घाबरून गेले; आपला सदरा काढून टाकल्यानंतर त्याने जेव्हा तिला हळूच खाली ढकललं, तेव्हा तिने खुषीने स्वीकारलेली अधोगती झेलण्यासाठी सोयिस्करपणे तो दिवाण शेजारीच उभा होता, आणि परिणामी तिचा हा विशिष्ट अवयव आता मला ढळढळीत सामोरा आलेला होता. तिच्या मांड्या कमाल मर्यादेपर्यंत फाकल्या गेलेल्या होत्या, आणि आता स्त्रीत्वाची व्यवच्छेदक खूण, म्हणजेच लाल रंगाचं केन्द्रस्थान असलेली जी मांसल चीर प्रकट झाली, तिच्या आतल्या बाजूला एखाद्या छोटेखानी चित्रात शोभेलशी एक सुरेख रेषा जांभळणाऱ्या ओठांनी अशी चितारलेली होती, की बरोक चित्रशैलीचा जो सम्राट ग्विदो, त्याच्या हातून उतरलेल्या रंगकुसरीलाही इतकी नजाकत साधली नसती.

इथे फीबीने मला हळूच ढोसून कुजबुजता प्रश्न विचारला, की तुझा आडपडदा याहीपेक्षा लहान आहे असं तुला वाटतं की काय? पण समोरच्या दृश्याने माझं अवधान असं काही झपाटून व लपेटून टाकलेलं होतं, की मी काहीच उत्तर केलं नाही.

आतापर्यंत पॉली दिवाणाच्या रुंदीला समांतर पडलेली होती, पण आता ह्या तरुणाने पुनर्रचना करून तिला लांबीला समांतर केली; तिच्या मांड्या अजून फाकलेल्याच होत्या, आणि निशाण त्याला समोर स्पष्ट दिसत होतं; त्यांच्यामधोमध तो गुडघ्यावर वाकला, आणि क्रोधाने ताठर झालेल्या व सावजाचे दोन तुकडे केल्याखेरीज आपण शांत होणार नाही असा धाक दाखविणाऱ्या त्याच्या अवजाराचं त्याने आम्हाला बाजूच्या अंगाने प्रदर्शन केलं, पण हे सावज मात्र त्या उंचावलेल्या प्रहाराकडे हसत पाहात पडलेलं होतं, आणि नको म्हणतं आहे असं काही दिसलं नाही.

त्याने खूष होऊन आपल्या हत्याराकडे पाहिलं, आणि आमंत्रित करणाऱ्या कपारीपर्यंत त्याला हाताने रस्ता दाखवला; ओठ बाजूला केले, आणि काही ढुशा देऊन पॉलीच्या सहकार्याने ते अर्धंअधिक अंतर आत घुसवलं; पण तिथे ते अडकलं, याचं कारण माझ्या अंदाजानुसार त्याची जाडी वाढू लागली होती: त्याने ते बाहेर काढलं, आपल्या लाळेने किंचित ओलं करून पुन्हा प्रवेश केला आणि आता तलवारीच्या मुठीपर्यंत सहज आत घुसवलं; यानंतरचा पॉलीचा खोल निश्वास, वेदना होत असताना सोडतात त्यापेक्षा फार वेगळा वाटला: त्याचं ढुशी देणं व तिचं वरखाली होणं सुरवातीला सावकाश व तालबद्ध होतं; पण नंतर मात्र काही निश्चित प्रमाण किंवा पद्धत पाळणं अशक्य व्हावं इतका त्यांचा बेभानपणा खवळून उठला; हालचाली एवढ्या वेगाने होऊ लागल्या, आणि चुंबने एवढी उतावळी व हिंस्र होऊ लागली की असा झंझावात फार काळ टिकवून धरणं निसर्गाला शक्य होणार नव्हतं: दोघांपैकी एकालाही स्वत:ची शुद्ध राहिलेली नाही, हे दिसून येतच होतं: त्यांच्या डोळयांतून ठिणग्या पाझरत होत्या: "आई ग!... आई!... आता सहन होत नाही... मी मरते, ग!... मी चालले..." असे अत्यानंदाचे चीत्कार पॉलीने काढले; त्याचा आनंद तुलनेने अधिक अबोल होता; पण यानंतर लवकरच, त्याचं अडखळत पुटपुटणं, हृदयातून वर आलेले निश्वास, तिच्या शरीरात तो जणू काही घुसून बसतो आहे असा शेवटचा प्राणांतिक प्रहार, आणि अखेरीस त्याच्या अवयवांत पसरलेला नि:चेष्ट मंदपणा, या साऱ्यांमुळे अंतिम क्षणाने त्याला घेरल्याची ग्वाही मिळाली; तिनेदेखील रानटी हातवारे करून, डोळे मिटून घेऊन, आणि सुखाच्या कडेलोटात सगळं संपून गेल्याचं सूचित करणारा एक खोल हुंदका सोडून, आपणही यात सहभागी असल्याचा निरोप पोहोचवला.

आपली चढाई संपवून तो तिच्यावरून उठला, तरीदेखील आनंदामुळे श्वास हरपलेला असावा असं वाटायला लावणाऱ्या अवस्थेत किंचितही हालचाल न करता ती स्तब्धपणे पडून राहिली. तिला उठून बसता येत नसल्यामुळे त्याने तिला दिवाणावर पूर्ववत स्थितीत ठेवली; तिच्या मांड्या फाकलेल्याच होत्या, आणि तेथील नव्याने उघड्या पडलेल्या जखमेच्या पूर्वीपेक्षा अधिकच लालभडक चमकणाऱ्या बाहेरच्या ओठांपाशी एक प्रकारचा फेसासारखा पांढरा द्रव खोळंबून राहिलेला मला दिसत होता. आता ती उठली, तिने आपले हात त्याच्या गळ्याभोवती फेकले; आणि आपल्याला हे दिव्य करायला लावल्याबद्दल ती रुष्ट झालेली असावी, असं ती ज्या लाडिकपणे त्याच्याकडे पाहात होती व भोवताली घोटाळत होती, त्यावरून बिलकुल वाटलं नाही. माझ्यापुरतं बोलायचं, तर हा प्रवेश चालू असताना मला अंगभरून काय वाटलं हे नेमकं सांगू पाहण्याचा आव मी आणणार नाही; पण पुरुष हा प्राणी मला जे काही करू शकेल त्याविषयीच्या यच्चयावत बागुलबुवांना मी तत्क्षणी निरोप दिला; आता त्यांनी रिकामी केलेली जागा अशा काही जळत्या अभिलाषांनी आणि मला न जुमानणाऱ्या आर्त कामनांनी व्यापून टाकली होती, की पुल्लिंग धारण करणारा जो कुणी पहिल्यांदा समोर दिसेल त्याला बाहीला धरून खेचून आणून माझं हे कुचकामी टोपण मी देऊन टाकलं असतं; कारण ते गमावल्यामुळे जे मिळणार होतं, त्यासाठी आता मला कळ काढवत नव्हती.

फीबीला अनुभव जास्त होता आणि अशा प्रकारची दृश्ये तितकीशी अपरिचित नव्हती, पण तरीदेखील इतक्या शरीर तापवणाऱ्या प्रसंगाने ती अविचल राहणं शक्य नव्हतं; ऐकू येऊ नये म्हणून ती त्या भेगेपासून मला हळूच बाजूला नेऊन दाराच्या शक्य तितक्या जवळ घेऊन गेली, आणि तिचा प्रत्येक लहानसहान इशारा मी निमूटपणे व आज्ञाधारकपणे पाळीत राहिले. इथे बसायला किंवा आडवं व्हायला जागा नसल्यामुळे तिने मला दाराला पाठ लावून उभं करून माझा पेटिकोट वर नेला, आणि माझ्यातील जो भाग वासनेने व उष्णतेने असा पिसाळून गेला होता की कामज्वराने मी मरायलाच टेकले होते, तिथे तिच्या हावऱ्या बोटांनी भेट देऊन ती शोध घेऊ लागली; त्या मोक्याच्या जागी तिच्या बोटाचा पुसटता स्पर्श होताच मात्र, सुती कापड विस्तवाच्या संपर्कात यावं तशी माझी गत झाली, आणि तिने दाखवलेल्या दृश्यांमुळे मी किती वरच्या सप्तकापर्यंत ताणली गेलेली होते, हे मी तत्क्षणी पाणावताच तिच्या बोटांकरवी तिला कळून चुकलं. आपल्या प्रेमी युगुलाचं पुढे कायकाय होतं हे पाहण्याकरिता ज्या अशांततेमुळे माझ्यात धीर राहिला नसता, ती आटोक्यात आणण्यात यश मिळाल्याकारणाने तिला समाधान वाटलं; आणि आमची उत्सुकता पुरवण्यासाठी फार सोयीच्या असलेल्या त्या भेगेपर्यंत ती मला पुन्हा घेऊन गेली. आम्ही काही क्षणच तिथून दूर गेलो होतो; पण हे लडिवाळ द्वंद्वयुद्ध पुन्हा जुंपण्यासाठी अनुकूल परिस्थिती निर्माण झालेली आहे, असं आम्ही परतताच

आम्हाला दिसून आलं.

हा परदेशी तरुण आम्हाला सामोरा दिवाणावर बसला होता, त्याच्या गळयात हात टाकून पॉली त्याच्या एका गुडघ्यावर बसली होती, आणि तिच्या त्वचेचा झगझगीत गोरेपणा व प्रियकराचा गुळगुळीत चमकदार किरमिजी रंग यांतल्या अंतर्विरोधामुळे दृष्टिसुखाला थोडीसुद्धा बाधा येत नव्हती. एकमेकांचे लचके तोडीत ज्या अगणित चुंबनांची देवाणघेवाण झाली, त्यांचा हिशेब कुणाला ठेवता येईल? अधूनमधून ते एकमेकांना मखमली हत्यारांनी भोसकताहेत याची मला दाद लागत होती, अशांवेळी दोहोंपैकी प्रत्येकाच्याच तोंडात दोन जिभा होत्या, आणि एकमेकांमध्ये त्या घालण्यात त्यांना मोठी खुमारी वाटत असल्याचं कळून येत होतं. दरम्यानच्या कालावधीत, मार खाल्ल्याने लाज वाटून रिंगणातून पळून गेलेला त्याचा लाल डोक्याचा कोंबडा आता पुन्हा भर जोशात आला होता, पुन्हा तरतरीत होऊन तो पॉलीच्या मांडीवर चढून बसला होता, आणि त्याची समजूत काढून त्याला खूष करण्यात तिच्या बाजूने ती मुळीच कुचराई करीत नव्हती; तिने त्याला कुरवाळून, आपलं डोकं खाली घालून त्याचं मुलायम टोक त्याच्याकरिता चुकीच्या ओठांतदेखील घेतलं: यात तिला काही विशेष गंमत वाटली, की ते जास्त सुळसुळीत होऊन त्याला प्रवेश सोपा व्हावा असा तिचा उद्देश होता, हे काही मला सांगता आलं नाही; पण ह्या कृतीचा परिणाम मात्र तात्काळ झाला, आणि वाढलेल्या उत्तेजनेने चमकणारे त्या तरुणाचे डोळे व त्याचा तापलेला चेहरा, यांमुळे असा स्पष्ट संकेत मिळू लागला की त्याच्यापर्यंत पोहोचणाऱ्या आनंदाची श्रेणी आता उंचावलेली आहे.

तो उठला, पॉलीला त्याने बाहुपाशात उचलून धरलं, आणि तिला तो काहीतरी इतक्या हलक्या आवाजात म्हणाला की मला ऐकू आलं नाही; आता दिवाणाच्या पायाशी तिला घेऊन जाऊन, तिच्या मांड्यांवर व पार्श्वगोलांवर तो त्याच्या कडक स्नायूंनी मजेत चापट्या मारू लागला; हाताला त्याने झटका देताच तिथे फटकन तडाखा बसून आवाज होई; पण त्याच्या मनात तिला दुखवायचं होतं तितपतच तिला दुखलं, कारण चावटपणा करण्याची त्याला जशी सवय होती, तशीच व तितकीच तिलाही होती. पण जेव्हा हा आळशी मवाली पोरटा उताणा पडला, पॉलीला हळूच त्याने आपल्या अंगावर ओढून घेतली, आणि तिनेही त्याची मर्जी सांभाळीत स्वार होऊन स्वत:च्या हातांनी तिचा आंधळा लाडोबा योग्य ठिकाणी पोहोचवला, तेव्हा मला किती आश्चर्य वाटलं असेल ते तुम्हीच पाहा; आता आपल्या शरीराची हाक ऐकून, सुख देणाऱ्या ह्या अवजाराचं तळपतं टोक स्वत:मध्ये घुसवून घेऊन ती थेट सुळावर चढली, आणि अगदी केसभरही बाहेर उरणार नाही इथपर्यंत तो तिच्यात

रुतताच ती पुरती जखडली गेली: स्वत:च्या त्या अगतिक अवस्थेतली मौज चाखीत ती त्याच्यावर विसावलेली असताना तो तिच्या चिथावणी देणाऱ्या स्तनांशी खेळ करीत राहिला. मधूनच त्याच्या चुंबनाची गाठभेट घेण्याकरिता ती खाली वाके, पण आता सुखाचा दंश झाल्यामुळे यापेक्षा जास्त जोरकस काही करण्याची त्यांना उबळ आली; वरखालीवर हालचालींचं आता वादळच सुरू झालं, आणि खाली पडलेल्या योद्ध्याने त्याचवेळी दुशादेखील मारल्या; तिच्याभोवती त्याने हात कवटाळून मोठ्या मिठ्ठास बळजोरीने तिला स्वत:कडे खेचून घेतलं: हातोड्यावर ऐरणीच्या त्या उलट्या दणक्यांनी आणीबाणीचा क्षण लवकरच ओढवून आणला, आणि त्यांनी संगनमत करून घडवून आणलेल्या सुखस्फोटाची सारी चिन्हे दिसू लागल्यामुळे, गोष्टी कोणत्या थराला गेलेल्या आहेत हे आम्हाला कळून चुकलं.

यापेक्षा अधिक पाहणं माझ्याने होण्यासारखं नव्हतं; नाटकाचा उत्तरार्ध समोर येताच मी इतकी हेलावून जाऊन पिसाळून उठले, की वेडाच्या भरात न राहवून फीबीला घट्ट मिठीत घेऊन आवळून धरलं; जणू काही माझी सुटका करू शकेल अशी काही सामग्री तिच्यापाशी होती. पण माझ्या या अवस्थेमुळे तिला काकुळती येऊन व समाधान वाटून ती मला दाराकडे घेऊन गेली, आणि शक्य तितका हलका आवाज करीत ते उघडून चोरी पकडली न जाता आम्ही दोघी बाहेर पडलो; ती मला माझ्या खोलीत परत घेऊन जाताच, आत खवळून उठलेल्या कोलाहलामुळे पायांतली शक्ती जाऊन तत्क्षणीच मी स्वत:ला बिछान्यावर झोकून दिलं; बेभान झाले असले तरीदेखील माझ्या जाणीवांची मला लाज वाटत होती.

फीबी माझ्या शेजारी आडवी झाली, आणि तिने मला खवचटपणे विचारलं की तू आता शत्रुपक्ष चांगला निरखून बघितलेला आहेस, आणि त्याचा सर्वांगाने विचार केलेला आहेस; तेव्हा अजूनही तुला त्याची भीती वाटते का? की त्याच्याशी जवळून मुकाबला करण्याची तुझी तयारी आहे असं तुला वाटतं? यावर एक शब्दही न बोलता मी सुस्कारा सोडला; कारण आता माझा श्वासच मुश्किलीने चालू होता. तिने माझा हात पकडला व स्वत:चा पेटिकोट वर गुंडाळून अर्धवट बुभुक्षेने त्या जागी ओढून नेला, पण आता पूर्वीपेक्षा माझ्या ज्ञानात भर पडलेली असल्यामुळे, माझ्या आकांक्षा जिच्यावर केंद्रित झालेल्या होत्या ती प्रमुख वस्तू तिथे नसल्याची कमतरता मला फार जाणवली; सारं काही इतकं सपाट व पोकळ होतं, आणि मला जे हवं त्याची सावलीदेखील न सापडल्याने मी इतकी खट्टू होते, की केवळ फीबी नाराज होऊ नये म्हणूनच हात मागे घेतला नाही. आता तो मी पूर्णपणे तिच्या व्यवस्थापनावर सोडून दिला, आणि तिच्या बुद्धीप्रमाणे, तिने त्याचा वापर भरीव सुखाऐवजी

सुखाचा आभास मिळवण्यासाठी केला. मला मात्र आता जास्त सकस अन्नाची हाव होती; तेव्हा मी स्वत:ला असं मनोमन वचन दिलं, की निकडीची ती विशिष्ट वस्तू मिसेस ब्राउनने जर मला लवकरात लवकर पुरवली नाही, तर पोरीपोरींतल्या ह्या टिवल्याबावल्यांवर मी फार काळ भागवून घेणार नाही. सारांश असा, की हा लॉर्ड बी– आता अगदी थोड्यांच दिवसांत अपेक्षित असला, तरीदेखील तो येईपर्यंत मला धीर धरवणार नाही अशी चिन्हे दिसत होती; आणि सरतेशेवटी मी खोळंबून राहिले ती नाहीच, कारण पैसा व विषयवासना या दोहोंना जरी या प्रकरणी रस असला, तरीदेखील खुद्द प्रेमानेच पुढाकार घेऊन माझं काय करायचं ते ठरवून टाकलं.

अंधाऱ्या खोलीतल्या नाट्याला दोन दिवस झालेले असतानाची गोष्ट: मी सकाळी सहाच्या सुमाराला उठले, आणि माझ्या शैयासोबतिणीला गाढ झोपलेल्या अवस्थेत सोडून देऊन हळूच खाली आले, तेव्हा आमचा मागचा हॉल ज्या छोट्याशा बागेत उघडत असे तिथे मोकळी हवा खावी यापलीकडे अधिक काही माझा उद्देश नव्हता; जेव्हा भेटायला घरी येणाऱ्यांची वेळ असे, तेव्हा माझ्या वावरण्यावर बंधने असल्यामुळे मला त्या भागात जायची मुभा नव्हती, पण आता मात्र तिथे सर्वत्र अबोली आणि निद्राराणी या दोघींचा अंमल होता.

मी पार्लरचं दार उघडताच, तिथल्या विस्तवाशेजारी, म्हाताऱ्या बायका वापरतात तसल्या एका आरामखुर्चीवर, पाय एकमेकांवर चढवलेल्या अवस्थेत गाढ झोपेत असलेला एक तरुण पाहून मला मोठंच आश्चर्य वाटलं; त्याच्या उडाणटप्पू मित्रांनी त्याला दारू पाजून झाल्यानंतर मात्र प्रत्येकजण आपापल्या पोरीबरोबर निघून गेला होता, आणि अशा अवस्थेत रात्री एक वाजता त्याला डिवचून हाकलून देणं आमच्या वयस्क नोकराणीला कसंसंच वाटल्यामुळे तो मात्र तिथेच राहिला होता, कारण त्या घटकेला घरात रिकामा बिछाना शिल्लक असण्याची शक्यता नव्हतीच. टेबलावरचं एक मोठं गोल काचेचं भांडं आणि पेले, दारू पिऊन दंगा घातल्यानंतर नेहमी दिसतात तसेच इतस्तत: पसरलेले होते. पण त्या झोपलेल्या आगंतुकाला पाहण्यासाठी जशी मी त्याच्याजवळ आले ... देवा रे! ... काय ते दृश्य!... नाही!... मध्ये कित्येक वर्षे गेली आणि नशीबात अनेक चढउतार झाले, परंतु वीज कोसळल्याप्रमाणे त्याच्या रूपाचा माझ्यावर जो ठसा उमटला, तो खोडला जाणं शक्य नाही. माझा पहिलावहिला अनुराग जीवर जडला ती मूर्ती माझ्या विद्ध डोळ्यांना सर्वप्रथम जशी दिसली, तिची स्मृती सतत माझ्यापाशी राहावी अशी मी आज्ञा करत्ये... मी तुला बोलावते आहे... आणि आली रे आली! तू मला समोर दिसते आहेस!

मदाम, असा एक अठराएकोणीस वर्षांचा गोड पोरगा तुमच्या डोळ्यांसमोर आणा, की ज्याने डोकं खुर्चीच्या एका बाजूशी वळवलेलं आहे; आणि ज्यावरचा पुरुषी देखणेपणा व तारुण्याचा गुलाबी तजेला यांनी माझ्या डोळ्यांना व हृदयाला काबीज करण्याकरिता कारस्थान रचलं आहे, अशा त्याच्या चेहऱ्याला अस्ताव्यस्त कुरळे केस अधूनमधून झाकोळून टाकताहेत. रात्रीच्या उच्छृंखलपणामुळे सद्यस्थितीत त्याच्या तोंडवळ्यावर लिलीच्या पांढऱ्या फुलाची गुलाबाच्या तांबड्या फुलावर तात्पुरती सरशी झालेली होती; पण तिथे चढलेला पांढुरका म्लानपणादेखील कल्पनेच्या कमाल मर्यादेपर्यंत सुरेख अशा त्याच्या रूपवैशिष्ट्यांना एक अवर्णनीय गोडवा आणीत होता: झोपेत मिटलेले त्याचे डोळे पापण्यांच्या कडांची शोभा खुलविणाऱ्या लांब केसांचं प्रदर्शन करीत होते, आणि त्यांच्यावरील उंच, नितळ व पांढऱ्याशुभ्र कपाळाला शोभा आणणाऱ्या दोन रेखीव कमानी कुठल्याही पेन्सिलीला चितारता येण्यासारख्या नव्हत्या. जणू काही तिथे नुकतीच मधमाशी चावली असल्याचा भास व्हावा, अशा प्रकारे रुसून पुढे आलेले दोन जांभळसर ओठ ह्या लोभस निद्रिस्त मूर्तीशी आत्ताच हातापायी सुरू करण्यासाठी मला आव्हान देत होते; परंतु शालीनता व परस्परांविषयीची समजूत ह्या भावना स्त्रीपुरुष दोघांमध्येही खऱ्या प्रेमाची सोबत करीत अविलगपणेच येतात, आणि त्यांचा एकत्रित परिणाम म्हणून माझ्या उतावळेपणाला लगाम बसला.

पण त्याच्या सदऱ्याच्या गळपट्टीची उघडीच असलेली बटणे व एखाद्या हिमवर्षावापेक्षाही शुभ्र अशी छाती पाहून, तिला न्याहाळीत राहिल्याने मिळणाऱ्या सुखाचं प्रलोभन, त्याला थंडी तर भरणार नाही ना अशा जीव हैराण करणाऱ्या काळजीपुढे अपुरं पडलं. मला घाबरट बनवणाऱ्या प्रेमाने हळुवारपणाही शिकवला. थरथरत्या हाताने मी त्याचा हात धरून शक्य तितक्या हलकेच त्याला झोपेतून जागं करताच तो दचकला, आणि सुरवातीला काहीसा गोंधळून वर पाहून, आपला सुरेल आवाज माझ्या हृदयापर्यंत पोहोचवीत म्हणाला, "मुली, किती वाजले गं?" मी त्याला वेळ सांगितली, आणि म्हणाले की छाती उघडी टाकून सकाळच्या गार हवेत जर असेच झोपून राहिलात तर आजारी पडाल. यावर त्याच्या चर्येशी व डोळ्यांशी मिळत्याजुळत्या अशा गोड आविर्भावात त्याने माझे आभार मानले; हे डोळे आता टकटकीत उघडलेले होते, आणि त्यांनी उत्सुकतेने माझ्याकडे निरखून पाहताच, त्यांत चमकणाऱ्या चंचल ठिणग्या थेट माझ्या अंत:करणात शिरल्या.

प्रकार असा होता, की आपल्या समवयस्क मित्रांबरोबर मजा मारायला येण्याआधी थोडी जास्तच प्याल्यामुळे, स्वत:कडची सारी हत्यारं त्यांच्या सोबतीने कामाला लावणं आणि एक छोकरी मिळवून रात्रीचा समारोप करणं, हे जमण्यासारखी त्याची अवस्था राहिलेली नव्हती; तेव्हा तोकडे सैलसर

कपडे घातलेल्या मला पाहून, मी त्या घरचीच पोरगी आहे आणि त्याने जो वेळ दवडला त्याची भरपाई करण्यासाठी मला पाठवलेलं आहे, असाच त्याचा पक्का समज झाला; पण ही कल्पना सहज डोक्यात येण्यासारखी असली, आणि फारसा विचार न करता त्याने जरी ती स्वीकारली असली, तरीदेखील माझ्या रूपामुळे त्याच्यावर काही विशेष छाप पडली की जात्याच त्याचा स्वभाव मृदू होता कोणास ठाऊक, पण तो माझ्याशी ज्या प्रकारे बोलला त्यात गुर्मीचा अंशही नव्हता (अर्थात अजूनही तो मला त्याला रिझवण्याच्या उद्देशाने आलेली व्यावसायिक पोरगीच समजत होता); तेव्हा पुरुषाकडून मिळालेलं मला पसंत पडलेलं आयुष्यातलं पहिलं चुंबन देऊन त्याने मला विचारलं, की तू माझ्याजवळ थांबशील का? थांबलीस तर तुझा वेळ फुकट जाणार नाही हे मी पाहीनः पण ज्यामध्ये वासनेला शुद्ध करण्याची क्षमता आहे, अशा माझ्यातील नवजात प्रेमाने इतकी पटकन शरणागती पत्करण्यापासून जरी मला परावृत्त केलं नसतं, तरीदेखील घरातलं कोणीतरी बघेल ही धास्ती मला नकार द्यायला भाग पाडण्याकरिता पुरेशी होती.

आणि मग, केवळ प्रेमानेच शिकविलेल्या सुरात मी त्याला म्हणाले, की मला तुझ्याबरोबर थांबता येणार नाही आणि तसं का हेही सांगत बसायला वेळ नाही, कदाचित मी तुला पुन्हा पाहणारही नाहीः आणि या शेवटच्या शब्दांबरोबरच, माझ्या हृदयाच्या तळातून फुटून निघालेला एक निश्वास बाहेर आला. माझा जेता मला नंतर म्हणाला की तो माझ्या दिसण्यावर भाळला होता; आणि माझा जो व्यवसाय त्याने गृहीत धरला होता त्यातली मुलगी त्याच्या कल्पनेप्रमाणे त्याला जितपत आवडू शकली असती तितकी मी त्याला आवडल्यामुळे, त्याने मला अचानक विचारलं की मी तुला ठेवलं तर चालेल का? – तुझ्यासाठी मी लगेच राहायला जागा बघतो, आणि ह्या घराशी ज्या काही व्यवहाराने तू बांधलेली असशील त्यातून मोकळी होशील अशी व्यवस्था करतो. एका पूर्ण अनोळखी माणसाकडून (आणि तोसुद्धा एक स्वप्नाळू पोरगा!) आलेली ही मागणी जरी अचानक, आततायी, घिसाडघाईची व क्वचित धोक्याचीही वाटली, तरीदेखील निमिषार्धात मला त्याच्याविषयी वाटू लागलेल्या पराकोटीच्या प्रेमामुळे त्याच्या आवाजात जो लोभसपणा आला होता, त्यापुढे माझा सारा विरोध विरघळला, आणि एकही आक्षेप मला समोर दिसेनासा झालाः त्याच्यासाठी या क्षणी मी मरायला तयार होते, मग त्याच्याबरोबर जगण्याचं आमंत्रण अव्हेरणं मला कसं शक्य असेल?! आणि म्हणूनच, ह्या प्रस्ताव ऐकल्यानंतर, माझ्या हृदयाने जोरदार धडधड करून कशाबशा एखाद्या मिनिटाच्या स्तब्धतेनंतर माझ्या तोंडून उत्तर वदवून घेतलं ते असंः तू देऊ केलेलं मी स्वीकारते आहे, तुझ्या मनाला येईल त्या मार्गाने मी तुझ्याकडे पळून यायला तयार आहे, यापुढे माझं काय होणार हे सगळं तुझ्यावर अवलंबून आहे, मग ते बरंवाईट कसंही असो.

मी इतकी सहज त्याच्या हाती पडले याबद्दल त्याला माझ्याबद्दल घृणा कशी वाटली नाही, किंवा त्याच्या दृष्टीला मी स्वस्त का वाटले नाही याबद्दल मला आजतागायत नेहमी आश्चर्य वाटत आलेलं आहे; पण माझं नशीबच असं होतं की लंडनमधल्या खाचखळग्यांची त्याला भीती वाटत असल्यामुळे, ठेवण्यासाठी म्हणून अनेक दिवस तो एखाद्या पोरीच्या शोधात होता; माझं रूप समोर येताक्षणीच त्याला ते आवडून गेल्यामुळे प्रेमालाच करता येईल असा चमत्कार होऊन आम्ही एका क्षणात सौदा पुरा केला, चुंबनांची देवाणघेवाण करून त्यावर शिक्कामोर्तब केलं, आणि व्यत्ययाची शक्यता आत्तापेक्षा कमी असताना यानंतर पुढे केव्हातरी मजा करता येईल, ह्या आशेने त्याने एवढ्यावरच समाधान मानण्याचं ठरवलं.

पण कुणीतरी पोरगी डोकं फिरवून घेऊन, सगळ्या परिणामांविषयी बेफिकीर राहून एखाद्या तरण्याबांड पुरुषामागोमाग गेली; ही घटना जिच्यामुळे क्षम्य ठरेल अशी सामग्री यौवनाने जितक्या प्रमाणात ह्या पोराकडे दिलेली होती, तितकी दुसऱ्या कुणाकडेही दिलेली नसावी. पुरुषी सौंदर्यातली उत्तमोत्तम लक्षणं त्याच्या शरीरात एकत्र आलेली होतीच, पण याखेरीज त्याच्या वागण्याबोलण्यात नीटसपणा व आदबशीरपणा होता, आणि डोक्याची हालचाल करण्याच्या लकबीत एक प्रकारचा रुबाब असल्यामुळे तो वेगळा उठून दिसत असे; डोळे चमकदार व बोलके होते, आणि चर्येमध्ये गोडवा व अधिकार हे दोन्ही भाव एकाचवेळी दिसून येत असत. लोभसवाणा रंग असलेल्या गुलाबापेक्षाही त्याचा वर्ण अधिक खुललेला होता; आणि ज्याची नक्कल करणं शक्य नाही अशा कोवळ्या व जिवंत रसरशीतपणामुळे, इतक्या कमालीच्या गोऱ्यापान माणसांच्या त्वचेवर जो तजेला नसल्याचा व कच्च्या पिठूळपणाचा आरोप नेहमी केला जातो त्यातून तिची सहीसलामत निर्दोष सुटका झालेली होती. आमचा छोटेखानी बेत असा होता की दुसऱ्या दिवशी सकाळी सात वाजता मी घराबाहेर पडेन (रस्त्यावर उघडणाऱ्या दाराची किल्ली कुठे आहे हे मला माहित असल्यामुळे अशी हमी देणं मला सहज शक्य होतं), आणि गल्लीच्या टोकाशी तो घोडागाडीसह येऊन मला सुखरूप दूर घेऊन जाईल; मी मिसेस ब्राउनकडे राहिल्यामुळे शिल्लक असलेली थकबाकी तो नंतर निरोप पाठवून चुकती करेल; कारण गिऱ्हाईकांची जिच्यामुळे रीघ लागावी अशीच त्याच्या मते मी असल्यामुळे, मला ती सुखासुखी जाऊ देणार नाही असा त्याचा सर्वसाधारण होरा होता.

मग मी त्याला आडून असं सांगितलं, की माझ्यासारख्या कुणा मुलीला पाहिल्याची त्याने या घरात वाच्यता करू नये, आणि ते का हे मी सावकाश समजावून सांगेन. पण आता मात्र आम्ही एकत्र

दिसल्यामुळे बेत फिसकटेल, अशा धास्तीपोटी माझं हृदय रक्तबंबाळ झालेल्या अवस्थेत मी बळेच स्वत:ला त्याच्यापासून दूर घेऊन गेले; हळूच चोरटेपणाने माझ्या खोलीत परत जाताच तिथे फीबी अजून गाढ झोपेत असलेली दिसली, तेव्हा कपडे घाईघाईने उतरवून मी तिच्या शेजारी पडून राहिले. खुशी आणि बेचैनी यांचं त्या क्षणी माझ्या मनात बनलेलं मिश्रण शब्दांत पकडण्यापेक्षा कल्पनेने जाणणं सोपं आहे. मिसेस ब्राउनला माझ्या हेतूचा सुगावा लागेल, माझी निराशा होईल, मला दु:ख लाभेल, माझ्या आयुष्याची वासलात लागेल, हे सारे धोके त्या नव्याने प्रज्वलित झालेल्या ज्योतीपुढे विरून गेले. माझ्या अस्पर्श हृदयाच्या ह्या लाडक्या प्राणेश्वराबरोबर एक रात्र का होईना पण राहणं, त्याला पाहणं, त्याला स्पर्श करणं, हा आनंद मला माझ्या स्वातंत्र्याच्या व आयुष्याच्या किंमतीपेक्षा मोठा वाटू लागला. तो मला वाईट वागवील – वागवू दे! मालक तो होता, आणि इतक्या लाडक्या हाताने मृत्यू जरी दिला तरी तो स्वीकारायला मी आनंदाने नव्हे तर अत्यानंदाने तयार होते.

माझा सारा दिवस अशा प्रकारच्या विचारांनी भरून गेलेला होता, आणि त्यातलं प्रत्येक मिनिट मला लहानशा युगाप्रमाणे वाटत होतं. किती वेळा मी घड्याळाकडे गेले! इतकंच नव्हे, तर तो चेंगट तासकाटा पुढे ढकलावा असा मला मोह झाला, जणू काही त्यामुळे वेळच पुढे सरकणार होती. जर घरातल्या माणसांनी माझं थोडंही निरीक्षण केलं असतं, तर लपवणं अशक्य झालेली माझ्या अंगातली अस्वस्थता पाहून त्यांना काहीतरी सुगावा नक्कीच लागला असता; विशेषकरून दुपारच्या जेवणाच्या वेळी असा उल्लेख कुणीतरी केला, की एक खूप गोड पोरगा आला होता आणि ब्रेकफास्टपर्यंत थांबला होता. "ई! किती छान दिसत होता!... मी त्याच्यासाठी जीवपण दिला असता... त्याच्यावरून भांडणं सुद्धा लागतील..." अशी काही ना काही मस्करी चालू होती, आणि ज्या विस्तवाचा भडका दाबून ठेवताना माझी पुरेवाट होत होती, त्यावर यामुळे तेल ओतलं जात होतं.

माझ्या मनाची दिवसभर जी चलबिचल होत राहिली, तिचा एक चांगला परिणाम असा झाला की निव्वळ थकून गेल्यामुळे पहाटे पाचपर्यंत माझी बऱ्यापैकी झोप झाली; त्यानंतर मात्र मी उठले, आणि कपडे करून, धास्ती व अधिरेपणा अशा दुहेरी छळाला तोंड देत, मुक्रर केलेल्या वेळेची वाट पाहू लागले. शेवटी ती आली – हवीहवीशी वाटणारी, निर्वाणीची, धोक्याची वेळ आली; आणि आता, केवळ प्रेमाकडून उसन्या घेतलेल्या धारिष्ट्याचा आधार घेऊन, पायाच्या बोटांवर चालत मी हळूच जिन्यावरून खाली गेले; माझी पेटी मात्र तिथेच सोडली, कारण बाहेर पडताना ती माझ्याबरोबर कुणाला दिसली तर काय होईल अशी बाकबूक होती. रस्त्यावर उघडणाऱ्या दारापर्यंत मी आले; त्याची किल्ली आमच्या बिछान्याशेजारच्या एका खुर्चीवर फीबीच्या भरवशावर नेहमी ठेवलेली असे,

आणि मी त्यांना सोडून जाईन अशी तिला थोडीसुद्धा शंका आलेली नव्हती (वास्तविक मलाही कालपर्यंत आलेली नव्हती), त्यामुळे ती माझ्यापासून जपून किंवा दडवून ठेवावी असं तिच्या मनात कधी आलं नाही. मी दार सहज उघडलं, मला धीर देणाऱ्या प्रेमानेच माझी पाठराखण केली: आणि आता, विनाअडथळा रस्त्यात पोहोचताच, घोडागाडीच्या उघड्या दाराशेजारी उभा असलेला माझा अधिरक्षक देवदूत मला दिसला. मी त्याच्यापर्यंत कशी पोहोचले मला काही ठाऊक नाही, बहुतेक उडाले असणार; पण दुसऱ्याच क्षणी मी गाडीत बसलेली होते, तो माझ्या शेजारी होता, त्याचा बाहुपाश माझ्याभोवती होता, आणि तो मला स्वागताचं चुंबन देत होता. गाडीवाल्याला सूचना दिलेल्या होत्या, त्याप्रमाणे तो लागलीच निघाला.

माझे डोळे तत्क्षणी अश्रूंनी भरून गेले, पण अतिशय गोड लागणाऱ्या अत्यानंदाचे ते अश्रू होते; ह्या विलक्षण देखण्या तरुणाच्या कवेत मी असल्यामुळे उचंबळून आलेल्या हर्षातिरेकात माझं इवलंसं हृदय डुबक्या घेत होतं. भूतकाळ किंवा भविष्यकाळ हे दोन्ही मला सारखेच निरर्थक होते; शुद्ध न गमावता वर्तमानातला आनंद सहन करणं, एवढंच माझ्या आत्मशक्तीला कसंबसं जमण्यासारखं होतं. आपल्यापरीने त्याने मात्र मला त्याच्या प्रेमाची ग्वाही देण्याकरिता, आणि केवळ त्याच्या भलेपणावर व सच्चेपणावर संपूर्णपणे विसंबून राहून निघून येण्याचं जे धाडसी पाऊल मी उचललेलं होतं त्या निर्णयाचा मला पस्तावा होऊ नये याकरिता, हळुवार मिठ्या आणि गोड आवाजात घातलेली समजूत यांचा पुरवठा करण्यात कसूर केली नाही. पण दुर्दैवाने यात माझं श्रेय काहीच नव्हतं, कारण मला हे करायला भाग पाडणारा माझ्यातला प्रणयवेदनेचा रेटा मला रोखता येऊ नये इतका जोरदार होता; तेव्हा मी जे केलं, ते न करणं शक्य नव्हतं म्हणून केलं.

काळ ही गोष्ट आता माझ्याबाबतीत नष्ट झालेली असल्यामुळे, दुसऱ्याच क्षणी आम्ही चेल्सीमधल्या एका विश्रामगृहात येऊन पोहोचलो होतो; जोडप्याने मजा करायला आलेल्यांचं आदरातिथ्य या ठिकाणी फार अगत्याने होत असे, आणि तिथे आता आमच्या ब्रेकफास्टसाठी ड्रिंकिंग चॉकलेटची तजवीज करण्यात आली. जगाचे कोपरेकंगोरे ज्याला फार चांगले ठाऊक आहेत, असा एक रंगेल आणि बेरकी म्हातारा इथला मालक होता; ब्रेकफास्टला तो आमच्याबरोबर बसला, सहेतुकपणे माझ्याकडे रोखून पाहात त्याने आमचं अभिनंदन केलं, आणि पुढे म्हणाला: जोडी छान दिसतेय अगदी!... मी शपथेवर सांगतो तुम्हाला – फार अब्रूदार, मालदार लोक इथे राहून जातात, पण इतकं देखणं जोडपं पूर्वी कधी दिसलं नव्हतं मात्र... मुलगी कोवळी आहेय हे कळलंच मला... साधीभोळी, गावाकडची वाटतेय अगदी... मजा आहेय तुझ्या नवऱ्याची!... घरमालक लोक सवयीने करतात

त्याच नमुन्यातल्या ह्या चर्पटपंजरीमुळे मी सुखावले व माझी अस्वस्थता कमी झाली, पण इतकंच नव्हे तर माझ्या नव्या स्वामीबरोबर असल्यामुळे मनोमन जो माझा गोंधळ उडाला होता, त्याचा विसर पडण्याकरिता याचा उपयोग झाला; कारण आता ती वेळ जवळ येऊ पाहात असल्याकारणाने त्याच्याबरोबर एकटं असण्याची मला भीती वाटू लागली होती, पण यात माझ्या नवथर लाजरेपणापेक्षाही खऱ्याखुऱ्या प्रेमाचा वाटा अधिक होता.

मी मनोरथ करीत होते, त्याला बिलगून राहू पाहात होते, त्याच्यासाठी मरायला तयार होते; पण तरीही कशी आणि का कोण जाणे, ज्या घटनेमध्ये माझ्या अत्यंत अनावर इच्छा केंद्रित झालेल्या होत्या, तिचीच मला धास्ती वाटत होती; उफाळलेल्या कामनांच्या लोटांबरोबरच माझ्या नाडीतून भीतीचे ठोके पडत होते. माझ्या भावनांमधली ही रस्सीखेच, आणि शालीनता व कामज्वर यांतला अंतर्विरोध, यांमुळे मला पुन्हा उन्मळून रडू आलं; पण मागीलप्रमाणेच त्याने याचा असा अर्थ घेतला की मी त्याच्यावर सारं सोपविल्यानंतर माझं आयुष्य जे अचानक बदललं, त्यामुळे मला अजूनही काळजी व धाकधूक वाटते आहे; आणि परिणामी, त्याच्या समजुतीनुसार मला ज्याने बरं वाटेल व धीर येईल ते सगळं त्याने बोलून व करून दाखविलं.

परंतु आता यापुढे, माझ्या लाडाच्या, जवळिकीच्या नावाने, माझ्या अनुरागदेवतेचा 'चार्ल्स' असा उल्लेख करण्याचं औद्धत्य मी करणार आहे – तर ब्रेकफास्ट झाल्यानंतर, चार्ल्स अर्थगर्भपणे हसला आणि हळूच माझा हात धरून म्हणाला, "वरच्या एका खोलीतून बागेचा देखावा फार छान दिसतो – चल तुला मी दाखवतो"; पण यापुढे त्याने माझ्या उत्तराची वाट पाहिली नाही (याचं मला अतिशय हायसं वाटलं); आणि आता तो मला ज्या स्वच्छ प्रकाश असलेल्या हवेशीर खोलीत घेऊन आला, तिथे एकमेव देखावा दिसत होता तो म्हणजे पलंगाचा, आणि यामुळेच त्याला ही खोली आवडली असावी अशा स्पष्ट खुणा दिसत होत्या.

चार्ल्सने दाराची खिटी लावली आणि चपळाईने मला बाहुपाशांत पकडून जमिनीवरून उचललं; थरथरत व धापा टाकीत मी अर्धमेली झाले आहे, आणि नाजुक धास्तावलेपणा व गोड इच्छा दाटून आल्या आहेत, अशा माझ्या अवस्थेत आपले ओठ माझ्या ओठांना चिकटवून तो मला बिछान्यात घेऊन गेला; त्याचा उतावळेपणा असा होता, की माझ्या गळयाभोवतीच्या रुमालाच्या व गाऊनच्या पिना, आणि माझ्या बॉडीसला बांधलेल्या लेसेस काढण्यापलिकडे माझे बाहेरचे कपडे उतरवण्याइतका त्याला धीर राहिलेला नव्हता.

माझी छाती आता उघडी होती, आणि सोळा वर्षांच्या आतल्या, गावरानपणा अजून ताजा असलेल्या, कधीही न हाताळलेल्या मुलीचे असतील तसे तापून थरथरणारे दोन घट्ट, टणक, उफाड्याचे स्तन त्याच्या दृष्टीला व स्पर्शांना सामोरे गेले; पण त्यांचा घाट, शुभ्रपणा, ताठा, आणि स्पर्श केल्यास होणारा सुखद प्रतिकार यांमुळेही त्याचे चंचल हात इतस्तत: फिरण्यापासून परावृत्त होऊ शकले नाहीत; आता माझा पेटिकोट व आतला सदरा सैल करून वर सरकवण्यात आला, आणि त्यांच्या आत दडलेलं अधिक शक्तिशाली आकर्षणकेन्द्र या हातांच्या नाजुक आक्रमणाला खुलं झालं. तरीदेखील माझ्या मनातील धास्तीमुळे मी आपसूकच माझ्या मांड्या एकमेकींजवळ आवळून धरल्या; पण त्याने दोहोंमध्ये हात सरकवताच त्याच्या केवळ स्पर्शामुळे त्या मोकळ्या झाल्या, आणि आता मुख्य हल्ल्यासाठी रस्ता खुला झाला. मधल्या कालावधीत, मी त्याच्या डोळ्यांच्या व हातांच्या चिकित्सेचं भक्ष्य होत, आवाज किंवा विरोध न करता पडलेली होते; आणि मला एका कुंटणखान्यातून उचलून आणलेलं असल्यामुळे या विषयात मी अनभिज्ञ नाही हे जे अविचारी मत त्याने बनवलेलं होतं, त्याला माझ्या या वर्तनाने पुष्टीच मिळाली. अर्थात मीही कुमारिका असल्याचं त्याला पटवून देण्याच्या उद्देशाने एका शब्दानेही काही म्हणाले नव्हते; आणि जरी म्हणाले असते तरीदेखील, उद्ध्वस्त करण्यासाठीच पुरुष जी उकरून काढतात ती सुप्त अनमोल खाण मी अजून जपून ठेवलेली आहे यावर विश्वास ठेवण्याऐवजी, इतकी काहीच्या बाही थाप गिळून टाकण्याइतका मी त्याला बाळू समजते आहे यावर त्याने विश्वास ठेवला असता.

आता उशीर असह्य व्हावा इतक्या त्याच्या तारा पिळल्या गेल्या असल्यामुळे त्याने पाटलोणीची बटणे सोडली, आणि प्रेमयुद्धासाठीचं हत्यार बाहेर काढून जणू काही बुरूज आधीच ढासळलेला असावा अशा समजुतीने पुढे घुसवलं... स्स्स!... आई ग! आयुष्यात प्रथमच मला तो शिंगासारखा कठीण बत्ता तिथल्या नाजुक भागावर आपटत असताना जाणवला; पण मला महाभयंकर दुखावणाऱ्या अनेक जोरदार ढुशांनंतरही आपण काहीच प्रगती केलेली नाही हे जेव्हा त्याच्या लक्षात आलं, तेव्हा त्याला वाटलेल्या आश्चर्याची तुम्हीच कल्पना करा.

मी अगदी कळवळून तक्रार केली की मला हे सहन होत नाहीय... फार दुखतंय! पण तरीही त्याला इतकंच वाटलं, की मी फार कोवळी असल्यामुळे व त्याचं इंद्रिय मोठं असल्यामुळे ही सगळी अडचण उद्भवलेली आहे, आणि कदाचित याबाबतीत त्याच्याइतक्या पुढारलेल्या कुणी माझा लाभ घेतला नसावा (कारण आकारात त्याच्याबरोबर स्पर्धा करू शकतील असे पुरुष मोजकेच होते); पण माझं

कौमार्यपुष्प अजून खुडलं गेलं नसेल अशी कल्पनाही त्याच्या डोक्यात शिरली नाही, आणि या मुद्द्यावर मला प्रश्न विचारीत बसणं म्हणजे वेळ व शब्द वाया घालवणं आहे, असंच त्याला वाटलं असतं. त्याने पुन्हा प्रयत्न केला, पण त्याला प्रवेश मिळाला नव्हता की रहस्यभेदही झाला नव्हता; आणि त्याने जरी आता मला आणखी जास्त दुखावलं असलं, तरीसुद्धा माझ्या मनातल्या आत्यंतिक प्रेमापोटी ह्या आत्यंतिक वेदना मी जवळजवळ हूं की चूं न करता सहन केल्या.

अनेकवेळा तेच ते निष्फळ प्रयोग करून झाल्यानंतर शेवटी तो धापा टाकीत माझ्या शेजारी पडून राहिला, माझ्या डोळ्यांतून ओघळणाऱ्या अश्रूंची त्याने चुंबने घेतली, आणि मला मऊ आवाजात विचारलं की इतकी तक्रार करायचं कारण काय? आत्ताइतके आढेवेढे न घेता हीच गोष्ट तू इतरांकडून करून नाही का घेतलीस? माझ्याशी असं करणारा तू पहिलाच पुरुष आहेस असं जेव्हा मी त्याला म्हणाले, तेव्हा माझ्या उत्तरातल्या साधेपणामुळे त्याची खात्री पटायला फार मदत झाली. सत्याची ताकद मोठी असते; आणि जसं असावंसं आपल्याला फार वाटतं, तसं खरंच असल्याचं आपल्याला पटत नाही असं नेहमीच होत नाही.



## भाग तिसरा

पुरावा आता डोळ्यांसमोरच असल्यामुळे, अक्षतकुमारिका असल्याचा मी आणलेला आव अगदीच कपोलकल्पित नसावा यावर चार्ल्सचा विश्वास बसू लागला होता; तेव्हा चुंबने घेऊन त्याने मला गुदमरून टाकलं, आणि तो काकुळतीने म्हणाला, की तुझं जर माझ्यावर प्रेम असेल तर थोडा धीर धर; मलाच दुखलं असतं तर जितकी काळजी मी घेतली असती, तितकीच तुझीही घेईन. यावर काय म्हणू?! मी राजीखुषीने त्याच्या इच्छेप्रमाणे करायला तयार व्हावं याकरिता त्याच्या सुखाचा विचार माझ्या मनात असणं एवढं पुरेसं होतं, मग स्वत:ला त्यात कितीही दुखणार असलं तरीदेखील माझी हरकत नव्हती.

त्याने आता जास्त साग्रसंगीत पूर्वतयारी करून प्रयत्नांना पुन्हा सुरुवात केली: आपलं संधान नेमक्या उंचीवर लागावं म्हणून एक उशी माझ्याखाली ठेवली, आणि ते लागताना आराम वाटावा म्हणून एक माझ्या डोक्याखाली ठेवली; माझ्या मांड्या फाकवून व त्यांच्यामध्ये उभा राहून, त्यांना स्वत:च्या कमरेचा आधार दिला; आणि आपल्या अवजाराचं टोक त्या चिरेवर लावून धरून तो आत शिरण्याचा प्रयत्न करू लागला: ती इतकी लहान होती की दिशा योग्य आहे की नाही याची त्याला खात्री वाटेना. तिथे न्याहाळून व चाचपडून त्याने खात्री करून घेतली: मग ते इतकं भलंथोरलं उद्दाम प्रकरण एकदम वेगाने पुढे नेल्यामुळे, पात घुसावी तसा तिथल्या अवयवांचा चिकटा विलग होऊन ओठांच्या किंचित आतपर्यंत चंचुप्रवेश झाला; ह्याची जाणीव होताच मात्र, काबीज केलेल्या मुलखाचा फायदा उठवीत त्याने मोहिम पुढे चालू ठेवली, आणि सुरवातीच्या हल्ल्यानंतर सरळ रेषेत प्रगतिपथावर राहून जसा तो जोरकसपणे आत आत शिरत गेला, तशा त्या जाडजूड कडक वस्तूकरवी मऊ बोगद्याच्या भिंती विभक्त होण्यामुळे मला इतक्या असह्य वेदना झाल्या की मी किंचाळायचीच बाकी होते; पण घरभर ऐकू जाईल या भीतीने श्वास कोंडून धरला, आणि माझ्या चेहऱ्यावर उलटा झाकलेला पेटिकोट तोंडात कोंबून, दात खाऊन कडकडून चावला.

पण इतक्या त्वेषाने केलेल्या रणकंदनासमोर त्या भागातला मऊसूत पोत फार काळ टिकाव धरू शकला नाही, आणि आणखी खोलवर कशालातरी त्याने भोक पाडलं; आता डोक्यात सणक भरून त्याचा स्वत:वरचा ताबा सुटला, आपल्या अंगभूत आवेगाने ऊरफोड करीत राहणाऱ्या त्या खवळून उठलेल्या इंद्रियाच्या तुफानी वेगाबरोबर फरफटत ओढत जात त्याने तट फोडला, आणि एका

जबरदस्त बेदरकार तडाख्यासरशी माझ्या कुमारिकेच्या रक्तात लिडबिडून भिजून जाऊन तो तलवारीच्या अगदी मुठीपर्यंत आत घुसून बसला... आता मात्र माझा सगळा निर्धार मला सोडून गेला: वेदनेला धारच अशी होती की मी किंकाळी फोडून बेशुद्ध पडले; आणि त्याने नंतर मला असं सांगितलं की स्खलन झाल्यानंतर बाहेर काढताक्षणीच, फाटून गेलेल्या जखमी बोगद्यातून बाहेर वाहत येणाऱ्या रक्ताने माझ्या मांड्या भरल्या होत्या.

जेव्हा मी शुद्धीवर आले, तेव्हा माझ्या अंगावरचे कपडे उतरवून मला बिछान्यात ठेवण्यात आलेलं होतं, आणि माझ्या कौमार्याचा मोहक मारेकरी अतिशय काळजीत पडून हळुवारपणे माझ्याभोवती आपले बाहुपाश टाकून बसला होता; इतक्या वेदनांना कारणीभूत झालेला असूनही माझा तो अजून लाडकाच असल्यामुळे त्याच्या हातातल्या सरबताच्या पेल्याला मला जरी नाही म्हणवलं नाही, तरीदेखील माझे पाणावलेले व म्लानपणे त्याच्याकडे रोखलेले डोळे त्याच्या क्रौर्याबद्दल त्याला दूषण देत विचारीत होते, की प्रेमाचा मोबदला हाच असतो का? जिथे आडपडदा सापडेल अशी त्याला बिलकुल अपेक्षा नव्हती तिथे तो सापडून त्यावर संपूर्ण विजय मिळवल्यामुळे आता त्याची मी अफाट लाडकी बनलेली होते, पण तरीदेखील आनंदाची परमोच्च श्रेणी त्याला गाठता यावी म्हणून मला सोसाव्या लागलेल्या वेदनांची कदर म्हणून स्वत:ला झालेला हर्षवायू त्याने दाबून धरला; आणि ज्यांत रुसव्यापेक्षा प्रेमाचाच भाग जास्त आहे अशा माझ्या कुजबुजत्या कुरबुरींची समजूत काढण्याकरिता त्याने इतक्या गोडव्याने व आत्मीयतेने मला कुरवाळून गोंजारलं, की त्याच्याकडे पाहात राहण्याच्या आनंदात व मी त्याचीच आहे असं स्वत:ला वाटून घेण्यात माझ्या साऱ्या वेदना बुडून गेल्या: माझ्या जीवनात सुख आणणारा आता तोच एक होता, किंवा एका शब्दात सांगायचं तर माझं भागधेय होता.

अजूनही ठसठस फारच होती व रक्ताळलेली जखम ताजी होती, त्यामुळे माझ्या सहनशक्तीची पुन्हा लगेच परीक्षा घ्यावी असं चार्ल्सच्या समजूतदार स्वभावाला वाटलं नाही; पण मला फार हलता येत नसल्यामुळे किंवा खोलीतल्या खोलीत चालताही येत नसल्यामुळे त्याने दुपारचं जेवण माझ्या बिछान्यापाशीच आणायला सांगितलं; आणि प्रेमदेवतेने त्याला माझ्यावर जो एक झुगारता न येण्यासारखा गोड अधिकार बहाल केलेला होता, तो वापरून त्याने मला आग्रह करकरून खायला घातल्यामुळे, पाणकोंबडीचा एक पंख आणि दोनतीन ग्लास वाईन इतक्या गोष्टी तरी माझ्या घशाखाली उतरल्याखेरीज राहिल्या नाहीत. जेवण झाल्यानंतर वाईन वगळता सगळी सामग्री नोकर घेऊन गेला, आणि आता चार्ल्सने फारच निर्लज्जपणा करून माझ्यापाशी बिछान्यात येण्याची जेव्हा

अनुमती मागितली, तेव्हा ती मिळणार हे माझ्या डोळ्यांत त्याला सहजच वाचता येण्यासारखं होतं; तिला अनुसरून जेव्हा त्याने कपडे उतरविण्याची प्रक्रिया सुरू केली, तेव्हा त्याची प्रगती पाहून भीतीच्या व हर्षाच्या उपऱ्या भावना माझ्या मनाला स्पर्शून गेल्याखेरीज राहिल्या नाहीत.

तो आता प्रथमच माझ्याबरोबर बिछान्यात होता, आणि तेही दिवसाढवळ्या; पण त्याने स्वत:चा व माझाही सदरा वर सरकवून त्याचं धगधगतं नग्नशरीर मला भिडवताच... ओहो! तो आनंद मला सहनच होईना! ही बेहोशी माणसांच्या जगातली नव्हती. देहभान हरपून टाकणाऱ्या त्या सुखासमोर कुठला दुखरेपणा टिकाव धरू शकेल? माझ्यातल्या खालच्या जखमांची भगभग मला जाणवेनाशी झाली, आणि जणू काही त्याच्या शरीराचा एखादा भाग माझ्या स्पर्शातून किंवा दाबातून निसटून जाईल की काय अशा धास्तीपोटी वेलीच्या तुरईप्रमाणे मी त्याला गोल लपेटून राहिले; त्याच्या गच्च मिठ्यांची व चुंबनांची मी जी परतफेड केली, तिच्यातला आसुसलेपणा व गोडवा खऱ्या प्रेमालाच काय तो ठाऊक असेल, कारण नुसत्या वासनेला ती पातळी कधीच गाठता यायची नाही. आणि आजदेखील, ऐंद्रिय कामनांची हुकूमशाही पूर्णपणे थांबलेली असताना, व माझ्या धमन्यांमधून केवळ एक शांत, थंडगार ओहोळ धीम्या गतीने वाहात असताना, माझ्या तरुणाईमध्ये माझ्यावर खोल प्रभाव पाडून जाणाऱ्या त्या कालखंडांची आठवण मनाला खुलवून टवटवी आणते.

तेव्हा पुढे सांगत्ये. ज्या ज्या घड्याकोनाड्यांत आमची शरीरं एकमेकांशी भिडवणं आम्हाला शक्य होतं, त्या त्या ठिकाणी माझा कामदेव मला चिकटून बसला होता; पण आता पुन्हा ताज्या झालेल्या कामनांचा कल्लोळ आवाक्यात ठेवणं त्याला शक्य न होऊन, त्याने आपल्या घोड्याचं डोकं पुढे काढलं व माझ्या मांड्यांमध्ये त्याच्या मांड्या हळूच सरकवून, आर्द्र धगीच्या चुंबनांनी माझं तोंड बंद करून, नव्याने हल्ला केला; पुन्हा एकदा ढुशा देऊ लागून, आत घुसून, फाडाफाडी करून, धांदोट्या झालेल्या नाजुकशा घड्यांमधून जेव्हा त्याने बळजोरीने रस्ता काढला, तेव्हा याखेपेस त्याला प्रवेश देताना, पहिल्याप्रथम बुरुजात खिंडार पडतानाच्या वेळेपेक्षा त्या किंचित कमी भगभगल्या. माझ्या किंकाळ्या मात्र मी दाबून धरल्या, आणि एखाद्या साहसकथेतील नायिकेच्या धीराने त्याला सहन केलं; थोड्याच अवधीत, अधिकाधिक रणतुंबळ होऊ लागलेल्या त्याच्या ढुशा, गालांवर पसरलेली गडद लाली, उन्मादाच्या तिरीमिरीने वर गेलेली दोन्ही बुबुळं, क्लान्त निश्वास व एक यातनामय थरथर, यांमुळे विस्फोटजन्य सुखभावना जवळ आल्याची चाहूल लागली; पण तिच्यातल्या माझ्या हिश्शावर हक्क सांगणं जमू नये इतपत मला अजूनही दुखत होतं.

अनेकदा उपभोग घेतल्यानंतर मात्र तिथली चरचर काहीशी बोथट व बधिर होऊन त्या आरोग्यवर्धक मधुद्रवाची चाळवणारी शिंपडणूक मला जाणवू लागली; त्यानंतरच काय तो रुचिरसुंदर प्रतिप्रवाह माझ्या साऱ्या कामना बरोबर घेऊन माझ्यातून खाली आला, आणि वेदनेची परिसीमा ओलांडून मी सुखाच्या परिसीमेपाशी आले. पण एकामागून एक चढाया होत गेल्याने माझा अडकरपणा मोडला जाऊन मी काहीशी सरावले, तेव्हा कुठे मदनग्रस्त शरीरातून तो कढत ओहोळ बाणासारखा धावत जाताना जिवंत होणाऱ्या परमानंदाची अस्सल निर्भेळ चव मला चाखायला मिळू लागली; आणि आता मात्र, केवढाले ते कैवल्यसुखाचे लोंढे! केवढी ती वितळती बेहोशी आणि केवढी ती हर्षयातना! इतक्या शक्तिशाली व त्वेषपूर्ण जाणीवा निसर्गाला किती काळ सहन करता येणार?! आणि यांतून विसावा मिळायला हवा म्हणूनच त्याने क्षणभरात संपून जाणाऱ्या स्वादिष्ट अशा त्या प्रविलयाची तरतूद केलेली आहे हे मात्र नक्की; तो जवळ आलेला असताना पूर्वसूचना म्हणून एक गहिरी गुंगी जाणवते, गोड शिरशिरी येऊन द्रवरूप गोडवा बाहेर टाकला जातो; आणि सैलावलेलं अंग ताणलं जाऊन, स्खलनाबरोबर मृतवत पडून राहण्याच्या क्षणी, तो सुखानुभव स्वतःच त्या द्रवणामध्ये बुडून जातो.

हा वितळता लोंढा थांबल्यानंतर, आणि माझ्या इंद्रियांचा आकांत व खळबळा काहीसा शमल्यानंतर, हेलावणाऱ्या विचारधारेत मग्न होऊन मी शांतपणे स्वतःला अनेकदा हा प्रश्न विचारला आहे, की निसर्गदेवतेच्या अपत्यांपैकी माझ्याइतकं सुखी कुणी असेल का? माझ्या डोळयांची व हृदयाची इतकी पारलौकिक रुचिपूर्ती करणाऱ्या या लाडाकोडाच्या, अनुपमेय अशा मधुराधिपतीबरोबरचं एका रात्रीचं सुख जर उजव्या पारड्यात टाकलं, तर सारे संभाव्य विपरीत परिणाम डाव्या पारड्याला कितीसं हलवू शकणार होते?

अशा प्रकारे, संध्याकाळच्या जेवणाची वेळ होईपर्यंत, अखंड प्रेमालाप, चुंबने, गुटरगू, एकमेकांना डिवचणं असली खादाडी करण्यातच आम्ही सगळी दुपार खर्च करून टाकली. शेवटी जेवण आलं, त्याआधी का कोण जाणे चार्ल्सने कपडे चढवले होते; आता बिछान्याशेजारी बसून, आम्ही बिछाना आणि त्यावरची चादर ही अनुक्रमे टेबल आणि टेबलक्लॉथ म्हणून वापरली, मात्र स्वतःखेरीज इतर कुणालाही त्याने जेवण वाढू दिलं नाही किंवा आसपास फिरकूही दिलं नाही. तो चांगला चापून जेवला, आणि मला खाताना बघून त्याला समाधान वाटल्याचं दिसलं. माझ्या नशिबावर मी इतकी वारेमाप खूष झाले होते; आणि यापूर्वीच्या माझ्या आयुष्यातला नीरसपणा व आजमितीला मला वेढून टाकणारे सुखानुभव यांच्या तुलनेने इतकी हरखून गेले होते, की माझ्या कौमार्याची नासाडी,

आणि ते टिकणार नाहीत अशी धास्ती एवढ्याही किंमतीला ते मला पुष्कळच स्वस्त वाटले. या क्षणी ते माझे आहेत एवढाच विचार माझ्या छोटेखानी डोक्यात मावण्यासारखा होता. सुखाचं घबाड मिळावं याकरिता एकामागून एक डाव खेळत राहिल्यानंतर निसर्गशक्तीचं जेव्हा पुरतं समाधान झालं व जवळची पुंजीही संपली, तेव्हा निद्रेच्या बाहूंमध्ये तिने आम्हाला सोपवून देताच आम्ही एकमेकांजवळ निजून राहिलो, आणि माझ्या प्रियतमाचे बाहू माझ्याभोवती वेटोळलेले आहेत या जाणीवेने ती झोपही अधिक चवदार होऊन गेली.

सकाळी उशीरा पहिल्यांदा मी उठले; तेव्हा माझा प्रेमिक गाढ झोपलेला आहे हे पाहून हळूच त्याच्या मिठीतून स्वत:ला सोडवून घेतल्यानंतर, त्याची विश्रांती मोडू नये म्हणून श्वास घ्यायलाही मी कचरत होते; अंग कुस्करलं गेल्यामुळे माझी टोपी, केस, आतला सदरा हे सगळं अस्ताव्यस्त झालेलं होतं, त्यामुळे ही संधी साधून जमल्या तितक्या या गोष्टी मी सावरून घेतल्या: पराकोटीची आनंदून जाऊन या झोपलेल्या पिल्लाकडे प्रेमातिरेकाने पाहात असताना, आणि त्याने मला दिलेल्या वेदनांचा विचार करीत असताना, मी स्वत:जवळ अशी नि:शब्द कबुली दिली की सुखामुळे दु:खाची भरपाई होऊन शिल्लक उरलेली होती.

आता दिवस चांगलाच उजाडला होता. मी बिछान्यात उठून बसले होते, आणि वातावरणात दमट उष्मा असल्याकारणाने आम्ही ज्या अस्वस्थ हालचाली केल्या होत्या, त्यांमुळे चादर अस्ताव्यस्त होऊन गुंडाळली गेली होती; चार्ल्सचा सदरा एका चिंचोळ्या पट्टीत वर गोळा होऊन त्याच्या तरण्याबांड देहाचं सौंदर्य जवळजवळ पूर्ण नग्नावस्थेत माझ्यासमोर आलेलं होतं (खोलीत व बाहेरही हवा गरम असल्यामुळे त्याला ती बाधेल अशी काळजी मला नव्हती), आणि या खजिन्यावर डोळ्यांनी ताव मारण्याची खुणावणारी संधी अव्हेरणं माझ्याच्याने होण्यासारखं नव्हतं. भाळून जाऊन मी त्याच्याकडे पाहात राहिले; आणि त्याची सारी नग्नाकर्षणं मी फक्त दोनच डोळ्यांनी जरी खाऊन टाकली, तरीसुद्धा मला असं वाटलं की दृष्टीला पुरतं सुख द्यायचं तर ते निदान शंभर तरी हवे होते.

मुग्ध झालेल्या कल्पनाशक्तीसमोर उपस्थित असलेली त्याची मूर्ती आजही मला हुबेहूब चितारता येईल! पूर्णपणे निर्दोष अशा पुरुषलावण्याचा तो डोळाभर देखावा होता! ज्या वयात सौंदर्य दोहोंपैकी एका लिंगापुरतंच मर्यादित नसतं त्या वयातल्या वासंतिक तजेल्यामुळे व टवटवीमुळे झळाळणारा, आणि वरच्या ओठावर फुटणारी पहिली लव आत्ताच कुठे हा लिंगभेद अस्पष्टसा सूचित करू लागली

आहे अशा स्थितीतला, ज्यामध्ये न्यून सापडणं अशक्य, असा मुखचंद्रमा मनासमोर आणा. त्याच्या दोन फुगीर ओष्ठमाणिकांमधून आत घेतल्या जाणाऱ्या श्वासापेक्षा बाहेर पडणारा उच्छ्वास जास्त गोड आणि शुद्ध होता: आहाहा...! इतकी मोहिनी घालणारं चुंबन न घेता सोडून देण्यासाठी मला मनाची केवढीतरी मुस्कटदाबी करावी लागली! अतिशय रेखीवपणे घडविलेल्या त्याच्या मानेला, मागे व दोहोबाजूंना इतस्ततः खेळणाऱ्या निसर्गदत्त कुरळ्या केसांनी मोठी शोभा आणली होती; तिच्याकरवी डोक्याला जोडलं गेलेलं विलक्षण सुडौल शरीर अत्यंत जिवट धाग्यांनी विणलेलं होतं, आणि त्वचेच्या गुळगुळीतपणाने, वर्णातील नाजुक छटेने व मांसाच्या पुष्टतेने संगनमत करून, त्यातील पौरुषाचा सारा जोम दडवून ठेवून, पाहणाऱ्याच्या डोळ्यांकरिता ते अधिक मृदुल बनविलेलं होतं.

मर्दानी प्रमाणबद्धतेने घडविलेल्या त्याच्या सपाट व बर्फासारख्या शुभ्र छातीवर जी दोन हिंगळासारखी लाल स्तनाग्रे दिसत होती, त्यांमुळे उमलू पाहणाऱ्या गुलाबांचा भास होत होता; आणि मांड्यांकडे खाली येताना जिथे कंबर संपते व नितंबांच्या फुगीर गोलाईला सुरुवात होते, तिथल्या आकृतीच्या सौष्ठवाकडे व रेखीव नेमकेपणाकडे निरखून पाहायला मला प्रतिबंध करणं त्याच्या सदऱ्याला शक्य होत नव्हतं. त्या जागच्या घट्ट, गुबगुबीत, पिकलेल्या मांसावर ताणून बसवलेली गुलगुलीत, सुळसुळीत, लख्ख पांढरी त्वचा चमचमत होती, किंचितही दाब देताच या मांसात लाटा तयार होऊन इथेतिथे खळ्या पडत होत्या, आणि त्यावर रोवून उभं राहणं स्पर्शाकरिता अवघड होऊन जाऊन, परिश्रमाने घासलेल्या हस्तिदंताच्या पृष्ठभागावर वावरत असल्याप्रमाणे तो घसरू पाहात होता.

गुडघ्यांपर्यंत अंशाअंशाने निमूळत्या होत जाणाऱ्या, आतील सळसळत्या रक्तामुळे लालसर छटा आलेल्या, आणि तुकतुकीत गोलाई असलेल्या त्याच्या कोरीव मांड्या, ह्या देखण्या अंगयष्टीला शोभतील अशा आधारस्तंभांप्रमाणे वाटत होत्या; आणि आता त्यांच्या खाली असलेल्या, ज्यांची भगभग अजूनही थांबली नव्हती असे माझ्यातले लुसलुशीत कोवळे अवयव प्रचंड त्वेषाने आत घुसून व फाडून जवळजवळ उद्ध्वस्त करणाऱ्या त्या जरबदार अवजाराकडे एकटक बघत असताना मला किंचित अवशिष्ट भीती वाटल्याखेरीज जरी राहिली नाही, तरीसुद्धा काही नाजुक जाणीवाही झाल्या; पण आता नुसतं पाहा तरी त्याच्याकडे! अर्धवट झाकलेलं लाल डोकं एका मांडीवर विसावून शांत समजूतदारपणे ते असं काही मरगळून पडून होतं, की इतका पाषाणहृदयी खोडसाळपणा त्याला जमला असेल असं त्याच्याकडे पाहून बिलकुल वाटत नव्हतं.

मुळाभोवताली लहानशा मऊमऊ वेटोळ्या करीत सुंदर वाढलेले केस, त्याचा गोरा शुभ्रपणा, शाखा

उपशाखा होत फुटलेल्या रक्तवाहिन्या, गुंडाळी होऊन आक्रसून जाऊन दिवाणावरील जाड उशीच्या आकारात आखुडलेल्या त्याच्या सुस्त शरकांडाची लवचिक मृदुता, आणि मांड्यांमधून त्याला वर उचलून धरणारी, निसर्गाने बनविलेली मिठाई जपून ठेवणाऱ्या खजिन्याच्या पोतडीचं काम करणारी, हिरमुसून दुमडून जाऊन सुरकुतलेली गोलाकार गंमतीदार जोडपिशवी (शरीरावर बाकी कुठेच त्या सुरकुत्या चांगल्या दिसल्या नसत्या!), ह्या साऱ्यामुळे देखाव्याला समृद्धता येऊन निसर्गाकरवी जे एक विलक्षण मनोवेधक व हृदयस्पर्शी दृश्य निर्माण झालेलं होतं, ते चित्रकारांनी किंवा शिल्पकारांनी बनविलेल्या व प्रचंड किंमतींना खरेदी केल्या जाणाऱ्या नग्नचित्रांपेक्षा नि:संशय सहस्रपटींनी उजवं होतं; पण दैनंदिन जीवनप्रवाहामध्ये जेव्हा ही दृश्यं सामोरी येतात, तेव्हा त्यांचं सुख आसुसून उपभोगणारे फार मोजके असतात, आणि जे असतात त्यांना ज्वालाग्राही संवेदनाशक्तीचं प्राकृतिक वरदान मिळालेलं असतं; मात्र त्यांच्यातल्या ह्या शक्तीने एक सत्य विचारांती जोखलेलं असतं ते असं, की निसर्गाने घडविलेल्या व सौंदर्याचा मूलस्रोत असणाऱ्या अशा त्या अजोड आकृतीबंधांपर्यंत मानवनिर्मित कलांना साधणारी नक्कल कधीही पोहोचू शकत नाही, आणि त्यांचं रास्त मूल्यमापन पैशामध्ये करता येत नाही.

पण प्रत्येक गोष्टीला शेवट असायचाच. ह्या देवदूतासमान तरुणाने झोपेत आळसटून हालचाल करताच, आता त्याचं पांघरूण व सदरा पूर्ववत स्थितीत जाऊन खजिन्याच्या खोलीवरचं दार लोटलं गेलं. मग मी पुन्हा बिछान्यावर पहुडले; पण आत्ताच समोर पाहिलेल्या वस्तुसमुच्चयामुळे माझ्यातल्या त्या अवयवात जी बंडाळी माजू लागली होती, ती त्यानेच तिथे पूर्वी निर्माण केलेल्या वेदनेपेक्षा वरचढ ठरू लागली होती; मी माझा हात त्या जागी नेताच बोटांना सहज रस्ता उघडता आला, पण अक्षतकुमारिका व आता पूर्ण झालेली स्त्री यांच्यातल्या त्या फरकावर चिंतन करायला पुरेसा वेळ मिळण्याआधीच चार्ल्स जागा झाला, आणि माझ्याकडे वळून त्याने मार्दवाने विचारलं की झोप कशी झाली? पण मला उत्तर द्यायला सवड न ठेवता त्याने माझ्या ओठांवर एका जळत्या बेहोश चुंबनाचा असा शिक्का मारला, की एक ज्योत माझ्या हृदयाच्या दिशेने झरझर सरकत जाऊन तिथून तिचा प्रकाश शरीराच्या प्रत्येकन् प्रत्येक अवयवात पसरला; आणि यानंतर मात्र, मी त्याच्या नग्नसौंदर्याची जी चोरून टेहळणी केली होती, त्यामुळे डिवचून जाऊन सूड घेण्यासाठीच म्हणून की काय, पण त्याने पांघरूण भिरकावून दिलं, आणि माझा आतला सदरा जितका वर जाईल तितका ढकलून, निसर्गाने माझ्या शरीराला बहाल केलेल्या सर्व भेटवस्तूंकडे मिटक्या मारीत पाहण्याची आपल्या वाट्याची संधी घेतली; त्याचे कामसू हातदेखील विशेष संयम न बाळगता माझ्या अवयवांवर मोकाट हिंडू लागले. अजून पूर्णपणे न पिकलेल्या व आत्ताच उमलू पाहणाऱ्या माझ्या

स्तनांची तोंड चाळवणारी ताठर घट्टाई, अंगमांसाचा गोरापान आवळपणा, टवटवीत नाकडोळयांतला नीटसपणा, आणि अवयवांचा परस्परसंमेळ या साऱ्यामुळे आपल्याला अगदी मनासारखी चीजवस्तू मिळाल्याची त्याची भावना पक्की झाली; पण त्याने अतिरेकी धडाक्याने केलेल्या हल्ल्यामुळे केंद्रस्थानी किती मोडतोड झाली आहे याचा आढावा घेण्याचं औत्सुक्य जेव्हा त्याला वाटू लागलं, तेव्हा तो आपले हात तिकडे घेऊन गेला इतकंच नव्हे; तर माझ्याखाली एक उशी सारून, पाहणी करण्याच्या आपल्या चावट उद्देशाकरिता सोयिस्कर पवित्र्यात मी येईन अशी व्यवस्था त्याने केली.

यानंतर त्याच्या डोळयांत जो विस्तव धगधगू लागला व हात जे तापले, त्याचं वर्णन करणं मोठं अवघड आहे! हरखून गेलेल्या मनाने सोडलेले निश्वास आणि अडखळते पुसट आश्चर्योद्गार एवढीच काय ती प्रशंसा उच्चारून दाखविणं त्याला जमण्यासारखं होतं. इतका वेळ जाईपर्यंत, आपला दरबारी इतमाम व निधडेपणा मला पाहता यावा, अशा प्रकारे त्याचं यंत्र ताठरपणे माझ्या दिशेने रोखून उभं राहिलं. त्याने स्वत: ते चाचपडून पाहिलं, आणि त्याच्या अवस्थेवर तो खूष झाल्यासारखा दिसला; मोठं गोजिरवाणं प्रेमळ हास्य करून त्याने माझा एक हात पकडला, आणि मार्दवी आग्रहाच्या आविर्भावात, निसर्गाने अत्युकृष्ट कारागिरी करून घडविलेल्या त्याच्या मानदंडाकडे नेला. मी फिकटशी धडपड करीत असताना, जे माझ्या आवाक्यात येईना ते स्पर्शाला कळल्याखेरीज मात्र राहीना; पांढऱ्याशुभ्र हस्तिदंताचा तो एक मनोरा होता, निळया रक्तवाहिन्यांची त्यावर सुंदर नक्षी होती, डोक्यावरचा टोप आता पुरता उतरवलेलं कमालीच्या सतेज अशा लालभडक रंगाचं डोकं होतं: याहीपेक्षा टणक व वज्रकठोर शिंग कुठे अस्तित्वात असणं शक्य नाही, आणि स्पर्शाला याहीपेक्षा सुखावणारी मुलायम मखमल कुठे अस्तित्वात असणं शक्य नाही. आता त्याने माझा हात आणखी खाली नेला, तो आनंदीबाई व आदिमाया ह्या दोघीही संगनमताने आपापला साठा जिथे एकत्र ठेवतात त्या कोठाराकडे; कोतवालाच्या कमरेशी त्याला बांधून टांगत ठेवण्याचा निर्णय शहाणपणाचाच होता, आणि त्याचं काम पाहता त्याला ह्या दोघींचा खजिनदार म्हणणंही विशेष चुकीचं ठरलं नसतं; मऊशार आवरण असलेल्या पिशवीत दोन गोलसर चेंडू खेळत असलेले माझ्या चाचपडत्या हाताला त्याने स्पष्ट जाणवून दिले, पण बाहेरून थोडा जरी दाब वाढवला तरी ते निसटून जात होते.

पण माझ्या गुबगुबीत, उष्ण हाताने इतक्या संवेदनाशील स्थळी भेट दिल्यामुळे सारीकडे असा काही अनावर विक्षोभ माजला होता, की यापुढे प्रस्तावना लांबवण्याचं सपशेल नाकारून, आणि माझ्या सोयिस्कर पवित्र्याचा फायदा उठवून, ज्या ठिकाणी वादळाचा तडाखा बसणार अशी मला अधिरी अपेक्षा होती, तिथेच नेमकं त्याने ते रुजू केलं: फाकून शरण गेलेल्या उघड्या जखमेच्या ओठांमधोमध

ती उद्दाम घुसखोरी मला जाणवली; तिथला चिंचोळेपणा आता एवढ्याच प्रमाणात उरलेला होता की मला असह्य वेदना तर होणार नाहीत, पण मार्ग इतपत बिकट राहावा की माझ्या प्रियकराचं सुख त्याने वाढेल. या हत्यारासाठीच मोजूनमापून काटेकोरपणे बनवलेल्या उबदार व नाजुक म्यानाने त्याला आवळमिठीत घेतलेलं होतं, आणि आता स्वगृही बस्तान बसताच त्याने माझा तोबरा सुखाने असा दाबून भरला की गुदमरून जाऊन माझा श्वासच बंद झाला; यानंतरच्या त्या प्राणघातक ढोसण्या! ज्यांची गणना नाही इतकी चुंबने! यांतल्या प्रत्येकातच अवर्णनीय असं सुख होतं, आणि त्याहीपेक्षा मोठ्या सुखांच्या जमावात ते हरवून गेलेलं होतं! पण इतक्या पराकोटीची अनागोंदी निसर्गाला फार काळ मानवणं शक्य नव्हतं: जोरजोराने ढवळलेली व धगधगून तापविलेली भांडी लवकरच उकळून उतू गेली, आणि त्यामुळे आग तात्पुरती विझली; पण या सगळ्या चहाटळ थिल्लरपणात इतकी सकाळ वाया गेली, की न्याहारी व दुपारचं जेवण यांची गोळाबेरीज करणं एका अर्थाने भागच पडलं.

यांपेक्षा कमी घटनाप्रचुर असे जे अवधी मध्येमध्ये आले, त्यांत चार्ल्सने मला सांगितलेला स्वत:चा वृत्तान्त, जो शब्दश: खरा निघाला, तो असा: त्याच्या वडिलांना करवसुली खात्यात लहानशी चाकरी होती, आणि उत्पन्नाच्या मानाने त्यांचा खर्च बराच पसरलेला होता; ह्या एकुलत्या सुपुत्राला त्यांनी फारच तोळामासा शिक्षण दिलेलं होतं, आणि अमुक एक व्यवसाय त्याने करावा अशा दृष्टीने काही तरतूद करून न देता, शिपायाचं कमिशन खरेदी करून त्याची सैन्यात वर्णी लावावी असा त्यांचा बेत होता; पण याला लागणारे पैसे स्वत: उभे करायचे किंवा व्याजाने घ्यायचे हे दोन्ही पर्याय आशेच्या नसून मनोराज्याच्या प्रांतातले होते. यापेक्षा भक्कम अशी कसलीच योजना पाठीशी नसतानाही, ह्या दूरदृष्टीशून्य बापाने आपल्या तरुण मुलाला – कितीतरी सुप्त गुण ज्याच्यात आहेत अशा मुलाला – सज्ञान होईपर्यंत, किंवा निदान त्याच्या जवळपास येईपर्यंत, काहीही काम करायला न लावता मोकाट वाढू दिलेलं होतं; आणि लंडनमध्ये जो चंगीभंगीपणा चालतो, किंवा नवख्या बेसावध माणसासाठी तिथे जे खड्डे खणून ठेवलेले आहेत, त्यांच्याबद्दलचे नेहमीचे पढिक इशारे देण्याचीसुद्धा तसदी घेतलेली नव्हती.

काहीवेळा चार्ल्स स्वत:च्या घरी असे आणि मनात येईल तेव्हा बापाकडे असे; बापानेही एक रखेल ठेवलेली होती, आणि जोपर्यंत चार्ल्स पैसे मागत नाही तोपर्यंत तो त्याला सुस्त मायेने वागवी: वाटेल तेव्हा रात्र बाहेर काढायची असेल तर कोणतीही सबब सांगितलेली खपून जाई; यानंतरची बापाची कानउघाडणीदेखील इतकी मिळमिळीत असे, की त्यामागे काही ठाम नियंत्रण किंवा धाक न जाणवता

दोषांकडे सकौतुक काणाडोळा केल्याचाच वास येई. चार्ल्सची आई वारलेली होती, पण आईकडून नातं असलेल्या एका आजीला चार्ल्सचा फार लळा होता, आणि त्याची पैशाची निकड पुरवण्यासाठी तिचा उपयोग होत असे. तिला नेमून दिलेली बरीच मोठी वार्षिक मिळकत होती, आणि गंगाजळीत साठवलेला प्रत्येक शिलिंग नेमाने ती आपल्या लाडक्या नातवाच्या हवाली करी; यामुळे बापाच्या हृदयाची जी तगमग होत असे ती चार्ल्सचा उधळेपणा ही म्हातारी सांभाळून घेते म्हणून नव्हे, तर तिला आपल्यापेक्षा चार्ल्स जास्त आवडतो म्हणून; आणि पैशावरून निर्माण झालेल्या या असूयेने बापाच्या मनाला किती घातक वळण लावलं, हे पुढे लवकरच दिसेल. पण आपल्या आजीचा हा अत्यंत उदारहृदयी मायाळूपणा मदतीला असल्यामुळे, पोरगी ठेवणं परवडेल इतका सरंजाम चार्ल्सकडे सहज जमलेला होता (आणि तीसुद्धा प्रेमात पडल्यामुळे थोडक्यावर समाधानी राहील अशी माझ्यासारखी कुणीतरी); तेव्हा ज्याला मी माझं भाग्य म्हणेन ते असं, की वर सांगितल्याप्रमाणे, तो अशाच एकीच्या शोधात असताना मी त्याला वाटेवर पडलेली दिसले.

चार्ल्सच्या स्वभावाबद्दल बोलायचं तर वृत्तीतला संथ गोडवा पाहून हा माणूस सुखासमाधानाने गृहस्थाश्रमी राहण्यासाठीच जन्माला आला आहे असं वाटे; मनाने तो हळुवार होता, वागायबोलायला मऊ व सौजन्यशील होता; कोणत्याही परिस्थितीत मनाचा शांतपणा टिकवून धरण्याची किंवा ढळला तर पुन्हा सावरण्याची कला त्याला उत्तम अवगत असल्यामुळे, कुणी उपद्रव देऊन किंवा वाकड्यात शिरून जर तो विस्कटलाच तर चार्ल्सला त्याबाबतीत कधी दोष लावता आला नसता. ज्यांमुळे विलक्षण कर्तृत्व गाजवता येतं किंवा जगात गाजावाजा होतो असे महान किंवा डोळे दिपवणारे सद्गुण त्याच्या अंगी जरी नसले; तरीदेखील समाजात जे काही चांगलं आहे, त्यात भर घालणारे अधिक नम्र सद्गुण मात्र जरूर होते: साधं व्यावहारिक तारतम्य, आणि त्याच्या जोडीला चांगुलपणा व पडतं घेण्याची वृत्ती एवढ्या भांडवलावर त्याची लोकांकडून वाहवा कदाचित होत नसेल, पण त्यांचा आदर व जिव्हाळा ह्या पुष्कळ जास्त मोलाच्या असलेल्या गोष्टी खचितच मिळत असत. पण केवळ त्याच्या शारीर सौंदर्यामुळेच माझं त्याच्याकडे प्रथम लक्ष जाऊन माझ्या भावना जडल्या होत्या इतकंच नव्हे, तर त्याचे हे आंतरिक गुण जोखण्याची नंतर जरी मला पूर्ण संधी मिळाली असली तरी त्यावेळेला त्यांची मला पारख नव्हतीच; आणि हल्लक डोक्याने उडाणटप्पूपणा करण्याच्या त्या दिवसांत, हे गुण जर डोळ्यांना कमी सुखावणाऱ्या व माझ्या ऐंद्रिय संवेदनांवर इतकं स्वामित्व न गाजवणाऱ्या माणसाच्या अंगी असते, तर कदाचित माझ्या हृदयावर त्यांचा प्रभावही फार बेताचाच पडला असता.

तत्कालीन प्रसंगाकडे पुन्हा वळूया. दुपारचं जेवण आम्ही पलंगातच बसून राहून वाटेल ते प्रेमचाळे करीत अस्ताव्यस्तपणे खाल्ल्यानंतर चार्ल्स उठला, आणि भावना उचंबळून आलेल्या अवस्थेत काही तासांकरिता माझी रजा घेऊन गावात गेला; तिथे एका तरुण बेरकी वकिलाबरोबर संगनमत करून, मी आदल्या दिवशी जिथून पळून आले होते त्या माझ्या आदरणीय माजी मालकिणीकडे हे दोघे जेव्हा बरोबर गेले तेव्हा चार्ल्सने ठरविलेला बेत असा होता, की त्या ठिकाणाहून नंतर कधीही तगादा ऐकावा लागणार नाही अशा धोरणाने तिच्याबरोबरचा सगळा हिशेब चुकता करावा. अशा रीतीने ते निघाले खरे; पण लंडनमध्ये बॅरिस्टर असलेल्या त्याच्या मित्राने चार्ल्सने सांगितलेल्या माहितीवर थोडा विचार केला, आणि असं ठरवलं की या भेटीला वेगळं वळण लावून, मोबदला देण्याऐवजी मागणं अधिक शहाणपणाचं ठरेल.

दोघांना आत आणलं जाताच, तिथल्या मुली चार्ल्सला ओळखत असल्याकारणाने त्यांनी त्याच्याभोवती गराडा घातला; मी सकाळी लवकर निसटले असल्यामुळे व त्याने मला नुसतं पाहिलं असल्याचं देखील त्यांना बिलकुल ठाऊक नसल्यामुळे, मी पळून जाण्यात त्याचा हात असल्याची त्यांना गंधवार्ताही नव्हती; तेव्हा त्यांच्या पद्धतीने त्या चार्ल्सशी लाडीगोडी करीत होत्या, आणि त्याचा मित्र हा कोणीतरी नवीन बकरा आहे अशीच बहुतेक त्यांची समजूत झालेली होती. पण मालकीण कुठे आहे असं विचारून बॅरिस्टरसाहेबांनी ह्या फाजीलपणाला खीळ घातली, आणि न्यायाधीशासारखा गंभीर चेहरा करून तो म्हणाला, की माझं तिच्याकडे काम आहे. मॅडमना ताबडतोब खाली येण्याचा निरोप धाडला गेला, आणि मुलींना खोलीतून बाहेर जायला सांगून वकिलसाहेबांनी तिला करड्या आवाजात विचारलं, की अलिकडेच गावाकडून आलेल्या फॅनी किंवा फ्रान्सिस हिल अशा नावाच्या मुलीस तुम्ही ओळखता किंवा नाही, व तिला कामावर ठेवण्याच्या मिषाने तुम्ही फशी पाडले आहे ह्या आरोपात तथ्य आहे किंवा नाही; आणि मी कशी दिसते हे यापुढे त्याने चार्ल्सने त्याच्याकडे केलेल्या वर्णनावरून शक्य तितक्या तपशीलवार सांगितलं.

दंडशक्तीकडून चौकशा होऊ लागताच अनैतिक धंद्यांत असणाऱ्यांनी थरथरू लागावं हे समजण्यासारखं आहे; एकतर माझ्या प्रकरणाबाबत मिसेस ब्राउनच्या मनात विवेकबुद्धीची टोचणी अगदीच नव्हती असं नाही, शिवाय ती जरी लंडन पक्कं ओळखून असली आणि थापाथापी करून स्वत:च्या व्यवसायातल्या अडचणी कशा निस्तरून न्यायच्या ह्यात चांगलीच मुरलेली असली, तरीदेखील हा गृहस्थ जस्टिस ऑफ पीस, न्यूगेटचा तुरुंग, ओल्ड बेलीतले खटले, कुंटणखाना चालवल्याबद्दल गुन्ह्याची नोंद, खोडा, खटाऱ्यात बसवून धिंड काढण्याची शिक्षा, असल्या गोष्टी बोलू

लागल्यानंतर ती या प्रश्नांमुळे हादरल्याखेरीज राहिली नाही. तिच्या अतिथिगृहाविरुद्ध मी फिर्याद नोंदवलेली आहे असं बहुतेक तिला वाटून तिचा चेहरा कमालीचा भकास झाला, आणि ती हजार सबबी व स्पष्टीकरणे देऊ लागली. ही कथा थोडक्यात गुंडाळायची तर हे दोघेजण विजयी आवेशात माझी सामानाची पेटी हस्तगत करून घेऊन आले (वास्तविक ती जर भेदरलेली नसती तर तिने यावरून झगडा केलाही असता); इतकंच नव्हे, तर तिने त्यांना लालूच दाखवली की आमच्यामागचं हे शुक्लकाष्ठ पुरतं जाऊ दे, त्याबदल्यात पेलाभर अरक आणि तुमच्या पसंतीस येईल ती घरची मिठाई एवढं स्वीकारा; पण ती स्वीकारण्यात आली नाही. हा प्रसंग घडत असताना चार्ल्सने बतावणी अशी केली, की आपण योगायोगाने या वकिलाबरोबर आलेलो आहोत, मला घर माहित असल्यामुळे त्याने मला इथे आणलं, पण बाकी या प्रकरणात मला काही रस नाही; आणि मॅडम घाबरून गेलेली असल्यामुळे माझ्या पूर्वेतिहासात शिरण्याचा जरी तिला फारसा धीर झाला नाही, तरीही जितपत झाला, त्यामुळे मी चार्ल्सपाशी सांगितलेल्या माझ्या वृत्तांताची शहानिशा झालेली पाहण्याचा आनंद त्याला जाताजाता मिळाला; अर्थात जितक्या पटकन ती समझोत्याला कबूल झाली त्यावरून अंदाज करता, तिला वाटलेली घबराट थोडीथोडकी नव्हती हे नक्की. माझी मनमिळाऊ मास्तरीण फीबी यावेळेस (कदाचित माझा शोध करायला) बाहेर गेलेली होती, पण तसं जर नसतं तर त्यांनी कढवलेली ही कथा इतक्या सहज घशाखाली उतरली नसती अशी दाट शक्यता आहे.

चार्ल्सने जिच्याकडे माझी बरीच तारीफ केलेली होती ती मायाळू स्वभावाची घरमालकीण जर वर येऊन माझ्याशी बोलत बसली नसती, तर या वाटाघाटींत जो बराच वेळ गेला, तो अनोळखी ठिकाणी मला सोडून दिलेलं असल्यामुळे आणखीनच लांबलचक वाटला असता. आम्ही एकत्र चहा घेतला, आणि चार्ल्स हाच आमच्या बोलण्याचा विषय असल्यामुळे तिच्या गप्पांनी वेळ फार चांगला गेला; पण जसजसा अंधार पडू लागला, आणि त्याच्या परतीसाठी मुक्रर केलेली वेळ निघून गेली, तसतशी बाईच्या भित्र्या जातीला नेहमीच तिच्या हृदयातल्या प्रेमाच्या समप्रमाणात वाटणारी अस्वस्थ खिन्नता व कोवळी भीती आता माझ्यावर चाल करून येऊ लागली, आणि तो हल्ला थोपवून धरणं मला काही केल्या जमेना. पण माझी फार वेळ तगमग झाली नाही: चार्ल्स येताना दिसल्यानेच थकबाकीपेक्षा वसुली जास्त झाली; आणि त्याच्याकरिता जी सौम्य कानउघाडणी मी पाठ करून तयार ठेवलेली होती, ती माझ्या ओठांपर्यंत येण्याआधीच मरून गेली.

मी अजूनही बिछान्यात पडून होते आणि पायांचा उपयोग न अवघडता करणं अजून जमत नव्हतं; तेव्हा चार्ल्स माझ्याकडे धावत आला, आपल्या बाहूंमध्ये मला पकडून त्याच्या हव्याहव्याशा वाटणाऱ्या मिठीत येण्यासाठी माझे बाहू उंचावून त्याने आपल्याकडे ओढून घेतले, आणि चुंबनांचा

गोड व्यत्यय मध्येमध्ये येत असताना, आपले उपाय यशस्वी झाल्याची बातमी मला सांगितली. त्या म्हातारीला जी दहशत बसवली ती ऐकून मला हसू आवरलं नाही; पण या प्रांतात मी अज्ञानी असल्यामुळे, आणि खरंतर निरपराध नसल्यामुळे, तशी माझी अपेक्षा मुळीच नव्हती. माझ्या अंदाजानुसार तिला भीती अशी वाटली, की तिच्या घरातलं वातावरण व माझ्याशी त्यांचा व्यवहार मला न आवडून, लंडनमध्ये माझ्या नात्याचं कुणीतरी सापडलं त्याच्याजवळ मी आसऱ्याला पळून गेले आहे आणि फिर्याद त्या गोटातून आलेली आहे; कारण चार्ल्सने अचूक ताडल्याप्रमाणे मी घोडागाडीतून पळून गेल्याचा प्रसंग बघायला इतक्या अवेळी एकही शेजारी तिथे नव्हता, किंवा निदान असला तरी त्याने चार्ल्सला पाहिलेलं नव्हतं; माझं चार्ल्सशी बोलणं झाल्याचा त्या घरात कुणाला थोडादेखील संशय आलेला नव्हता, मग पूर्ण अनोळखी पुरुषाशी असं अचानक संधान बांधण्याची गोष्टच सोडा: तेव्हा निष्कर्ष हा निघतो, की जी गोष्ट सर्वांत असंभाव्य आहे, तिच्याचविषयी आपण सर्वाधिक अविश्वास बाळगावा असं नाही.

ज्यांच्या कामना उतू चालल्या आहेत अशी आम्ही डोक्यात वारा शिरलेली दोघं वासरं खिदळत एकत्र जेवलो; माझ्या भावी सुखाचा ताबा मी पूर्णपणे चार्ल्सकडे दिलेला असल्यामुळे, तो माझा असणं यामध्ये जे अपरंपार सुख होतं त्यापलीकडे कसलाही विचार मी करीत नव्हते. काही वेळाने तो बिछान्यात आला; आणि आता या दुसऱ्या रात्री दुखणं जवळजवळ पुरतं मागे पडलेलं असल्यामुळे सुखाची बेहोशी मी पेले भरभरून प्यायले: मी अत्यानंदात पोहले, आणि अत्यानंदात न्हाले; शेवटी वासना शमल्याची व ज्वाला विझल्याची नैसर्गिक परिणती म्हणून आम्ही गाढ झोपून गेलो, आणि जेव्हा उठलो, तेव्हा हर्षोन्मादाला पुन्हा जिवंत करण्याकरिताच उठलो.

प्रेमाकडून आणि जगण्याकडून जास्तीतजास्त वसुली करून घेत त्या चेल्सीमधल्या विश्रामगृहात आम्ही दहाएक दिवस राहिलो; या अवधीत, आपण घर सोडून इतरत्र बागडत असण्याला आकर्षक बाह्यस्वरूप देण्याची, आणि लाड करणाऱ्या प्रेमळ आजीबरोबर संबंध चांगले राहतील हे पाहण्याची चार्ल्सने काळजी घेतली; माझ्यासाठी त्याचा जो खर्च होत होता त्याकरिता त्याने आजीकडून नियमित व पुरेशा पैशांचा रतीब काढला, पण तरीही त्याच्या पूर्वायुष्यातल्या धरबंध नसलेल्या चैनबाजीच्या मानाने हा खर्च फार किरकोळ होता.

यानंतर मला चार्ल्सने सेंट जेम्समधल्या डी– स्ट्रीटवर एका घरसामानासकट मिळालेल्या खाजगी बिऱ्हाडात हलवलं, आणि तिथे त्याने दोन खोल्या व दुसऱ्या मजल्यावर एक फडताळ एवढ्यासाठी

आठवड्याला अर्धी गिन्नी असा दर कबूल केला; ह्या घरावर त्याची काही दिवसांपासून नजर होतीच, कारण सुरवातीला त्याने मला ठेवलं होतं त्यापेक्षा हे ठिकाण त्याला नेहमी येजा करायला जास्त सोयीचं होतं; आधीची जागा सोडताना मला वाईट वाटलं हे कबूल करायला हवं, कारण पहिल्यांदा तिथे मी चार्ल्सजवळ राहिल्यामुळे आणि जे रत्न दोनदा गमावता येत नाही ते तिथे गमावल्यामुळे मला तिच्याविषयी अतोनात जिव्हाळा वाटू लागला होता. याउलट विश्रांतीगृहाच्या मालकाला मात्र तक्रार करायला जागा नव्हती; पण अर्थात याला अपवाद असा की चार्ल्सचा हात अतिशय सढळ असल्यामुळे, आम्ही सोडून चालल्याचा त्याला खेद न होणं शक्य नव्हतं.

आमच्या नव्या बिऱ्हाडात येताच मला त्या खोल्या फार उंची वाटल्या होत्या हे मला आठवतं आहे; वास्तविक तेवढ्या भाड्याच्या मानाने देखील त्या बेताच्याच होत्या; पण चार्ल्सने मला एखाद्या भुयारात जरी आणलं असतं, तरीदेखील त्याच्या सहवासामुळे माझ्याकरिता तो एक छोटेखानी राजवाडाच बनून गेला असता. घरमालकीण मिसेस जोन्सने अगत्याने आम्हाला खोल्या दाखविल्या, आणि तिथे कायकाय सोयी आहेत हे मोठाल्या आवाजात बडबड करून समजावून सांगितलं – माझी खाजगी नोकराणी तुमच्या दिमतीला असेल... फार मोठमोठे लोक माझ्या घरी राहून गेलेले आहेत... पहिल्या मजल्यावर राजदूतावासातला एक सचिव आणि त्याची बायको राहतात... यू लुक लाईक अ वेरी गुड नेचर्ड लेडी... तिने मला 'लेडी' म्हटल्यामुळे ह्या खुशामतीने मी हरखून जाऊन लाजले: माझ्या परिस्थितीतल्या मुलीकरिता हे अतिच होतं; कारण मी चार्ल्सची बायको म्हणून खपावं हा हेतू मनात धरून, त्याच्याकडे येताना ज्या कपड्यांत पळून आले होते त्यांपेक्षा कमी भडक व कमी सवंग कपड्यांत मला गुंडाळण्याची जरी त्याने दक्षता घेतली असली, आणि आमचं गुप्तपणे लग्न झालेलं आहे पण त्याच्या ओळखीच्यांना कळू नये म्हणून ते बाहेर येऊ दिलेलं नाही अशी पारंपरिक जुनीच कथा तिला सांगितलेली असली, तरीदेखील हे सगळं तिच्याइतक्या लंडनमध्ये मुरलेल्या बाईला अत्यंत कपोलकल्पित वाटलं असणार अशी मला खात्री आहे; पण यातल्या कशाचीच तिला यत्किंचितही फिकीर नव्हती. नीतिनियमांची बोच तिच्यापेक्षा कमी जाणवणारी व्यक्ती भूतलावर अस्तित्वात नव्हती; आणि खोल्या भाड्याने देऊन पैसे काढणं हा तिचा एकमेव हेतू असल्यामुळे, खरी गोष्ट कळली असती तरीदेखील तिला सात्विक संताप मुळीच आला नसता किंवा व्यवहारही मोडला नसता.

तिचं रूप व तिचा वैयक्तिक इतिहास यांचं जर मी मोघम रेखाचित्र काढलं, तर माझ्यासंबंधात जी भूमिका तिने बजावली, त्यामागची कारणसंगती तुम्हाला कळून चुकेल. उंचाडी, काटकुळी, लाल केसांची, अशी ती अंदाजे शेहेचाळीस वर्षांची बाई होती; सरसकट कुठेही दिसतात, आणि लक्षात न

येता किंवा उल्लेख न होता खपून जातात, अशांपैकीच एक बिनवैशिष्ट्याचा, विस्मरणीय चेहरा तिच्या वाट्याला आलेला होता. तरुण असताना एका गृहस्थाने तिला ठेवली होती, आणि तिच्यापासून त्याला झालेल्या मुलीच्या हिताचा विचार करून, ह्या बाईला आयुष्यभर चाळीस पाउंड वर्षासन मिळत राहील अशी तरतूद त्याने मृत्युशय्येवर असताना केलेली होती; मुलगी सतरा वर्षांची होताच हिने राजदूत म्हणून परदेशी चाललेल्या एका माणसाला विकून टाकली, आणि तेही फार चढ्या किंमतीला असं नाही; खरेदी केलेली वस्तू आपल्याबरोबर घेऊन जाऊन त्याने तिला अतिशय मायाळूपणे वागवलं, आणि काहीजण म्हणतात की गुप्तपणे तिच्याशी लग्नही केलं: परंतु त्याचं तिला सततचं निक्षून सांगणं असे, की आपल्याच रक्तामांसाचा बाजार मांडणाऱ्या आईशी तिने थोडाही संपर्क ठेवू नये. पण पैसा हा विषय सोडला तर हिला वेगळा स्वभाव नव्हता, आणि मनस्वी आवड अशी फक्त त्याचीच होती; त्यामुळे ह्या व्यवहारातून बिदागी किंवा इतर काही लभ्यांश पिळून काढण्यासाठी एक सांडशी हातातून निसटली, यापलीकडे ह्या ताटातुटीमुळे ती अस्वस्थ झाली नाही.

एकूण पाहता तिच्या मनाची ठेवणच तशी असल्याकारणाने, आपल्याजवळचा ढीग कोणत्या ना कोणत्या मार्गाने वाढवणं याखेरीज कसल्याही आनंदाविषयी ती उदासीन होती; तेव्हा आता मुली पुरवणारी किंवा संबंध जुळवून देणारी बाई म्हणून तिने खाजगी व्यवसाय सुरू केला, आणि तिच्या लब्धप्रतिष्ठित, गंभीर चेहऱ्याची यात तिला उत्तम जोड मिळाली; थोडक्यात म्हणजे फायदेशीर म्हणून तिच्यासमोर आली आणि ती त्यात घुसली नाही, अशी काही लटपट नव्हती. वर उल्लेखिलेल्या विषयातले लंडनमधले सगळे गल्लीबोळ तिला ठाऊक होते, कारण ती स्वत:च तिथून आलेली होती इतकंच नव्हे तर तिकडच्या खबरी सतत मिळत राहतील अशीही तिने तजवीज केलेली होती; आणि स्त्रीपुरुषांचे परस्परसंबंध खेळीमेळीचे राहावेत यादृष्टीने ती करीत असलेलं काम वगळता, वस्तू गुपचूप गहाण ठेवून पैसे कर्जाऊ देणे व इतर अशाच मलई वर काढणाऱ्या गुप्त भानगडींतही तिने बोटं बुचकळलेली होती. ती राहात असलेलं घर तिने भाड्याने घेतलेलं होतं, आणि त्यातल्या खोल्या पोटभाड्याने देऊन ती जमेल तितका नफा काढत असे; तिच्याकडे निदान तीनचार हजार पाउंडांची माया जरी साठलेली असली तरीदेखील दैनंदिन गरजेच्या चीजाही विकत घेण्याची परवानगी तिने स्वत:ला नाकारलेली होती, आणि तिच्या पोटभाडेकरूंना दाबून जे काही बाहेर येईल त्यातच ती काटकूट करून भागवून नेत असे.

हे कोवळं जोडपं आपल्याकडे निवाऱ्याला आलेलं पाहून ताबडतोब तिच्या डोक्यात आलेला पहिला विचार, ज्या ज्या मार्गाने पैसे काढणं शक्य आहे त्या त्या मार्गाने ते आमच्याकडून कसे काढता येतील हाच होता हे नक्की; आणि आमची परिस्थिती व अनुभवाची वानवा पाहता, ही संधी लवकरच

आणि अनेकदा येईल अशी तिने बेचूक अटकळ बांधली. अशा या आशादायक अभयारण्यामध्ये, गिधाडिणीच्या नख्यांखाली, आम्ही आमचा तंबू ठोकला. गळेकापू मनोवृत्तीच्या कोणकोणत्या हलकट युक्त्याप्रयुक्त्या वापरून ती आम्हाला लुबाडीत असे, ह्याचा तपशील जर मी सांगत बसल्ये तर त्यात तुम्हाला रस व मला आनंद वाटणार नाही; पण बिऱ्हाड हलवण्याचा त्रास घेण्याऐवजी चार्ल्स हे सारं धिमेपणाने सहन करीत राहिला; कारण काटकसरच काय तर बचत करणंही ज्याच्या कधी डोक्यात शिरलं नाही असा एक छानछोकी तरुण, आणि या प्रांतातलं काहीही न कळणारी एक बावळट खेडवळ पोरगी, ह्या दोघांचं असल्या प्रकारांमुळे खर्चात किती फरक पडतो याकडे मुळीसुद्धा लक्ष नव्हतं.

पण या घरी मात्र, माझ्या सार्वभौम प्रेमिकाच्या पंखांच्या आसऱ्याखाली माझ्या आयुष्यातले सर्वाधिक आनंदाचे क्षण गेले; माझा चार्ल्स माझ्याजवळ होता, आणि अनुरक्त झालेल्या माझ्या हृदयाला जे हवं ते सगळं त्याच्यात सामावलेलं होतं. संगीत नाटकं, गद्य नाटकं, मास्करेडस्, अशा लंडनमधल्या कितीतरी गंमतीजंमती त्याने मला दाखविल्या; आता त्या सगळया मला आवडल्या हे खरंच, पण हजारपटीने आवडल्या अशामुळे की माझ्याजवळ तो होता, मला सगळं समजावून सांगत होता, आणि गावाकडून आलेल्या मुलीकरिता अशा देखाव्यांतली मजा नवी असल्यामुळे पहिल्याप्रथम ते दिसताच तिच्या मनात ज्या आश्चर्याच्या व कौतुकाच्या भावना उफाळून यायच्या राहणार नाहीत, त्यांचे परिणाम माझ्या चेहऱ्यावर उमटलेले बघून त्याची बहुतेक चांगलीच करमणूक होत होती. पण या साऱ्यामुळे मला मात्र माझ्या हृदयातली एकुलती एक उर्मी माझ्यावर किती संपूर्ण वर्चस्व गाजवते आहे याचा पडताळा आला; आत्मा व शरीर तिच्यामध्ये दाटीवाटीने एकत्र आलेले होते, आणि प्रेमभावनेखेरीज जीवनातल्या बाकी कशाचीही चव घ्यायला उसंत राहिलेली नव्हती. अशा ठिकाणीं, किंवा दुसऱ्या कुठल्याही ठिकाणीं, मला जे पुरुष दिसत, त्यांची जेव्हा माझ्या न्यूनविरहित ग्रीक कामदेवाशी माझ्या दृष्टीकडून तुलना होत असे, तेव्हा ते मला इतके दयनीय वाटत की एखाद्या भरकटत्या विचारापुरतीही आपण त्याच्याशी प्रतारणा केली, असा दोष स्वत:कडे घेण्याची पाळी माझ्यावर कधी आली नाही. माझं विश्व तो होता, आणि ज्यात तो नाही ते माझ्या खिजगणतीत नव्हतं. पण खरंतर माझं प्रेम इतकं अतोनात होतं की असूयेची प्रत्येक शंका व प्रत्येक ठिणगी त्याने पुरती नेस्तनाबूत केलेली होती; कारण एकदा त्या दिशेकडे केवळ किंचितसा निर्देश करणारी कल्पना मनात आल्यामुळेच मला इतके अतोनात क्लेश झाले, की माझाच स्वार्थ व मरणापेक्षाही भयंकर काही घडेल अशी धास्ती, यांमुळे ती कायमची नाकारून झिडकारून देणं मला भाग पडलं; आणि वास्तविक तसा प्रसंगही आला नाही, कारण मला ज्यांचा अप्रत्यक्ष उल्लेख करण्याचंही धाडस होत नाही अशा बड्या घराण्यांतल्या स्त्रिया चार्ल्सने माझ्याकरिता ज्या ज्या प्रसंगी सोडून दिल्या होत्या

(आणि त्याचं रूप पाहता यात फार आश्चर्यही नव्हतं), त्या साऱ्यांचं कथानक जर मी आळवीत बसले तर तो माझ्याशी किती अचलपणे एकनिष्ठ होता याची कदाचित तुम्हाला साकल्याने सिद्धता मिळेल; पण मग तुम्ही असं नाही का म्हणणार, की ज्या मेजवानीमुळे ह्या बाईचा अहंगंड पूर्वीच तृप्त व्हायला हवा होता, ती आता ही पुन्हा गरम करून खाते आहे?!

सुखाच्या श्रमांतून मध्येमध्ये विश्रांती घेत असताना चार्ल्सने स्वत:करिता आणखी एक सुख नेमून घेतलं, आणि ते म्हणजे माझं शिक्षण अभावानेच असल्यामुळे ज्या कित्येक व्यावहारिक गोष्टींबद्दल मी पुरती अडाणी होते, त्या मला त्याची स्वत:ची मजल जिथपर्यंत जाईल तिथपर्यंत शिकवणं; माझ्या ह्या गोड गुरूच्या तोंडून बाहेर पडलेला एकही शब्द मी वायफळ जाऊ दिला नाही: त्याने उच्चारलेल्या प्रत्येक अक्षरावर झडप घालून त्याला मी आकाशवाणीच मानीत आले; पण हे चालू असताना, अरबी अत्तरांना लाजवेल अशी माधुरी असलेले ओठ माझी चुंबने घेत राहिल्यामुळे येणारा एकमेव व्यत्यय खपवून घेण्याचा आनंद मात्र मला अव्हेरता आला नाही.

त्याने मला सांगितलेल्या माहितीकडे मी किती कसून लक्ष दिलं होतं, याचा मी केलेल्या प्रगतीतून पडताळा देणं थोड्या अवधीतच मला शक्य झालं: ती सगळी मी त्याला जवळजवळ शब्दश: परत म्हणून दाखविली; आणि मी पोपटपंची करीत नसून मला ती समजली आहे आणि मी त्यावर विचार केला आहे, ही बाब सिद्ध करण्यासाठी माझ्या मतांची पुस्ती जोडली व चौकस प्रश्न विचारले. माझी निरीक्षणशक्ती इतकी तिखट होती आणि प्रत्येक उगवत्या दिवसाबरोबर त्याच्या प्रेमाला आपण अधिकाधिक पात्र ठरावं ही माझी इच्छा इतकी प्रबळ होती, की माझा गावाकडचा हेल, आणि माझ्या चालण्यातला, बोलण्यातला व वागण्यातला गावढेपणा, आता लक्षात येण्याइतक्या वेगाने झिजून जाऊ लागला.

पैशाबद्दल सांगायचं तर त्याला मिळालेलं सगळं जरी तो सतत माझ्याकडे आणत राही, तरीदेखील माझ्या कपाटात त्याकरिता जागा करायला मी कबूल व्हावं यासाठी त्याला बरीच तोशीस पडली: आणि त्याला खूष करण्यापलीकडे माझ्या मनाची उडी नसल्यामुळे, माझा पोषाख अधिक देखणा असेल तर हे सोपं होईल, याव्यतिरिक्त दुसऱ्या कुठल्याही युक्तिवादाच्या बळावर त्याच्याकडून कपड्यांची भेट स्वीकारायला तो मला राजी करू शकला नाही. त्याला आधार देण्यासाठी मी कितीही काबाडकष्ट आनंदाने सोसले असते आणि हाडांपर्यंत बोटं झिजवली असती; तेव्हा त्याला भार होऊन राहण्याची कल्पना मला सहन झाली असती का याचा निवाडा तुम्हीच करा: हा माझा

नि:स्वार्थीपणा इतका साहजिक होता, इतका थेट हृदयातून आलेला होता, की चार्ल्सला तो जाणवल्याखेरीज राहिला नाही; आणि माझं त्याच्यावर जसं प्रेम होतं तसं त्याचं माझ्यावर जरी नव्हतं (आम्ही सततचा पण गोड वाद घालीत असू ते ह्या एकाच मुद्द्यावरून), तरीसुद्धा निदान तो अशा प्रकारे वागत असे की दुसरा कोणताही पुरुष अधिक हळुवार, प्रेमळ किंवा एकनिष्ठ असणं शक्य नाही, असा विश्वास बाळगण्यातलं समाधान मला मिळालेलं होतं.

चार्ल्स सोबत नसताना कुठल्याही कारणासाठी मी आमच्या बिऱ्हाडातून बाहेर पडत नसले, तरीदेखील आमची घरमालकीण मिसेस जोन्स अनेकदा वर येत असे; तेव्हा आम्ही दोघांनी चर्चला टांग मारलेली आहे, आणि अर्थात त्यामुळे आमचं एकमेकांबरोबरचं नातं काय स्वरूपाचं आहे, हे रहस्य फार धूर्तपणा करावा न लागता तिने माझ्याकडून काढून घेतलं; माझ्याभोवती तिने रचलेले व्यूह लक्षात घेता या परिस्थितीमुळे ती नाराज बिलकुल झाली नाही; आणि दुर्दैवाची गोष्ट अशी की ते चलनात आणण्याची संधी तिला खूपच लवकर मिळणार होती. मला नादाला लावण्यासाठी किंवा निदान माझ्या संरक्षणकर्त्यापासून दूर करण्यासाठी तिच्या एका गिऱ्हाइकाकडून तिला कंत्राट मिळालेलं होतं; आणि ह्या बाईच्या स्वत:च्या आयुष्यातल्या अनुभवावरून तिला इतकी समज आलेली होती, की निदान त्या घटकेला तरी आमचे जसे होते तसे परस्परांशी असलेले अतिशय घट्ट प्रेमसंबंध तोडण्याचा किंवा त्यांना वेगळं वळण देण्याचा कितीही छुपा व आडवळणी प्रयत्न केला, तरी या कंत्राटाचा आम्हा दोघांपैकी एखाद्याला सुगावा लागू शकेल; आणि आपला भरपूर फायदा करून देणारे दोन भाडेकरू आपण हटकून गमावून बसू. पण यानंतर थोड्याच दिवसांत, आम्हाला विलग करण्याच्या व्यापातून माझ्या क्रूर नशीबाने तिची सुटका केली.

माझ्या जीवनाचं जो जीवन, त्याचा मला मिळालेला अकरा महिन्यांचा सहवास आनंदाच्या खळखळ वेगाने वाहणाऱ्या प्रवाहाबरोबर वाहून गेला: पण इतक्या टोकाचं काहीच कधी टिकण्यासारखं नसतं. त्याचं मूल माझ्या पोटात असल्याला आता तीन महिने झाले होते, आणि माझ्याविषयी त्याला वाटणाऱ्या मायेत भर पडायला जागा आहे यावर विश्वास ठेवायला त्याने मला कारण दिलं असतं, तर कदाचित या निमित्ताने ती पडली असती; मात्र तेव्हाच अनपेक्षित वियोगाचा प्राणांतिक आघात आमच्यावर झाला. हा तपशील मनात आणला तर अजूनही अंगावर शहारे येतात, आणि मी यातून कशी व कशाच्या आधारे जिवंत बाहेर पडले हे या क्षणापर्यंत मला समजलेलं नाही, तेव्हा वेगाने घोडदौड करून हा वृत्तान्त मी संपवून टाकत्ये. माझा श्वास व माझं अस्तित्व त्याच्यात सामावलेलं असताना, त्याला पाहिल्याखेरीज किंवा त्याच्याकडून निरोप कळल्याखेरीज चोवीस तास लोटले आहेत असं आत्तापर्यंत कधीही झालेलं नसताना, या प्रसंगी मात्र त्याची काही बातमी न लागता

आयुष्याइतके लांब असे दोन दिवस मी कसेबसे ढकलून काढले होते. तिसऱ्या दिवशी माझी चलबिचल इतकी वाढली, आणि मला इतक्या टोकाच्या शंकाकुशंका येऊ लागल्या की मी पुरती आजारून गेले; हा धक्का आता सहन होईनासा झाल्यामुळे बिछान्यावर कलंडले, आणि मिसेस जोन्सकरिता घंटी वाजवली तशी ती वर आली; एवढा वेळ मात्र माझी समजूत काढून माझ्या काळज्या कमी करण्याच्या दिशेने तिने पाऊलसुद्धा टाकलेलं नव्हतं.

शब्द फुटावेत म्हणून माझे श्वास आणि त्राण कसेबसे एकवटून मी तिला विनवणी केली, की माझा जीव वाचवणं तुझ्या हाती आहे; आणि हे करायचं, तर ह्या जीवाचा एकमेव आधार व एकमेव दिलासा काय परिस्थितीत आहे हे काहीतरी करून आत्ताच्या आत्ता शोधून काढायला हवं. माझं दु:ख तात्पुरतं हलकं न होता अधिक तीव्र होईल अशा रीतीने तिने माझी कीव केली, आणि या कामासाठी ती बाहेर निघून गेली. तिला फार अंतर जावं लागणार नव्हतंच; कारण चार्ल्सचे वडिल तिथून जवळच, कव्हेंट गार्डनकडे जाणाऱ्या एका रस्त्यावर राहात होते. जिच्याकडून मला व्यवस्थित माहिती कळेल अशी एक नोकराणी त्यांच्या घरी होती, आणि मिसेस जोन्सला तिचं नाव मी दिलेलं होतं; त्याप्रमाणे ती जवळच्या एका पब्लिक हाऊसमध्ये गेली आणि तिने निरोप पाठवला. त्याप्रमाणे नोकराणी ताबडतोब आली; आणि मास्टर चार्ल्सचं काय झालं, तो लंडन सोडून गेला आहे का, अशी मिसेस जोन्सने तिच्याकडे चौकशी करताच, मालकाने आपल्या मुलाची कशा तऱ्हेने सोय लावली याची दुसऱ्याच दिवशी साऱ्या नोकरांपर्यंत फुटलेली बित्तंबातमी तिने वेळ न गमावता सांगून टाकली.

आपल्या मुलाचा त्याच्या आजीवर आपल्यापेक्षा जास्त प्रभाव असावा याची कठोर शिक्षा म्हणून त्याचा तडकाफडकी काटा काढावा अशी तरतूद त्याने केलेली होती, आणि मुलाने इंग्लंड सोडण्याच्या व त्याच्याकरिता नेमून दिलेला समुद्रप्रवास करण्याच्या योजनेत आजीने आपल्या मायेपोटी खोडा घालू नये, हे यात गुप्तता पाळण्यामागचं कारण होतं; ह्यासाठी त्याने रचलेला प्रथमदर्शनी खरा वाटण्यासारखा बनाव असा: श्रीमंत व्यापारी असलेला त्याचा एक भाऊ दक्षिण पॅसिफिकमध्ये स्थायिक होता, पण तो नुकताच मेल्यामुळे आता पुतण्याच्या नावे बरीच मालमत्ता वारसाने जमा झालेली आहे, याबद्दलची रीतसर सूचना व मृत्युपत्राची नक्कल अलिकडेच हाती पडलेली आहे, आणि या संपत्तीचा ताबा घेण्यासाठी तिकडे जाणं हे काम अतिशय तातडीचं असून मुळीच टाळता येण्यासारखं नाही. अशा रीतीने आपल्या मुलाला घालवून देण्याचा बेत मनाशी पक्का केल्यानंतर, त्याला कळू न देता त्याच्या सामानसुमानाची आवश्यक ती तजवीज बापाने करून घेतली, एका जहाजाच्या कप्तानाबरोबर सौदा पटवला, आणि आपल्या हुकमांची अंमलबजावणी वेळेवर होईल

याची शहानिशा करण्यासाठी, जहाजाच्या मालकाचा, म्हणजेच पर्यायाने ह्या कप्तानाच्या आश्रयदात्याचा वशिला आणविला; थोडक्यात सांगायचं तर त्याने पुरता सरंजाम इतका बिनबोभाट आणि पद्धतशीर जमवला होता, की आपण काही तासांसाठी नदीवर सहल करायला जातो आहोत असं चार्ल्सला वाटलं; पण त्याला जहाजावरच डांबून ठेवण्यात आलं, पत्र धाडण्याची मनाई करण्यात आली, आणि एखाद्या राजबंद्यावर ठेवावी त्याहीपेक्षा करडी नजर त्याच्यावर ठेवण्यात आली.

अशा तऱ्हेने माझ्या प्राणांची पूज्यमूर्ती माझ्यापासून तोडून नेऊन जबरदस्तीने दीर्घ प्रवासावर पाठवण्यात आली, आणि तेसुद्धा सोबतीला जिव्हाळ्याचं कोणीही नसता किंवा दिलाशाचं एक वाक्यदेखील न मिळता; बापाने त्याला दिलं काय तर एक औपचारिक स्पष्टीकरण, बंदरावर पोहोचल्यानंतर पुढे काय करायचं याबद्दल सूचना, आणि तिथल्या मुनीमासाठी काही ओळखीची पत्रं: पण हा सगळा तपशील मला बारीकसारीक कळला तो बऱ्याच नंतर. नोकराणी यापुढे हेही म्हणाली की तिच्या इतक्या कौतुकाच्या धाकट्या मालकांना असं वागवल्यामुळे आजीच्या जिवाला हादराच बसेल; आणि ते अगदी खरंच झालं, कारण हकिकत ऐकल्यानंतर म्हातारी महिनाभरदेखील जगली नाही. त्यातसुद्धा तिचा सगळा पैसा वर्षासनात अडकलेला असून त्यातून तिने शिल्लक अशी काहीच बाजूला काढलेली नसल्यामुळे, ज्या लाडक्या नातवाचं दुसऱ्याच्या असूयेपोटी वाटोळं झालं त्याच्यासाठी तिने सांगण्यासारखं फारसं मागे ठेवलं नाही; पण मरण्यापूर्वी त्याच्या बापाला भेटायला मात्र तिने निक्षून नकार दिला.

मिसेस जोन्स जेव्हा परतली आणि मी तिच्या डोळ्यांकडे पाहिलं, तेव्हा ते इतके निश्चिंत व जवळजवळ खूष दिसले, की माझ्याकरिता ती चांगली बातमी आणून माझ्या कष्टावलेल्या मनाला दिलासा देणार अशी गोड समजूत मी करून घेण्यापर्यंत आणलीच होती; पण माझ्या आशावादाला झालेला हा दयाशून्य भ्रम होता: कारण ह्या रामोशिणीने सरळ मला माझ्या हृदयातच भोसकून, थंड आविर्भावात मुद्द्याचं तेवढं सांगितलं ते असं की त्याला समुद्रप्रवासाला धाडलेला आहे, त्यात किमान चार वर्षं तरी जातील (इथे तिने खुनशीपणा करून ताणलं), तेव्हा तो पुन्हा कधी भेटेल अशी अपेक्षा धरण्यात अर्थ नाही: हे सगळं तिने आजूबाजूचे तपशील देऊन सांगितल्यामुळे मला विश्वास ठेवावाच लागला, आणि सर्वसाधारणपणे ते असायला नकोत इतके खरे होते.

तिचा अहवाल सांगून होतो न होतो तोच मला मूर्च्छा आली, आणि डोकं ठिकाणावर नाही व कशाचं भान नाही अशा परिस्थितीत एकामागून एक झटके येऊन माझ्या चार्ल्सच्या प्रेमाचं जिवाभावाचं

प्रतीक मी गमावून बसले: पण करंट्या लोकांनी जेव्हा मरणं चांगलं, तेव्हा ते कधी मरत नाहीत; आणि बाई जगायला जिवट, अशी तर म्हणच आहे. मनात लोभ धरून माझी जी सहानुभूतिशून्य शुश्रूषा करण्यात आली त्यामुळे नकोसा झालेला एक जीव वाचला: आनंदी क्षणांनी व सुखांनी पूर्वी पात्र भरून गेलेलं होतं, पण अचानक आता मला हालअपेष्टा, खोलपर्यंत पाझरलेलं दु:ख, आणि मनाची धारदार तगमग यांखेरीज काहीसुद्धा समोर दिसेना. मृत्यूने माझी सुटका करून मला या दु:खापासून लांब घेऊन जावं याकरिता मी त्याच्याकडे सतत साकडं घालीत असताना, त्याच्या प्रेमळ प्रयत्नांविरुद्ध माझी शरीरप्रकृती व तरुणाई झगडा देत होती; असे सहा आठवडे गेले, पण शेवटी तो कमजोर पडून त्याने माझी निराशा केली; आणि शेवटी मी दुखण्यातून उठले तेव्हा इतकी बथ्थड आणि भकास अवस्थेत होते, की मला भ्रमिष्टपणा येऊन वेड्यांच्या इस्पितळात भरती करावं लागेल असा धोका उत्पन्न झालेला होता.

मुख्य सांत्वनाधिकारी, असा तो काळपुरुष मात्र माझ्या दु:खांची तीव्रता कमी करून त्यांच्याविषयीची माझी जाणीव बोथट होत जाईल अशी सोय पाहू लागला. माझं आरोग्य मला परत मिळालं, पण तरीदेखील एक शोकमग्नतेचं, निराशेचं व अशक्तपणाचं वलय माझ्याभोवती राहिलंच; आणि याची परिणती म्हणून, मूळच्या गावाकडच्या राहणीमुळे आलेला माझ्या त्वचेचा रसरशीत लालिमा पुसून जाऊन तिचा वर्ण अधिक सौम्य व भावस्पर्शी झाला.

हे सारं होत असताना, मालकीणबाईने अगत्यशीलपणे मला लागेल ते आणून देऊन कशाची कमतरता पडणार नाही याची काळजी घेतलेली होती: आता तिच्या मनातला हेतू साध्य होईल इतपत माझी स्थिती सुधारली आहे असं पाहून, एके दिवशी दुपारी एकत्र जेवल्यानंतर, तिने आजारातून उठल्याबद्दल माझं अभीष्टचिंतन केलं, याचं श्रेय पूर्णपणे स्वत:कडेच घेतलं, आणि हे सगळं कशासाठी तर छातीत कमालीची धडकी भरविणारं हलकट भरतवाक्य उच्चारण्यासाठी: मिस फॅनी, तू आता पुष्कळच बरी झालेली आहेस, आणि तुला इथे माझ्या घरी राहायचं तितके दिवस राहा, माझी काहीसुद्धा हरकत नाही; पण असं बघ की इतके दिवस जरी तुला मी काही मागितलं नाही, तरी आता मला एके ठिकाणी पैसे द्यावे लागणार आहेत, तेव्हा त्याची काहीतरी सोय केली पाहिजे." आणि एवढं म्हणून, थकलेलं भाडं, खाणंपिणं, औषधपाणी, मलमपट्टी या सगळ्याचं मिळून तेवीस पाउंड, सतरा शिलिंग, सहा पेन्स इतक्या रकमेचं बिल तिने माझ्यासमोर ठेवलं: हे भागवण्याकरिता माझ्याजवळ फक्त सात गिन्न्या होत्या – त्यासुद्धा माझा लाडका चार्ल्स आणि मी बचत करून साठवलेल्यातल्या माझ्याकडे चुकून राहून गेलेल्या; अर्थात हे सारं तिला अतिशय चांगलं ठाऊक होतं. पण तरीदेखील, पैसे देण्यासाठी मी काय सोय करणार आहे हे तिला सांगावं अशी तिची इच्छा होती.

मी ओक्साबोक्सी रडू लागले व माझी परिस्थिती तिला सांगितली; आणि पुढे म्हणाले, की माझ्याकडे थोडेफार कपडे आहेत ते मी विकायला काढीन, आणि उरलेले पैसे शक्य तितक्या लवकर देईन. पण माझी अडचण तिच्या पथ्यावर पडणार असल्यामुळे ती आणखीनच आखडली. अतिशय थंडपणे ती मला म्हणाली, "नशिबाने तुझी अवघड परिस्थिती आहे याचं मला खरंच फार वाईट वाटतं, पण मला माझंही पाहिलं पाहिजे, आणि इतक्या कोवळ्या मुलीला तुरुंगात पाठवायचं तर ते माझ्या जिवाला फार लागून राहील..." हा 'तुरुंग' शब्द ऐकताच माझ्या रक्ताचा थेंबनथेंब गोठून गेला; आणि मला बसलेल्या धास्तीने माझा असा जबरी कब्जा घेतला, की एखाद्या कैद्याला त्याचा वधस्तंभ पहिल्यांदा सामोरा यावा तसं होऊन माझ्यातलं त्राण गेलं, मी फिकट पडले व शुद्ध गमावण्याच्या बेतात आले.

माझ्या घरमालकिणीचा उद्देश मला फक्त ठराविक मर्यादेपर्यंतच घाबरवण्याचा होता, आणि माझ्या शरीराविषयी तिचे जे बेत होते त्यांत कोलदांडा पडेल अशा अवस्थेत ते तिला जाऊ द्यायचं नव्हतं; त्यामुळे पुन्हा ती माझी समजूत काढू लागली, आणि आवाजात हेतुपुरस्सर अधिक मऊपणा व कणव आणून मला म्हणाली, की अशी टोकाची कारवाई मला करावी लागली तर तो तुझाच दोष ठरेल; पण ह्या प्रकरणाचा आपल्या दोघींसाठीही समाधानकारक असा सोक्षमोक्ष लावू शकणारा एक भला माणूस माझ्या माहितीचा आहे; आज दुपारीच त्याला मी आपल्याबरोबर चहा प्यायला बोलावल्ये, आणि तेव्हा एकमेकांना समजून घेऊन आपण काहीतरी तोडगा काढू शकू, असा विश्वास मला वाटतो. ह्या सगळ्याला मी एका शब्दानेही उत्तर केलं नाही; तर उलट गोंधळून, हादरून जाऊन, घुमेपणाने बसून राहिले. पण आता ठसे माझ्यात खूप खोलवर उमटलेले असतानाच घाव घातला पाहिजे हे मिसेस जोन्सने अचूक ओळखलं; तेव्हा तुरुंगात जाण्याच्या कल्पनेने माझी विचारशक्ती आसन्नमरण घायाळ झालेली असताना, आणि यातून सुटकेची आशा दाखविणाऱ्या कुठल्याही तुसकटाला मी हात ताणून पकडू पाहात असताना, माझ्या कल्पनाविश्वामध्ये मला भेडसावणाऱ्या यच्चयावत जाणीवांची सोबत करण्याच्या कामी ही बाई मला एकटीला सोडून निघून गेली.

अशा परिस्थितीमध्ये, दुःखाने व निराशेने गिळून टाकलेल्या अवस्थेत मी जवळजवळ अर्धा तास बसून राहिल्यानंतर ती पुन्हा आत आली; माझ्या चर्येवरची मरणकळा बघूनही तिच्या अंतस्थ हेतूचा पाठपुरावा करीतच राहात तिने माझी दया आल्याचा अभिनय केला, आणि मला हिंमत धरायला सांगून ती म्हणाली, की स्वतःचं हित कशात आहे हे जर तू ओळखलंस तर गोष्टी तुला वाटतात तितक्या वाईट थराला जायचं कारण नाही; यापुढे तिने पुस्ती जोडली ती अशी की एका अतिशय

सन्माननीय गृहस्थांना मी तुझ्याबरोबर चहा प्यायला बोलावलेलं आहे, आणि तुझ्या सगळ्या अडचणी कशा निकालात काढता येतील, याबद्दल ते तुला फार मोलाचा सल्ला देतील. प्रत्युत्तराची वाट न पाहता ती बाहेर गेली, आणि आत्ताच्या व इतरही प्रसंगी ज्याची ती अतिशय सन्माननीय कुंटीण होती, अशा ह्या अतिशय सन्माननीय गृहस्थाला घेऊनच आत आली. खोलीत येताच त्याने मला अतिशय अदबीने कमरेत वाकून नमस्कार केला, पण रीतीप्रमाणे गुडघ्यात वाकून त्याचा नमस्कार परतवण्याइतकी माझ्या अंगी शक्तीही नव्हती व मनाला तरतरीही नव्हती; तेव्हा आता घरमालकिणीने पहिल्या भेटीचे सगळे उपचार पाळण्याचा मक्ता स्वत:कडे घेऊन (कारण माझ्या आठवणीत तरी मी या गृहस्थाला पूर्वी कधी पाहिला नव्हता), त्याच्यासाठी व स्वत:साठी एकेक खुर्ची मांडली. हे सारं होत असताना एका शब्दाचीही देवाणघेवाण झाली नाही; कारण मख्खपणे एकटक पाहात राहणं इतपतच करू शकणारा चेहरा त्या लोकविलक्षण प्रसंगाकरिता मला उरलेला होता.

चहा तयार झाला, पण ह्या संपूर्ण अनोळखी माणसासमोरचा माझा अबोलपणा व बुजरेपणा पाहून घरमालकीण अधिक वेळ दवडायला नाखूष दिसली; तेव्हा ओंगळ सलगी दाखवीत, आणि अधिकाराचा सूर लावीत ती म्हणाली, "फॅनी! पोरी, मान उंच ठेव! इतका गोड चेहरा आहे तो दुर्मुखली राहून खराब होऊ देऊ नकोस. काय तुझं तरी! वाईट वाटणं थोडे दिवसच टिकतं; अगं, हे बडे साहेब तुझा त्रास ऐकून तुझी मदत करायला आले आहेत, त्यांच्याशी नीट ओळख करून घे; उगीच मी असं करायची नाही आणि तसं जमायचं नाही असली खुसपटं काढीत बसू नकोस; जोपर्यंत माल खपतोय तोपर्यंत खपवून घे."

भाषेच्या सूक्ष्म अर्थछटा फार कौशल्याने दाखविणारी ही आक्रस्ताळी कटकट ऐकून मी भेदरून हतबुद्ध झाल्याचं, आणि यावर काही उत्तर देण्याकरिता माझी बोलतीच बंद होऊन गेल्याचं या गृहस्थाच्या लक्षात आलं; मालकिणीने इतक्या फटकळपणाने विषयाला हात घातल्यामुळे, त्याच्या मनात माझं जे हित करायचं होतं ते स्वीकारायला राजी होण्याऐवजी मी बिथरण्याचीच शक्यता अधिक असं वाटून तो तिच्यावर नाराज झाला, आणि आता माझ्याकडे वळून म्हणाला: तुझी सगळी हकिकत व तुझ्यावर संकटं आणणारा प्रत्येक प्रसंग मला पुरेपूर माहित आहे, आणि तुझ्यासारख्या सुंदर, कोवळ्या मुलीला अशा खाईत पडावं लागणं फार दु:खाचं होत असेल हेही मी समजू शकतो; कित्येक दिवसांपासून तू मला आवडत आलेली आहेस (याचा इथे बसलेल्या मिसेस जोन्स निर्वाळा देतीलच), पण दुसऱ्या व्यक्तीशी तुझे दाट प्रेमानुबंध असलेले पाहून मी सगळ्या आशा सोडल्याच होत्या; त्यानंतर मात्र अचानक तुला नशीबाची प्रतिकूलता झाल्याचं जेव्हा माझ्या कानावर आलं, तेव्हा तुला

काहीही कमी पडू नये अशा स्पष्ट सूचना मी तुझ्या घरमालकिणीला देऊन ठेवल्या; यानंतर मला हॉलंडातल्या हेग शहरी काम निघालं, आणि त्यातून बाहेर पडता येईना तेव्हा तिथे जावंच लागलं, नाहीतर तू आजारी असताना मीच तुझी शुश्रूषा केली असती; कालच मी परतलो, तेव्हा तू बरी झाल्याचं कळताच हिच्याशी ओळख करून दे अशी मी तुझ्या घरमालकिणीला विनंती केली, आणि तुझ्या परिचयाचा आनंद मला देणाऱ्या या प्रसंगी ती ज्या प्रकारे वागली त्यामुळे तुला जितका धक्का बसला असेल निदान तितकाच मला राग आलेला आहे; पण तिच्या वर्तणुकीला माझा मुळीच पाठिंबा नाही, आणि हलकटपणा करून तुझ्या परिस्थितीचा गैरफायदा घेण्याची किंवा तू माझ्या उपकारांत राहावंस यासाठी काही अटी घालण्याची माझी मुळीच इच्छा नाही हे तुला दाखवण्याकरिता, मी आत्ताच्या आत्ता तुझ्या डोळयांसमोर मालकिणीकडची सगळी थकबाकी चुकती करून संपूर्ण रकमेची पावती तुला द्यायला लावतो; आणि मग त्यानंतर माझा प्रस्ताव मान्य किंवा अमान्य करणं हे स्वातंत्र्य तुला आहे, कारण तुझ्या इच्छेवर दबाव आणणं हे काही माझ्या हातून व्हायचं नाही.

तो आपलं मनोगत माझ्यासमोर उघड करीत असताना मी त्याच्या दिशेने नजर किंचित वर करून त्याचं रंगरूप पाहून घेतलं, तेव्हा मला एक अतिशय बांधेसूद व देखणा माणूस दिसला; वयाने तो चाळीसच्या आसपास होता, त्याचा पेहराव साधेपणाने निवडलेला होता, आणि एका बोटावर हिऱ्याची मोठी अंगठी होती; बोलताना तो हातवारे करीत असल्यामुळे तिची लकाकी माझ्या डोळ्यांत खेळत राहून, ह्या माणसाची ऐपत किती आहे याबद्दलच्या माझ्या कल्पना उंचावल्या. थोडक्यात सांगायचं तर राजबिंडा हा शब्द सहज तोंडात यावा असा तो होता, आणि त्याचं घराणं व सांपत्तिक स्थिती यांमुळे सहजच चारचौघांत उठून दिसण्यासारखा होता. त्याने केलेल्या सगळ्या भाषणबाजीला मात्र, मला दिलासा देण्यासाठी घळघळा वाहत असणाऱ्या अश्रूंनीच परस्पर उत्तर दिलं; आणि त्यांनी माझा आवाज कोंडून ठेवून मला बोलता येईनासं केलं ही गोष्ट चांगलीच घडली, कारण काय उत्तर द्यावं हे मला समजलं नसतंच.

पण हे दृश्य पाहताच हेलावून जाऊन त्याला राहवेना (असं त्याने मला नंतर सांगितलं), आणि माझं डोंगराएवढालं दुःख काहीसं कमी झालेलं आहे असं वाटायला मला कारण देण्याकरिता त्याने आपला कसा बाहेर काढला, मालकिणीने तयारच ठेवलेली दौतलेखणी मागवून घेऊन तिच्या थकबाकीतला प्रत्येक फद्या चुकता केला, पण अर्थात याखेरीज एक प्रशस्त बिदागी तिला माझ्या अपरोक्ष दिली जाणार होती; आणि पूर्ण रकमेची पावती तिच्याकडून घेऊन, हलकेच माझ्या हातात कोंबून, त्याने ती मला निमूटपणे खिशात ठेवायला लावली. तरीदेखील माझ्या मनस्थितीला सोसाव्या लागलेल्या क्रूर

धक्क्यांतून अजून ती पुरती सावरलेली नसल्यामुळे, यानंतरही मी खिन्न व भकास अवस्थेत निर्बुद्धपणे बसून होते; माझी समजूतदार घरमालकीण या अनोळखी इसमाबरोबर मला एकटीच सोडून माझ्या नकळत खोलीबाहेर निघून गेलेली होती, आणि हे जेव्हा मी पाहिलं तेव्हा न दचकता पाहिलं, कारण माझ्यात आता जीव उरलेला नसून मला कशानेही फरक पडणार नव्हता. पण असल्या व्यवहारांच्या बाबतीत नवखा नसलेला हा गृहस्थ माझ्याजवळ आला, आणि मला धीर देण्याच्या मिषाने त्याने आपला हातरुमाल काढून माझ्या गालावरून ओघळणारे अश्रू टिपून घेतले: यानंतर तो माझं चुंबन घेण्याचा प्रयत्न करू लागला, पण माझ्या बाजूने नाराजीही नव्हती किंवा संमतीही नव्हती.

मी गोणीसारखी ढिम्म राहिले, डोळ्यांसमोर केल्या गेलेल्या पैशाच्या देवघेवीमुळे आपली खरेदी झालेली आहे असं समजले, आणि माझ्या गरीब बिचाऱ्या शरीराचं पुढे काय होतं याची मला फिकीर राहिली नाही; आता थोडादेखील प्रतिकार करण्याइतपत माझ्या अंगी धैर्य किंवा त्राण शिल्लक नसल्यामुळे आणि माझ्या स्त्रीत्वाबरोबर येणारी लज्जाही क्रियाशील नसल्यामुळे, ह्या माणसाला जे करायचं होतं ते सगळं मी पाळीवपणे सहन केलं; मला नकळत एकीमागून दुसरी मोकळीक घेत जात, माझ्या गळ्याभोवतीच्या रुमालातून स्तनांत हात खुपसत त्याने ते चोखंदळपणे हाताळले; कसलाच विरोध न जाणवल्यामुळे, आपल्या कामना पूर्ण होण्याकरिता सर्व गोष्टी अपेक्षेपलिकडे अनुकूल आहेत असं लक्षात येताच त्याने निष्क्रिय व निष्प्राण अवस्थेतल्या मला बाहुपाशात उचलून घेतलं आणि पलंगावर घेऊन जाऊन हळूच खाली ठेवलं; आता माझ्याशी काहीही करणं त्याला शक्य आहे अशी परिस्थिती असताना, त्याचं काय चालू आहे हे मला कळलं देखील नाही; पण नंतर मात्र एका कलेवरासारख्या संवेदनाशून्य बेशुद्धीतून बाहेर येताच तो माझ्यात रुतून बसलेला असल्याचं माझ्या लक्षात आलं, आणि मी मात्र हालचाल न करता किंवा आनंदाचा एक थेंबही अंगाला न लागता अशी पडून होते, की बऱ्याच वेळापूर्वी मरून गारठलेल्या प्रेतातही जाणीवा किंवा चेतना माझ्यापेक्षा कमी नसत्या.

ज्या स्थितीत मी होते तिच्याविषयी फार थोडी तमा बाळगणारी त्याची वासना त्याने शमविल्यानंतर तो आता बाजूला झाला, माझे अस्ताव्यस्त झालेले कपडे त्याने पुन्हा सारखे केले; आणि एका धडधडीत परक्या माणसाच्या मिठ्या या बिछान्यावर चालवून घेतल्याबद्दल ज्या पश्चात्तापाच्या व स्वत:वरील संतापाच्या उद्वेगाने माझा ताबा घेतला होता (फारच उशीरा, हे मी कबूल करत्ये), त्याला शमविण्याचा तो अतिशय गोडीगुलाबीने प्रयत्न करू लागला. मी माझे केस उचकटून काढले, हात जोरजोराने चोळले आणि वेड लागलेल्या बाईसारखी छाती पिटली. पण ज्या माणसाकडे मी

आता माझा मालक म्हणून पाहू लागले होते, तो जेव्हा माझी समजूत काढण्याच्या खटपटीस लागला; तेव्हा माझ्या साऱ्या निर्भर्त्सनेचं लक्ष्य मी स्वत:च असल्यामुळे, आणि त्यातला थोडाही हिस्सा त्याच्याकडे रोखण्याची मला मुभा नाही अशी माझी धारणा असल्यामुळे, आवाजात राग कमी व काकुळती जास्त आणून मी त्याला म्हणाले की मला एकटं सोडा, जेणेकरून निदान माझा त्रास मला एकांतात भोगता येईल. मी स्वत:चं काही बरंवाईट करून घेईन अशी भीती वाटत असल्याचा आव आणून त्याने याला स्पष्ट नकार दिला.

आततायी भावना सहसा फार वेळ टिकत नाही, आणि बाईची तर नाहीच नाही. ह्या वादळानंतर एक सुन्न शांतता पसरली, आणि अश्रूंचा जबरदस्त पाऊस पडून संपली. चार्ल्स सोडून तू इतर कुणाशी संग करशील असं जर मला एखाद्याने यापूर्वी काही क्षण आधी सांगितलं असतं तर मी त्याच्या तोंडावर थुंकले असते; किंवा माझ्याकरिता माझ्या डोळ्यांसमोर जितके पैसे दिले गेले, त्याच्या अनंतपटींनी मला देऊ केले असते तरीदेखील असा प्रस्ताव मी थंडपणे झिडकारला असता. पण आपल्यामधले गुणदोष तत्कालीन परिस्थितीवर फार अवलंबून असतात; तुरुंगवासाच्या भेडसावणाऱ्या चित्रांमुळे माझी मती बधीर झालेली असताना अनपेक्षित हल्ला झाला, आणि अतिशय खोल गेलेलं दु:ख दीर्घकाळ सहन करावं लागल्यामुळे अशक्त झालेल्या मनाने माझा घात केला; तेव्हा कदाचित माझा पराभव अधिक क्षम्य ठरावा, कारण मी तिथे उपस्थित निश्चितच नव्हते आणि कोणत्याही अर्थाने त्यात माझा सहभाग नव्हता.

पण पहिला भोग निर्णायक ठरतो; आणि हा अडथळा आता त्याने ओलांडलेला असल्यामुळे, ज्या माणसाने आपल्यावर दावा प्रस्थापित केलेला आहे (मग तो कशाही मार्गाने का असेना), त्याची आलिंगने नाकारण्याचा अधिकार मला नाही अशी मी समजूत करून घेतली होती; आणि या सूत्राला धरून स्वत:ला मी त्याच्या इतकी आधीन समजले की त्याने मारलेल्या मिठ्या व घेतलेली चुंबने मी झगडा करण्याचा किंवा रागावण्याचा आव न आणता सहन करीत राहिले; त्यांतून मला अजूनतरी आनंद असा काही मिळत नव्हता, किंवा अशा प्रकारच्या जाणीवेला थारा देण्याविषयी माझ्या हृदयात जो तिटकारा बसला होता तो पुसूनही निघालेला नव्हता; तेव्हा मी जे सहन केलं, ते एक प्रकारच्या कृतज्ञ भावनेतून, आणि जे आधी घडून गेलं त्यानंतर आता हे ओघानेच येणार म्हणून सहन केलं.

पण ते काही असलं, तरीदेखील थोड्या वेळापूर्वीच ज्या अतिचारांमुळे मी इतकी कमालीची कासावीस

झालेली होते, त्यांची पुनरावृत्ती करण्याचा आपण प्रयत्न करू नये हे कळण्याइतपत विवेक त्याच्यापाशी होता; याखेरीज त्याचा मालकीहक्क आता शाबूत असल्यामुळे, माझं मन अंशाअंशानेच अनुकूल करून घ्यावं, आणि औदार्य व मनधरणी यांवर भिस्त ठेवून अपेक्षित फळं काळाच्याच हातून मिळण्याची वाट पाहावी, अशा धोरणावर समाधानी राहण्याचा त्याने निर्णय घेतला. नंतरच्या दिवसांत मात्र तो स्वत:ला नेहमी दोष लावीत असे की ही फळं मी फार हिरवट कच्चीच तोडली, विरोध करायला तू हतबल असल्यामुळे मला जणू आमंत्रणच मिळालं; आणि वासनांबरोबर वाहवत जाऊन, आनंद घेण्याकरिता जे कुचकामी आहे अशा केवळ एका अचेतन पार्थिवावर मी माझ्या अभिलाषेचं तारू आदळलं; कारण ह्या विषयातलं माझं मत असं की ज्या देहाला आनंद मिळत नाही, त्यातूनही तो कधी मिळत नाही. मी त्याच्या कह्यात ज्या तऱ्हेने गेले, त्याबद्दल त्याला पूर्णपणे क्षमा कधीच केली नाही एवढं मात्र नक्की; पण तरीदेखील एक उल्लेखनीय बाब अशी की त्याने मला जितक्या सहजपणे हस्तगत केलं होतं, तितक्याच सहजपणे सोडून देण्यापासून त्याला परावृत्त करण्याइतकं आकर्षण त्याला माझ्यामध्ये दिसावं, ही मला सुखावणारी गोष्ट होती.

ह्या साऱ्या प्रकरणात आता संध्याकाळ बरीच झालेली असल्यामुळे रात्रीच्या जेवणासाठी टेबलक्लॉथ मांडायला मोलकरीण आत आली; आणि तेव्हाच ही आनंदवार्ता मला कळली की या क्षणी जिच्याकडे पाहणं मला विषासमान वाटलं असतं, ती माझी घरमालकीण आमच्याबरोबर असणार नव्हती. आता काही उंची पदार्थ टापटीपीने वाढण्यात आले, आणि शेजारी एका गोल लाकडी टेबलावर बर्गंडीची बाटली व इतर आवश्यक चिजा ठेवण्यात आल्या. मोलकरीण खोलीतून बाहेर गेल्यानंतर हा सद्गृहस्थ मला मार्दवाने व आपुलकीने म्हणाला की बिस्तवाशेजारी हाताची खुर्ची आहे तिथे तू बैस, आणि तुला जर काही जेवायचं नसेल तर निदान मला तरी जेवताना पाहा. त्याच्या म्हणण्याबरहुकूम वागत असताना, माझ्या प्राणेश्वराशी कधीकाळी केलेल्या गंमतीदार गुजगोष्टी, आणि निष्ठुर अगतिकतेने माझ्यावर लादलेली ही नाटकी जवळीक, यांची तुलना करणारं माझं मन अतिशय खिन्न होऊन गेलं होतं. जेवण चालू असताना मला धीर देण्यासाठी व माझं प्राक्तन स्वीकारायला मी तयार व्हावं यासाठी त्याने अनेक युक्तिवाद वापरले; नंतर तो म्हणाला की माझं नाव एच–, आणि अर्ल ऑफ एल– चा मी भाऊ; हिच्याकडे एकदा पाहून घ्या असं तुझ्या घरमालकिणीने मला सुचवल्यानंतर मला तू अगदी पसंत पडलीस, आणि कितीही पैसे लागले तरी तुला मिळवण्याची तिला मी सुपारी दिली; एकदाचं या कामी यश आल्यामुळे मला जितका भरघोस आनंद झालेला आहे, तितकाच तुलाही होवो अशी माझी फार मनापासून इच्छा आहे; आणि मग मला कौतुकाची पखरण केलेली आश्वासनं देऊन शेवटी तो म्हणाला की माझ्याबरोबर असण्याचा तुला पश्चात्ताप होण्याचं काहीच कारण असू नये.

आत्तापर्यंत मी जवळजवळ अर्धा कुक्कुटकुंभा, आणि माझी शक्ती परत यावी म्हणून त्याने आग्रह करकरून पाजलेली तीनचार ग्लास वाईन इतक्या गोष्टी घशाखाली उतरवल्या होत्या; पण वाईनमध्ये काही टाकलेलं होतं, की निसर्गत: विकारी असलेली माझी शरीरप्रकृती मूळपदावर येऊन दारुगोळ्याची वात पेटण्यासाठी एवढ्याचीच खोटी होती हे ठाऊक नाही, पण मी मिस्टर एच– कडे पूर्वीइतक्या तिरस्कारानेच काय पण संकोचानेही पाहीनाशी झाले; अर्थात आता त्याच्याविषयीच्या माझ्या भावनांना अधिक मऊपणा जरी आलेला असला, तरीदेखील त्यात प्रेमाचा किंचितही कण मिसळलेला नव्हता: मिस्टर एच– ने माझ्याकरिता व माझ्याशी जे केलं ते करणारा आणि माझ्या आयुष्यात त्याची होती तीच भूमिका बजावणारा कुठलाही पुरुष मला त्याच्या जागी तसाच वाटला असता.

अनंतकाळ टिकणारी दु:खं निदान या जगात तरी नाहीत; आणि माझी संपली नसली तरी किमानपक्षी स्थगित झालेली होती: सततच्या काळजीने व त्रासाने इतके दिवस दबून पिचून गेलेल्या माझ्या मनाला आता उभारी येऊ लागली होती; आणि छोटीशी का होईना, पण कटकटींचा विसर पाडणारी व रंजन करणारी एखादी गोष्ट बाहेरून आत येऊ शकेल, इतपत सांदर त्यात दिसू लागली होती. मी थोडीशी रडले व अश्रूंनी मला हलकं वाटलं; मी निश्वास सोडले व त्यांमुळे माझ्या छातीवरून एक ओझं उतरल्यासारखं वाटलं; माझा चेहरा खुलला जरी नसला, तरीदेखील निदान थोडासा शांत आणि मोकळा झाला. हा बदल मिस्टर एच– ने पाहिला होता किंवा कदाचित घडवूनही आणला होता, आणि अशी संधी साधायलाच हवी हे समजण्याइतकी अक्कल त्याला खात्रीने होती; तेव्हा माझ्या लक्षात येणार नाही अशा बेताने तो आम्हा दोघांमधलं टेबल बाजूला सारून त्याची खुर्ची वळवून माझ्यासमोर आला, आश्वासक आवाज काढून मला लाडीगोडी लावीत पूर्वतयारी केल्यानंतर आता तो माझे हात पकडून ठेवून माझी चुंबने घेऊ लागला व पुन्हा एकदा माझ्या स्तनांशी सलगी करू लागला; माझ्या विस्कटलेल्या सैलसर तोकड्या कपड्यांत त्यांना हलण्याकरिता खूपच मोकळीक असल्यामुळे ते आता जेव्हा धपापून वरखाली होऊ लागले, तेव्हा त्यामागे संताप कमी व अजून परक्या असलेल्या माणसाने इतकी जवळीक केल्याबद्दलची भीती आणि शरम अधिक होती. पण आता लवकरच, खाली वाकून माझ्या गार्टरच्या वर हात सरकवून, त्याने मला अवाक होण्याची काहीशी जास्त मोठी संधी दिली; आणि जी खिंड यापूर्वी त्याला बिनपहाऱ्याची खुलीच सापडली होती, ती पुन्हा काबीज करण्याचा प्रयत्न केला: पण माझ्या वळवलेल्या मांड्यांचा पेच त्याला उघडता येईना – मी खालच्या पट्टीत तक्रार केली, आणि विनवणीच्या सुरात म्हणाले की मला त्रास देऊ नका, मला बरं वाटत नाही आहे.

माझ्या विरोधामागे प्रांजळपणा कमी व समारंभ अधिक आहे, असं त्याला दिसताच त्याने आपला हेका पुढे न चालवण्याचं कबूल केलं, पण ते या अटीवर की ताबडतोब मला विश्रांतीसाठी बिछान्यात धाडण्यात यावं; यानंतर त्याने घरमालकिणीला काही सूचना दिल्या, आणि शेवटी तो म्हणाला की मी तासाभराने परतेन, आणि हिच्याविषयी मला वाटणाऱ्या आकर्षणाला ह्या क्षणी ती जितकी अनुकूल दिसते आहे, त्यापेक्षा तासाभराने जास्त असेल अशी मी आशा बाळगतो. याला मी होकार किंवा नकार दिला नाही, पण ज्या आविर्भावात आणि ज्या तऱ्हेने मी त्याचा प्रस्ताव ऐकून घेतला त्यावरून त्याला हे कळून चुकलं, की तो नाकारण्याइतकी माझी स्वतःच्या इच्छेवर पकड राहिलेली नाही. मला सोडून तो बाहेर निघून गेला, आणि यानंतर एकदोनच मिनिटांत, विचार करू शकेन इतपत माझी मनस्थिती शांतावण्याआधीच, घरमालकिणीची टेबल सर्विसची भांडी घेऊन मोलकरीण आत आली, आणि एका लहानशा चांदीच्या वाटीत तिने जे काही आणलं होतं ते मसाल्याचं गरम दूध आहे, झोपण्यापूर्वी घेऊन टाक असं मला म्हणाली; त्याप्रमाणे मी ते पिताच, क्षणार्धात माझं अंग तापून एक प्रकारची आग चोराची हूल उठलेल्या जमावाप्रमाणे माझ्या साऱ्या अवयवांतून सैरावैरा धावू लागली, मला चूड लागून मी धुमसू लागले, आणि आता कुठलाही पुरुष चालेल अशा अवस्थेच्या जवळपास येऊन पोहोचले.

मी बिछान्यात आडवी होताच मोलकरीण मला 'गुड नाईट' म्हणून मेणबत्ती घेऊन निघून गेली, आणि जाताना तिने खोलीचं दार लावून घेतलं. तिला जिन्यावरून खाली उतरायला कसाबसा वेळ मिळतो न मिळतो तेवढ्यात हलकेच दार उघडून मिस्टर एच– आत आला; त्याने आता बाहेरचे कपडे उतरवून नाइट गाउन व टोपी चढवलेली होती, आणि हातात दोन पेटवलेल्या मेणबत्त्या होत्या; तो येणार अशी जरी मला अपेक्षा असली, तरीदेखील त्याने खिटी आतून लावून घेताच मी काहीशी दचकले. हलक्या पावलांनी तो पलंगापाशी आला व अगदी हळू आवाजात कुजबुजत म्हणाला, "अगं, दचकू नकोस... मी सारं काही जपून, तुला न दुखवता करीन." मग त्याने झटकन कपडे उतरवले व तो पलंगावर उडी मारून आला; पण याआधी, एकेक कपडा निघत असताना, त्याचे पिळदार स्नायू, ताकदवान अवयव आणि खरखरीत केसाळ छाती ह्या गोष्टी लक्षात घेण्याची त्याने मला वारंवार संधी दिलेली होती. हा नवा भार पडताच पलंग पुन्हा हलला.

तो पांघरुणाच्या बाहेरच राहिला, तेव्हा सर्वच ऐंद्रिय संवेदनांना आनंद मिळायला हवा हाच त्याचा विचार मेणबत्त्या जळत ठेवण्यामागे नक्की असणार; कारण माझं चुंबन घेताच त्याने पांघरूण गुंडाळून खाली आणलं, आणि लांब पसरलेलं माझं शरीर पूर्णपणे सामोरं येताच तो हरखून गेलेला

दिसला; चुंबनांची सरबत्ती करून त्याने त्यावरच्या प्रत्येक स्थळावर हजेरी मांडली, व एक तुकडा काही निसटू दिला नाही. मग तो माझ्या दोन्ही पायांमधोमध गुडघे टेकून बसला; आणि त्याने आतला सदरा वर करताच, केसाळ मांड्यांबरोबरच, ताठ होऊन टक लावून पाहणारा दंडुका उघडा पडला; टोपण लाल होतं, आणि पोटावर बेंबीपर्यंत येणाऱ्या दाट कुरळ्या केसांत त्याची मुळं पसरलेली असल्यामुळे तो काहीसा कुंच्यासारखा दिसत होता; यानंतर लवकरच माझ्या पोटाला स्पर्श झाल्याचं मला जाणवलं, आणि आता त्याने मोळा अख्खाच्या अख्खा आत घुसवताच, दोन्ही बाजूंचे केस इतकंच काय ते तावदान मध्ये राहिलं.



## भाग चौथा

ही वस्तू आता माझ्यात होती, माझ्या जाणीवेत होती, आणि घर्षण करू लागून, निसर्गदत्त प्रेरणेला तिच्या सहलीच्या ठिकाणी बोलावून घेण्याकरिता काही क्षणांतच त्याने अशी जोरदार हाळी दिली की तिथे हजेरी लावण्याखेरीज तिला तरणोपाय राहिला नाही; माझ्या साऱ्या शारीर चेतना आपसूकच त्या आकर्षणवलयाच्या दिशेने ओढल्या गेल्या, राहवत नाही इतकी मी आतमध्ये तापून चाळवली गेले, माझा बांध फुटला, आणि अजूनही निष्ठावंत राहिलेल्या प्रेमाच्या बंधनापोटी जे अडवून ठेवावेत अशी मी इच्छा बाळगायला हवी होती, ते सुखाचे पाझर, संवेदनेच्या दाबामुळे व माझ्या देहाचा निव्वळ स्त्रीधर्म म्हणून, माझ्यातून खाली आले.

हे सारं मान्य, पण तरीही! पुल्लिंग व स्त्रीलिंग एकमेकांना धडकल्यामुळे आपसूक शारीर परिणामातून उद्भवलेला हा निव्वळ पाशवी सुखाचा अनुभव कुणीकडे; तर याउलट, जेव्हा एकमेकांवर हळुवार व खरंखुरं प्रेम करणारी दोन हृदयं एकत्र येऊन अत्यानंदाचा सोहळा साजरा करतात, आणि केवळ क्षणिक वासनांच्या परिणतीमध्ये समाधान न मानणाऱ्या आत्मिक चैतन्याची त्याला जोड देत सुखपूर्तीची परमावधी गाठतात, तेव्हा परस्परांवरील प्रेमाकर्षणातून जन्मलेल्या उपभोगावर अलंकरण चढवणारा गोड भावनोन्माद, आणि अंगप्रत्यंगातून दुथडी भरून वाहणारा हर्षवेदनेचा तो पाणलोट कुणीकडे!

अशा प्रकारची काही सूक्ष्म तफावत लक्षात आल्यामुळे मिस्टर एच– ने स्वत:ला त्रास करून घेतला आहे असं दिसलं नाही, आणि पहिली मोहिम संपताच, स्वत:ला किंवा मला श्वास घेण्याचीही फारशी उसंत न देता, जणू काही स्वत:ची वरकरणी दिसणारी ताकद ही उगीचच लटकावलेली दुकानावरची जाहिरात नव्हे हे सिद्ध करण्याची जबाबदारी आपल्यावर आहे अशा अभिनिवेशात, काही मिनिटांतच पुन्हा हल्ला करण्याची तयारी करून, चुंबनांच्या झंझावाताने आधी प्रस्तावना करून, बिलकुल न थकता पुन्हा एकदा तीच मजल त्याने पार केली; आणि अशा तऱ्हेने एकामागून एक चढाया करीत राहात सकाळ होईपर्यंत मला सतत व्यायाम दिला; ह्या मधल्या कालावधीत, आपले हातपाय किती खणखणीत आहेत, खांदे किती रुंद आहेत, छाती किती भरदार आहे, आणि स्नायू किती घट्ट व बांधेसूद आहेत अशा सगळ्याची त्याने मला सांगोपांग जाणीव करून दिली; सारांश काय, तर ह्या माणसाची मर्दानगी आपल्या देशात जुन्या काळी कुऱ्हाड घेऊन युद्धाला जाणारे रांगडे सरदार होते तशा धाटणीची म्हणता येईल; परंतु याच सरदारांच्या आत्ताच्या पिढीचे प्रतिनिधी मात्र पुरती कशिदाकुसर होऊन वाया गेलेले असून त्यांच्या आधुनिक व नाजुक अंगयष्टीत स्नायूंऐवजी लापशी भरलेली आहे, आणि दिसायला ते मोठे नखरेबाज व

फिकुटलेले असून, त्यांच्या बहिणींपेक्षा किंचित कमी पौरुष त्यांच्यात आता शिल्लक उरलं आहे.

आपला दिग्विजय पाहायला दिवस उजाडला या गोष्टीमुळे मिस्टर एच– चं समाधान झालं, आणि ज्या विश्रांतीची आम्हा दोघांनाही गरज होती, ती घेण्याची त्याने मला मोकळीक दिल्यानंतर लवकरच आम्ही घनदाट झोपून गेलो. माझ्याआधी काही वेळ जरी तो उठला असला, तरीदेखील ज्या माझ्या झोपेमागे त्याचे इतके प्रयत्न कारणीभूत होते, तिच्यातून मला उठवण्याचा प्रयत्न त्याने केला नाही; पण चांगले दहा वाजून गेल्यानंतर जेव्हा मी पहिली हालचाल केली, तेव्हा त्याच्या पौरुषाचा आणखी एक प्रयोग मला सहन करावा लागला. अशा प्रकरणांबाबतींत तिचा जो अनुभव होता त्याला अनुसरून, तिने बनवलेल्या भरपूर पौष्टिक सुपाचे दोन वाडगे घेऊन अकरानंतर मिसेस जोन्स खोलीत आली. मुली पुरवणारी बाई सरावाने जे गोडगोड बोलेल, त्या साच्यातली जी अव्वाच्या सव्वा खुशामत आमच्यासमोर तिने केली, तिचा तपशील मी इथे देत बसत नाही; पण तिला पाहून जरी माझं पित्त खवळून उठलं असलं, तरीही माझ्या मनातले भाव वरकरणी दिसू न देता, हा जो नवा संबंध माझ्या आयुष्यात आलेला होता त्याचे पुढे काय परिणाम होतील यावर मी लक्षपूर्वक विचार करू लागले.

पण मिस्टर एच– ला माझ्या मनातली अस्वस्थता ओळखू आली होती, आणि तिच्या प्रभावाखाली त्याने मला फार वेळ राहू दिलं नाही. तो मला म्हणाला की मला तुझ्याबद्दल खरीखुरी आत्मीयता वाटू लागली आहे; आणि तिचा निर्वाळा देण्याकरिता, हे जे घर अनेक कारणांमुळे तुला त्रासाचं आणि दुःखाचं झालं असलं पाहिजे, त्यातून तुला बाहेर काढून मी दुसऱ्या एका आरामशीर घरात घेऊन जाईन आणि तिथे तुझी लागेल ती सगळी काळजी घेईन. आणि यानंतर, घरमालकिणीला काहीही सांगू नकोस व मी परत येईपर्यंत उतावळी होऊ नकोस, असं मला पढवून कपडे करून तो बाहेर गेला; जाताना मला म्हणाला की हा बावीस गिन्न्या असलेला कसा मी तुझ्याजवळ खर्चाला ठेवून जातो आहे, माझ्याजवळ आत्ता हे एवढेच पैसे आहेत.

तो निघून जाताच, वाममार्गाला लागण्याच्या पहिल्या खेपेनंतर मनात सहसा येणारे विचार माझ्याही मनात आले (कारण चार्ल्सबरोबरच्या माझ्या प्रेमसंबंधाकडे मी अशा दृष्टीने कधीच पाहिलं नव्हतं). किनाऱ्याकडे पुन्हा परत न येता मी ताबडतोब धारेबरोबर वाहवत गेले. माझा अगतिक गरजूपणा, माझी कृतज्ञता, आणि त्याहीपेक्षा, सरळच सांगायचं तर चार्ल्स मला सोडून गेल्यावेळेपासून मनावर जे खाऊन टाकणाऱ्या काळ्याकभिन्न विचारांचं मळभ आलं होतं त्यापासून मला दूर नेणाऱ्या ह्या नव्या संबंधातून आलेल्या मनोरंजनाच्या व छानछोकीच्या संधी, अशा सर्वच गोष्टी एकमेकींना सामिल झाल्यामुळे त्याच्या विरोधात जाणारे सारे विचारप्रवाह खुंटले. आता माझ्या पहिल्या व एकमेव

प्रियकराचा विचार जर कधी माझ्या मनात आलाच तर त्यामध्ये अत्यंत गहिऱ्या प्रेमभावनेचा हळुवारपणा व खेद मिसळलेला असे, आणि मी त्याला आता लायक राहिले नाही ह्या जाणीवेमुळे कटुता येऊन जाई. त्याच्याबरोबर राहून जगभर कुठेही अन्नाची भीक मागण्याची माझी तयारी होती, पण मी अशी करंटी होते की त्याच्यापासून दुरावताच आपलं जीवन संपुष्टात यावं इतकी निष्ठा, अथवा इतकी धमक, माझ्यात नव्हती.

आणि तरीही मी असं म्हणेन की जर माझं हृदय आधीच दुसऱ्या कुणात गुंतलं नसतं, तर कदाचित मिस्टर एच– हा त्याचा एकमेव स्वामी ठरू शकला असता; पण ती जागा भरलेली होती, आणि केवळ अनेक घटना जुळून आल्यामुळेच आता त्याचा माझ्या देहावर अधिकार जमलेला होता; या देहाची आकर्षणं हेच त्या माणसाचं एकमेव लक्ष्य व उद्दिष्ट होतं; आणि फारशा हळुवार किंवा टिकाऊ प्रेमाचा पाया म्हणून अर्थातच अशा परिस्थितीचा उपयोग होण्यासारखा नव्हता.

तो संध्याकाळी सहापर्यंत परतला नाही, पण एकदाचा तो मला माझ्या नव्या घरी घेऊन जाण्यासाठी येताच माझं सामानसुमान लवकरच पेटीबंद होऊन टांग्यात गेलं; माझ्या घरमालकिणीवर मी विशेष खूष नसण्याला माझ्या मते अनेक सबळ कारणं असल्यामुळे तिची रजा घेताना मला फारसं वाईट वाटलं नाही; आणि मी राहते काय किंवा जाते काय यामुळे, पैसे किती मिळतील ह्या मुद्द्यापलीकडे तिच्या बाजूने तिला कसलाच फरक पडत नव्हता. एक साधा कामगार व्याज थकल्यामुळे मिस्टर एच– च्या हाताखाली पुरता अडकला होता; त्याच्या घराचा पहिला मजला आठवड्याला दोन गिन्न्या या दराने माझ्यासाठी मुक्रर करण्यात आलेला होता, आणि त्या ठिकाणी आम्ही लवकरच येऊन पोहोचलो. आतमधलं फर्निचर उंची दर्जाचं होतं व एक नोकराणी माझ्या दिमतीला दिलेली होती; अशा रीतीने माझं बस्तान आता तिथे बसवण्यात आलं. त्या संध्याकाळी मिस्टर एच– माझ्या सोबतीला राहिला, आणि शेजारच्या एका खाणावळीतून आम्ही जेवण मागवलं; यानंतर खुशीचे एकदोन पेले रिचवून होताच नोकराणीने मला बिछाना घालून दिला. थोड्याच वेळात मिस्टर एच– आत आला, आणि काल रात्री दमछाक झालेली असूनही त्याच्याकडून मला काही उसंत वा सूट मिळाली नाही; गृहप्रवेश साजरा करण्याची आपली फार मनापासून इच्छा आहे, असं त्याचं म्हणणं पडलं.

सकाळ होऊन बराच वेळ गेल्यानंतर आम्ही न्याहारीला बसलो; तेव्हा आता सुरवातीचा गारठा पुष्कळसा निवळला असून माझ्या हृदयावरचा प्रेमाचा पगडा हळूहळू कमी होऊन त्याला मोकळं वाटू लागलं, आणि बायकांची नेहमीची जी एक फुलपाखरी वृत्ती असते तिची खुशामत करण्याकरिता मिस्टर एच– सढळ हाताने ज्या किरकोळ वस्तू आणून देई, त्यामुळे आता त्याचं रंजन होऊ लागलं. रेशमी कपडे,

लेसेस, कानांतल्या रिंगा, मोत्यांचे हार, सोन्याचं घड्याळ, असल्या अवांतर भेटवस्तूंचा व कपड्यांचा त्याने माझ्याभोवती भलाथोरला ढीग तयार केला; आणि त्याची प्रतिक्रिया म्हणून अगदी प्रेम जरी निर्माण झालं नसलं, तरीदेखील प्रेमाशी काहीसा मिळताजुळता असा एक प्रकारचा कृतज्ञ स्नेहभाव बळेच माझ्यात तयार झाला; अर्थात या दोहोंतल्या फरकाची चिकित्सा करण्यामुळे, ज्यांची ठेवलेली बाई आहे अशांपैकी लंडनमधल्या नऊ दशांश पुरुषांचा आनंद विरजून गेला असता, आणि त्यांतले फारच थोडे ती का करतात यामागे माझ्या मते हेच हुकमी कारण आहे.

आता अगदी कपड्यालत्त्यांचा झगमगाट करणारी, ऐटबाज घरात राहणारी, पैशाचा सुकाळ असलेली ठेवलेली बाई म्हणून माझी स्थापना झाली होती. मिस्टर एच– माझ्याशी नेहमीच कनवाळूपणे व गोडीगुलाबीने वागत राहिला; पण तरीही मी फारशी आनंदात नव्हते, कारण एकतर माझ्या प्रियकराबद्दल वाटणारी खंत जरी बहुतेक वेळा थोपवून धरलेली किंवा मनाआड केलेली असली तरीदेखील काही काळे क्षण असे असत की जेव्हा ती दुप्पट जोराने माझ्यावर चाल करून येई, आणि याखेरीज मला आता भोवताली आणखी जास्त माणसांचा गोतावळा हवा, आणखी जास्त थिल्लरपणा हवा, असा हव्यास वाटू लागला होता. सर्वच अर्थांनी मिस्टर एच– माझ्यापेक्षा इतका श्रेष्ठ होता की मला त्याच्याबद्दल जी कृतज्ञता वाटायला हवी, तिला यामुळे बाधा येत असे. त्याच्याविषयी जरी मला आदरभाव निर्माण झाला असला, तरीसुद्धा माझी अभिरुची तो सुधारू शकला नाही; दोघांत हितगुज करण्याचा तो एक विषय सोडला तर दुसरा कुठलाच माझ्या आवाक्यातला नव्हता, आणि अशा प्रकारे समाधानी असताना जे लांबलचक कालखंड मध्येमध्ये राहतात, ते जर प्रेमप्रकरणांनी अथवा इतर काही करमणुकीने भरून काढले नाहीत, तर फार कंटाळवाणे होतात.

आजपर्यंत अनेक स्त्रिया मिस्टर एच– ने हाताळलेल्या होत्या, तेव्हा या क्षेत्रातला त्याचा अधिकार व अनुभव दांडगा असल्यामुळे माझ्या मनातली अस्वस्थता त्याने लवकरच ओळखली ह्यात शंका नाही, आणि ती त्याला रास्त वाटली अथवा तीमुळे त्याला मी अधिक आवडू लागले असं जरी झालं नाही, तरीदेखील माझ्या मनाप्रमाणे करण्याइतका तो उदार होता. त्याच्याबरोबर चैनबाजी करण्यात सोबत असणाऱ्या अनेक दोस्तांना त्यांच्या रखेल्यांसह तो माझ्या घरी रात्री उशीरा जेवायला घेऊन येई; आणि अशा प्रकारे ज्या वर्गातल्या माणसांचं कोंडाळं माझ्याभोवती तयार झालं, त्याचा परिणाम असा झाला की माझ्या गावाकडच्या शिक्षणातला जो काही थोडाफार बुजरेपणा व लाजाळूपणा माझ्यात अजून टिकून होता, आणि खऱ्या रसिक माणसाला कदाचित जो माझ्या अंगचा सर्वाधिक लोभस गुण वाटला असता, तो लवकरच मला सोडून गेला.

रीतभात सांभाळून आम्ही एकमेकींना भेटायला जात असू, आणि घरंदाज बायका ज्या ज्या कटकटी, अविचारीपणा व आततायीपणा करण्यात आपला वेळ व्यर्थ दवडतात, त्या त्या सगळयाचं जमेल तितकं अनुकरण करीत असू; पण सर्वसाधारणपणे पाहिलं तर त्यांच्या आयुष्याची एकूण जी चाकोरी असते तिच्याइतकी खुळचट, निरस, भिकार व निकृष्ट अशी दुसरी कोणतीही चीज नाही, हे कधीच या बायकांच्या इवल्याशा मेंदूत शिरत नाही, आणि त्यांना ह्या खाईत ढकलणारे पुरुष हे खरोखर त्यांच्या डोक्यावरचे हुकुमशहा आहेत, हेही त्यांना कळत नाही!

आता अशा अनेक ठेवलेल्या बायका (आणि त्याशिवाय त्यांच्या उपयोगी पडणाऱ्या व त्यांच्याशी संधान राखून स्वत:ची गुजराण करणाऱ्या काही म्हाताऱ्या) माझ्या परिचयाच्या झाल्या होत्या, पण आपल्या मालकाचा कमालीचा तिरस्कार करीत नाही अशी त्यांतली जवळपास कुणीही मला माहित नव्हती; आणि उघडकीस येणार नाही अशा बेताने जमेल तितका चंगीभंगीपणा करण्यातही अर्थात त्यांपैकी कुणाला फारशी नैतिक अडचण वाटत नसे; पण तरीही माझ्या मालकाचा असा घात करण्याचा विचार अजूनतरी माझ्या मनात आला नव्हता. कारण एकतर मला तशी खुमखुमी यावी किंवा त्याच्यावर कुरघोडी करण्याची ईर्षा निर्माण व्हावी, अशी कोणतीच संशयीपणाची खूण त्याने दाखवलेली नव्हती; आणि त्याचं सततचं औदार्य, समंजसपणा व मला खूष ठेवण्यासाठी धडपड, यांमुळे माझ्या मनात त्याच्याविषयी जो आदर उत्पन्न झाला होता, त्याची परिणती म्हणून त्याच्यावर प्रेम जरी जडलं नसलं तरी निदान एकनिष्ठतेची भावना रुजली होती; पण इतकंच नव्हे, तर त्याच्याबद्दल मला जो सहजस्नेह वाटू लागला होता, त्यावर मात करील अशी कोणतीच निश्चित वस्तू अजून तरी समोर आलेली नव्हती. त्याने स्वेच्छेने दाखविलेल्या मनाच्या मोठेपणामुळे माझ्या निर्वाहासाठी लवकरच काही कायमस्वरूपी तजवीज केली जाईल अशी शक्यता जवळ येऊ लागली होती; मात्र याच वेळी एक अपघात असा झाला, की माझ्या हिताकरिता त्याने रचलेले सगळे बेत मोडून पडले.

आता मी मिस्टर एच– बरोबर राहायला लागून जवळजवळ सात महिने झाले होते. एके दिवशी मी आजूबाजूला फेरफटका मारून नेहमीपेक्षा काहीशी लवकर घरी परतू लागले होते, तेव्हा बाहेरचं दार उघडं असून इमारतीची देखभाल करणारी मोलकरीण तिथे उभी राहून ओळखीच्या कुणाशीतरी बोलत असलेली दिसली, त्यामुळे मी दार न ठोठावताच आत आले, तशी मी तिच्या बाजूने जाताना ती म्हणाली की मिस्टर एच– वर आहेत. मी जिना चढून माझ्या बेडरूममध्ये गेले तेव्हा माझ्या डोक्यात इतकाच विचार होता की हॅट वगैरे काढून ठेवून, अनेक घरांमध्ये असतं तसं माझ्या बेडरूममधून डायनिंग रूममध्ये जाणारं दार होतं तिकडून त्याला भेटायला जाऊन, काय हवं नको ते पाहावं. हॅटचे बंद सोडत असताना मला हॅनाचा– माझ्या नोकराणीचा– आवाज आणि मग काहीतरी धसपस ऐकू

आल्यासारखी वाटली, तशी माझी उत्सुकता चाळवली जाऊन मी हळूच दारापाशी आले. तिथे लाकडातली एक गाठ निसटून खाली आल्यामुळे, त्या छिद्रातून आत जो काही प्रसंग साजरा होत होता त्याचा फार व्यवस्थित देखावा पाहायला मिळत होता; आणि रंगमंचावरचे कलाकार आपल्या भूमिकांत इतके गुंग होते की जिन्यावरून येऊन मी माझ्या बेडरूमचं दार उघडल्याचं त्यांच्या लक्षात आलेलं नव्हतं.

माझ्यासमोर आलेलं पहिलंच दृश्य असं, की डायनिंग रूमच्या एका कोपऱ्यात ठेवलेल्या एका दिवाणाच्या दिशेने मिस्टर एच– त्या ओबडधोबड गावंढळ टवळीला ओढत, ढकलत घेऊन चालला असून त्याला ती कसातरी अवघडलेला लुटूपुटूचा विरोध करीत होती, आणि त्याचवेळी इतक्या जोराने किंचाळत होती की दाराशी उभी राहून ऐकणाऱ्या मला ते कसंबसं ऐकू येत होतं: "सर, मी पाया पडते तुमच्या... नका असं करू... मी तुम्हाला शोभेलशी नव्हे... माझ्या गरीबाच्या नादी लागून तुम्ही का स्वत:ला बट्टा लावून घेताय... साहेब! माझी मालकीण घरी आली तर... अहो, नका हो, मी ओरडेन..." असं असूनही तिच्या नकळत तिला दिवाणापर्यंत ओढून आणण्याला तिची विशेष हरकत असल्याचं दिसलं नाही, त्यानंतर फार जबरदस्त ताकद लावावी न लागता एक धक्का देताच ती अगदी अलगद खाली पडली; आणि मग जेव्हा माझ्या मालकाने तिच्या नीतिमत्तेच्या बालेकिल्ल्याला हात घातला, तेव्हा खचितच तिला असं वाटलं की यापुढे चर्चा करणं व्यर्थ असून, होईल ते निमूटपणे स्वीकारलं पाहिजे. त्याने आता तिच्या लालभडक झालेल्या तोंडावर तिचा पेटिकोट झाकून, तिच्या जाडजूड, गुबगुबीत, भक्कम आणि बऱ्यापैकी पांढऱ्याफटक अशा दोन मांड्या उघड्या पाडून स्वत:च्या कमरेभोवती लावल्या. आपलं बाहेर काढलेलं हत्यार चिरेत घुसवताना प्रवेश करायला अडचण येईल अशी त्याची बहुतेक स्वत:विषयी गोड कल्पना असणार, पण ह्या रांडेने भानगड करून पोर पैदा केल्यानंतर तिला तिचं गाव सोडून यावं लागलं होतं या पूर्वपीठिकेमुळे हा प्रवेश अपेक्षेपेक्षा सुलभ झाला; आणि आता एकूणच त्याच्या हालचालीवरून तो आत चांगलाच घुसून बसला आहे असं लक्षात येत होतं. त्याचं संपताच ही चटोर बाई उठून उभी राहिली, तिने पेटिकोट खाली टाकला, आणि स्वत:चा एप्रन व कमरेचं फडकं हाताने सारखं केलं. मिस्टर एच– अंमळ बावळट दिसू लागला, त्याने विशेष काही भाव चर्येवर न दाखवता थोडेफार पैसे काढून तिला दिले, आणि शहाण्यासारखी वाग, कुणाला काही बोलू नको असं तो म्हणाला.

मी जर ह्या माणसावर प्रेम करीत असते, तर हा सगळा देखावा शांतपणे बघत राहणं मला स्वभावत: जमलं नसतं: अशावेळी मग मी तडकाफडकी आत शिरून, डिवचल्या गेलेल्या राजकन्येची भूमिका फार जोशाने बजावली असती. पण बाब तशी नव्हती, कारण माझा अभिमान फक्त दुखावला गेला होता पण

हृदय नव्हे; तेव्हा हा माणूस कुठवर जातो ते मी मनात काहीही शंका बाकी न उरेपर्यंत पाहात राहावं असं धोरण स्वत:ला पटवून देणं मला सोपं गेलं.

ह्या संपूर्ण प्रकरणातला जो सर्वांत कमी सभ्य, असा भाग आता संपलेला असल्यामुळे मी माझ्या खोलीत परत गेले, आणि पुढे काय करावं याचा विचार करू लागले. तडकाफडकी आत जाऊन त्या दोघांची कानउघाडणी करावी, असा माझा पहिला बेत असणं साहजिक आहे: माझी तात्कालिक अस्वस्थता व तात्कालिक चिडचिड यांना गोंजारणारा हा मार्ग होता, कारण त्यांना यामुळे ताबडतोब वाट मिळाली असती; पण पुन्हा एकदा विचार केल्यानंतर, हा बेत पूर्तीस नेल्यास त्याचे परिणाम काय होतील हे तितकंसं स्पष्ट नसल्यामुळे, योग्य वेळ येईपर्यंत, म्हणजेच मिस्टर एच– ने जिचं माझ्यापाशी सूतोवाच केलेलं होतं ती पैशाची तरतूद पक्की होईपर्यंत, हा माझा शोध लपवून ठेवणंच जास्त श्रेयस्कर होईल असं मला वाटू लागलं; कारण ज्यावर पुरेसा ताबा ठेवणं मला जमलं नसतं अशा तऱ्हेच्या आततायी वागण्यामुळे ही तरतूद अधिक सुकर होण्याची काहीही शक्यता नसून उलट तिची वासलात लागण्याचाच धोका होता.

पण त्याबरोबर हेही खरंच, की ही चिथावणी इतकी ढळढळीत व राजरोस होती की सूड घेण्याचा विचारही माझ्या मनात येऊ नये हे शक्य नव्हतं; पण ही कल्पना मनाला नुसती शिवताच मात्र माझी मनस्थिती पूर्णपणे स्थिरावली, आणि ती प्रत्यक्षात कशी आणावी याविषयी माझ्या डोक्यात जो काही विस्कळीत बेत होता त्यावर जरी मी खूष झाले असले, तरीदेखील मला काही ठाऊक नसल्याचा बहाणा करण्याची जी ताकीद मी स्वत:ला दिली होती, ती पाळण्याइतका आत्मसंयम नक्कीच माझ्यापाशी होता. हे सारे विचार क्षणार्धात संपून जाताच मी पॅसेजमधल्या दारापाशी हलकेच चालत गेले, खडखड करीत ते उघडून आत्ताच घरी आले आहे असं भासवलं; आणि मग जणू काही अंगावरच्या बारीकसारीक वस्तू बेडरूममध्ये काढून ठेवायला म्हणून थोडा वेळ दवडल्यानंतर डायनिंग रूमचं दार उघडून आत आले, तेव्हा ही ढेमसा तिथे विस्तव फुंकीत होती, आणि माझा आनंदी गोपाळ खोलीत इकडेतिकडे फिरत, जणू काहीच झालेलं नाही आणि आपला कशाशीच काही संबंध नाही असं दाखवीत थंडपणे शीळ घालीत होता. पण त्याने माझ्यापेक्षा जास्त चांगलं सोंग वठवलं आहे अशी बढाई मारायला माझ्या मते त्याला विशेष वाव नव्हता: कारण आमच्या स्त्रीजातीची अभिनयकौशल्याबद्दल जी ख्याती आहे तिची पत राखून, मी त्याच्या जवळ जाऊन नेहमीइतक्याच मोकळेपणाने त्याला भेटले. तो आणखी थोडा वेळ रेंगाळला, आणि आपण संध्याकाळी का थांबू शकत नाही याबद्दल काही सबब सांगून बाहेर निघून गेला.

ही पोरटी आता निदान माझी नोकराणी म्हणून तरी नासलेली होती; आणि त्या प्रसंगानंतर दोनेक

दिवसच झाले असतील नसतील, तोच मिस्टर एच– आणि ती यांच्यामध्ये झालेल्या प्रकारावरून तिने काही उद्धटपणा केल्यामुळे तिला ताबडतोब हाकलून देण्याची मला इतकी नामी संधी मिळाली की ती मी घेतली नसती तरच नवल: आणि मग त्याला नाराजीही दाखवता आली नाही, किंवा यामागे माझा मूळ हेतू काय असेल याचाही काही सुगावा लागला नाही. त्यानंतर तिचं काय झालं हे मला ठाऊक नाही; पण मिस्टर एच– स्वभावाने उदार असल्यामुळे त्याने तिला भरपाई म्हणून काहीतरी दिलं हे नक्की: आणि तिच्याबरोबर त्याने पुढे तसलं काही संधान चालू ठेवलं नाही अशी मला खात्री आहे, कारण इतकी गावठी वस्तू वापरण्याइतकी त्याची पातळी खाली जावी, ह्यामागे फक्त गावाकडची धट्टीकट्टी, उफाड्याच्या छातीची पोरगी बघून अचानक दाटून आलेली वासना होती; आणि एखाद्याने भुकेजल्या पोटी किंवा आहारात बदल करण्याची लहर आली म्हणून मटणाचा राठ तुकडा जाणूनबुजून खाऊन टाकावा, यापलीकडे आश्चर्य वाटण्यासारखं त्यात काही नव्हतं.

मिस्टर एच– च्या ह्या आगळिकीकडे मी केवळ अशाच भावनेने पाहून या पोरीला हाकलून देण्यावरच समाधान मानणं, हाच विचार व हीच कृती रास्त ठरली असती; पण काल्पनिक अवमानांमुळे मी इतकी सणकले होते, की हा सूड असाच पुढे चालू ठेवून, शक्य होईल तितक्या प्रमाणात त्याच्याच नाण्यात त्याचं कर्ज जर चुकतं केलं नसतं, तर तो फार सहज सुटला असं मी समजले असते. ही स्तुत्य आणि न्याय्य कृती मला फार मनापासून करावीशी वाटत असल्यामुळे ती तडीस नेण्यास उशीर लागला नाही. पंधरवड्यापूर्वीच मिस्टर एच– ने त्याच्या एका कुळाचा पोरगा नोकरीवर घेतलेला होता; जेमतेम एकोणीस वर्षांचा, नुकताच गावाकडून आलेला, देखणा व तरणाबांड, गुलाबासारखा ताजातवाना, रूपाने मोठा नीटस व रुबाबदार, थोडक्यात म्हणजे सूडाचा काही मुद्दा उपस्थित नसला तरीदेखील कुणाही बाईने भाळायला हरकत नसावी असा तो होता; म्हणजे मला अभिप्रेत असलेला अर्थ असा की जिच्या मनात पूर्वग्रह नाही, आणि उगीच सामाजिक स्तरात तफावत असल्याचा बाऊ करून नाक मुरडून न बसता जिच्यात मजा घेण्याची चतुराई आणि धमक आहे, अशा कुणाही बाईने.

मिस्टर एच– ने त्याच्या अंगावर एक युनिफॉर्म अडकवला होता, आणि मी कुठे राहते हे एकदा त्याला दाखवून दिल्यानंतर, त्याचा मालक आणि मी यांच्यात पत्रांची व निरोपांची नेआण करणं हे त्याचं मुख्य काम होतं. ठेवलेल्या बायकांची एकूण परिस्थिती, अगदी खालच्या स्तरातल्या माणसांच्या मनांतही त्यांच्याविषयी आदर उत्पन्न होण्याकरिता विशेष अनुकूल नसल्यामुळे, आणि त्यांतही जे सर्वांत अडाणी, त्यांच्यापासून ही अपेक्षा अधिकच कमी असल्यामुळे, हा पोरगा (माझे व त्याच्या मालकाचे संबंध काय आहेत हे त्याला बाकीच्या नोकरांनी सांगितलं असावं) माझ्याकडे ज्या गोंधळलेल्या लाजाळू दृष्टीने पाहात राही, ती माझ्या लक्षात आल्यावाचून आली नाही; पण वास्तविक गोष्ट अशी की उघड

बोलून दाखवण्यापेक्षाही ह्या अशा दृष्टीमध्ये अधिक भाव लपलेला असतो, ती मर्मी लागते, आणि स्त्रीला ती फार पटकन लक्षात येते. माझं रूप त्याच्या मनात भरल्याचं मला दिसलं, आणि माझ्याकडे पाहात असताना त्याला जे सुख होत होतं ते प्रेम आहे की कामेच्छा, हे त्याला स्वत:ला ठाऊक नसावं इतका तो लाजाळू व निरागस होता; पण त्याचे जात्याच उच्छृंखल असलेले आणि आता अभिलाषेने प्रज्वलित झालेले डोळे, तो कल्पनाही करू धजला नसेल त्यापेक्षा पुष्कळ काही जास्त बोलून गेले. आत्तापर्यंत अर्थात हा युवक किती गोड आहे याची मी दखल जरूर घेतली होती, पण त्यामागे योजना काहीही नव्हती: आणि जर मिस्टर एच– ने माझ्या नोकराणीच्या पायरीवर उतरून मला फार प्रक्षोभक दाखला घालून दिला नसता (तेही रूपाचं आकर्षण त्याच्या निम्मंदेखील नसताना), तर केवळ माझ्यातला ताठा मला तशा कृतीपासून परावृत्त करायला पुरेसा ठरला असता; पण आता मात्र मिस्टर एच– विरुद्ध केलेला सूडाचा जो बेत अपुरा राहिल्यास मला मरेपर्यंत खंत वाटत राहिली असती, तो शेवटाला नेण्याचं एक लोभस साधन म्हणून मी या कोवळ्या पिल्लाकडे पाहू लागले.

आणि मग, माझी योजना अंमलात आणण्याच्या दृष्टीने, जेव्हा दोनतीन वेळा हा तरुण मुलगा निरोप देण्यासाठी घरी आला, तेव्हा त्याला आत घेतल्यानंतर, मुद्दाम करते आहे असं वाटू न देता तो माझ्या बिछान्यापाशी येईल किंवा माझा नट्टापट्टा चालू असताना तिथे आरशापाशी येईल अशी मी तजवीज करविली; आणि काहीवेळा असायला हवेत त्यापेक्षा जास्त अनावृत्त राहिलेले माझे वक्ष, डोक्यावरचे अतिशय सुंदर भरघोस केस विंचरत असतानाचा त्यांचा नैसर्गिक ओघळता संभार, चुकून गार्टर सुटल्यामुळे उघडा पडलेला छानदार पाय (मग हा गार्टर त्याच्यासमोरच कसा बांधायचा अशी शंका मी काढली नाही), इत्यादि गोष्टी नकळत व निर्हेतुक असल्याच्या मिषाने त्याला दाखवून अथवा बघू देऊन, माझ्या गर्भित हेतूकरिता ज्यांची मदत होईल अशा प्रतिमा मी त्याच्या मनात सहजीच निर्माण केल्या; परिणामी त्याचे डोळे चमकलेले व गालांवर लालिमा चढलेला माझ्या लक्षात आला: आणि मग त्याच्या हातून पत्रं घेताना मधूनमधून त्याचे हात किंचितसे दाबल्यानंतर मात्र तो पुरताच नेस्तनाबूत झाला.

अशा प्रकारे माझ्या मनातील उद्दिष्टाकरिता त्याला चाळवून तयार केल्यानंतर, 'तुझी कुणी मैत्रिण आहे का? ती दिसायला माझ्यापेक्षा छान आहे का? माझ्यासारख्या कुणावर प्रेम करायला तुला आवडेल का?' अशासारखे अनेक सहेतुक प्रश्न विचारून मी त्याचा अधिरेपणा अधिकच वाढवला, आणि त्यांना ह्या साध्याभोळ्या लाजाळू माणसाने, अगदी माझ्या मनासारखी निरागस व निष्पाप, पण ज्यांच्या अवघडलेपणात व भोळेपणात त्याचं गावाकडचं वळण अगदी पुरेपूर दिसून यावं, अशी उत्तरं दिली. माझ्या अंतरीच्या प्रशंसनीय ध्येयाकरिता आता तो अगदी व्यवस्थित पिकून तयार झाला आहे असं मला वाटताच, एके दिवशी तो ठराविक वेळेला अपेक्षित आहे असं पाहून, त्याचं जशा प्रकारचं स्वागत

करण्याचं माझ्या मनात होतं त्यात काही अडथळे येणार नाहीत अशी दक्षता मी घेतली; आणि जुळवून आणलेल्या बेताप्रमाणे, त्याने डायनिंग रूमच्या दारावर टकटक केल्यानंतर त्याला आत यायला सांगताच त्याप्रमाणे करून त्याने मागाहून दार बंद करून घेतलं. मग मी त्याला आतून खिटी लावून घे, नाहीतर ते बंद राहणार नाही, अशी थाप मारून ती त्याच्याकडून लाववून घेतली.

मिस्टर एच– चा छुपा आनंदसोहळा जिथे साजरा झाला होता त्याच दिवाणावर मी लांब पहुडले होते, काळजीपूर्वक जमवून आणलेल्या निष्काळजीपणाने माझे तोटके कपडे अतिशय मादक अस्ताव्यस्त सैलावून पसरले होते: बॉडीस, हूप्स असले काही कुठे अडथळे त्यांत नव्हते. याउलट थोड्याशा अंतरावर उभा असलेला हा बांधेसूद, रुबाबदार, धट्टाकट्टा, तारुण्यातल्या गोड तजेल्याने मुसमुसलेला गावाकडचा पोरगा मला अगदी समोरासमोरी पाहायला मिळत होता; त्याच्या चमकणाऱ्या काळ्या कुळकुळीत केसांच्या बटा चेहऱ्याभोवती खेळत होत्या, आणि मागे त्यांचा डौलदार तुरा काढलेला होता; हरणाच्या कातड्याची नवी पाटलोण अंगाला लगटून राहिल्यामुळे त्याच्या पुष्ट कोरीव मांड्यांचा आकार त्यांतून उमटून दिसत होता; त्याचे पांढरे पायमोजे, लेस असलेला युनिफॉर्म, खांद्यावरची फीत, ह्या सगळ्याचा एकत्रित परिणाम म्हणून, अशा काहीशा सामाजिकदृष्ट्या निम्नस्तरातल्या पोषाखामुळे त्याच्या अंगभूत देखणेपणाला बट्टा न लागता उलट एक प्रकारचा नटवा नीटसपणा त्याला विशेष खुलून दिसत होता.

जे काही पत्र आणलं आहेस ते इथे येऊन मला दे, असं मी त्याला म्हणाले, आणि त्याचवेळी माझ्या हातातलं पुस्तक अनवधानाने खाली पडू दिलं. त्याचे गाल लाल झाले, पत्र देण्याइतका तो माझ्याजवळ आला, आणि ते मी घ्यावं म्हणून त्याने कसंबसं अवघडून हातात धरलं; तशी त्याची नजर मात्र माझ्या मानेभोवतीचा रुमाल मुद्दाम विस्कटवला गेल्यामुळे पुरेशा अनावृत्त झालेल्या, आणि लपण्याऐवजी नुसत्या काहीशा झाकोळल्या गेलेल्या वक्षांवरच खिळून राहिली होती.

त्याच्या चेहऱ्याकडे पाहून हसत मी पत्र घेतलं, आणि लगेच त्याच्या शर्टाची बाही हलकेच धरून त्याला माझ्याकडे ओढलं, तसा तो लाजला होता व जवळजवळ थरथरतच होता; पण त्याच्या अंगी बुजरेपणा फार असल्यामुळे व पूर्वानुभव बिलकुल नसल्यामुळे, त्याला उत्तेजन देण्याकरिता निदान सुरवातीच्या चाली करण्यात मी पुढाकार घ्यावा हे रास्तच होतं: आता त्याचं शरीर माझ्याकडे सोयिस्करपणे झुकलेलं असताना, अजून दाढीचे खुंट न फुटलेल्या त्याच्या हनुवटीला किंचित गोंजारून मी विचारलं की तुला बाईमाणसाची भीती वाटते का?... आणि तसाच त्याचा हात माझ्या हातात घेऊन मी तो हळुवारपणे माझ्या स्तनांवर दाबून धरला. आता त्यांना छान डौल आलेला होता, आणि ते चांगलेच भरलेले होते; तेव्हा त्याच्या स्पर्शाखाली ते अभिलाषेने धापा टाकीत पटपट वरखाली होऊ लागताच, चाळवल्या

गेलेल्या त्या तरुणाचे डोळे कामेच्छेने पेटून उठले आणि गाल दाट लालसर झाले: सुखवेदना, बेभान करणारा उन्माद आणि लज्जा यांच्या एकत्रित परिणामाने त्याची वाचा बंद झाल्यामुळे तो काही बोलला मात्र नाही, पण त्याच्या दृष्टिक्षेपांतून व भावमुद्रांतून माझी पक्की खात्री पटली की बाण लागलेला आहे, आणि निराशा होण्याची भीती नाही.

चुंबन घेणं टाळता येऊ नये अशा पवित्र्यात मी त्याच्यासमोर धरलेल्या माझ्या ओठांच्या तावडीत सापडताच त्याचा रक्तप्रवाह उष्ण होऊ लागून त्याच्यात धिटाई आली: आणि यापुढे सुखक्रीडेसाठी फार आवश्यक असणारी वस्तू ज्या ठिकाणच्या पेहरावात दडलेली होती, त्या दिशेला मी दृष्टिक्षेप टाकताच तिथला फुगवटा व हल्लकल्लोळ माझ्या सहज लक्षात येऊन चुकला; इतक्या छान वाटचालीत असताना मध्येच थांबणं अशक्य व्हावं इतकी मी पुढे आलेली असून आता अगदी राहवत नसल्यामुळे, आणि मला जो त्याचा पहिल्या खेपेचा अवघडलेपणा वाटत होता (आणि खरंच तसा तो होता), त्याची फार हळूहळू होणारी प्रगती पाहत राहण्याइतका धीरही नसल्यामुळे, मी माझा हात हलकेच त्याच्या मांड्यांवरून फिरवला; तशी त्यांच्यापैकी एकीखाली, त्याच्या पाटलोणीत बंदिस्त झालेली जी एक कडक ताठर वस्तू माझ्या स्पर्शाला जाणवली, ती नेमकी कुठे संपते याचा बोटांना काही थांग लागेना. माझी उत्सुकता जागी झाली, आणि हे खळबळजनक रहस्य उघडकीस आणण्यासाठी आतुर होऊन, आतून ढकलणाऱ्या दाबामुळे ताणून तुटू पाहणाऱ्या त्याच्या बटणांशी मी चाळा करू लागताच, त्याच्या कमरेची व पुढच्या पट्टीची बटणं स्पर्शानिशी तटकन निघून येऊन ते बाहेर आलं: आणि सदऱ्यामधून विलग होताच मी तोंडात बोट घालून पाहते तो काय?! हे काही कुणा पोराचं खेळणं नव्हतं की बाप्याचं हत्यार नव्हतं, तर तो असा एक महाप्रचंड मल्लखांब होता की बाकी शरीर जर त्याच प्रमाणात असतं, तर एखाद्या तरण्याबांड दैत्याच्या अंगावर असता. त्याच्या अकटोविकट आकारामुळे मी पुन्हा काहीशी बिचकले; पण तो रुंद, लांबलचक असा जिवंत हस्तिदंत पाहिल्यानंतर आणि हळूच त्याला हातसुद्धा लावल्यानंतर, मला गंमत वाटायची ती कशी राहील?

नमुना कमालीचा बांधेसूद व कोरीव होता; बाणेदार ताठ्यामुळे त्यावरची त्वचा ताणली गेलेली होती, आणि तिची गुळगुळीत तकाकी व मखमली मृदुता एखाद्या अतिशय नखरेल मुलीच्या त्वचेशी स्पर्धा करेलशी होती. मुळाभोवती उगवलेल्या काळ्याकभिन्न कुरळ्या केसांमुळे त्याच्या धवल शुभ्रतेला विशेष उठाव आला होता; आणि दूरच्या डोंगरशिखरावरील झाडांच्या फांदोट्यांतून रम्य संध्याकाळचा स्वच्छ प्रकाश झिरपताना दिसावा, तशी ह्या केसांच्या कोवळ्या अंकुरांमधून मागची गोरीपान त्वचा दिसून येत होती. निळसर छटा असलेलं त्याचं रुंद डोकं व त्यावरच्या नागमोडी नीला, यांमुळे निसर्गसृष्टीत क्वचितच आढळेल असा रूपविशेष व रंगसंगती यांचा विलक्षण समसमासंयोग झालेला होता; सारांश

असा की पाहताक्षणीच मोह पडावा व धडकीही भरावी अशीच ती वस्तू होती. पण याहीपेक्षा आश्चर्याची गोष्ट म्हणजे, जोपर्यंत तो घरच्या कडक वातावरणात लहानाचा मोठा होत होता तोपर्यंत तसा प्रसंग येणं शक्य नसल्यामुळे, आणि आता लंडनमध्ये येऊन जे मोजकेच दिवस झालेले होते त्यांत अजून तशी संधी न आल्यामुळे, हा अजब प्रकार ज्याच्या मालकीचा होता त्याला त्या पौरुषाच्या सज्जड ठेव्याचा उपयोग कसा करतात याबद्दल व्यावहारिक माहिती काहीच नव्हती; आणि माझ्यातल्या नाजुक प्रदेशाच्या मानाने अतोनात मोठ्या असलेल्या ह्या जगड्व्याळ शस्त्राकडून कदाचित तो उद्ध्वस्त होऊ शकेल असा धोका पत्करण्याइतकं जर मी मन खंबीर करू शकले, तर त्याचा पहिला प्रयोग अंगावर घेण्याची पाळी आता माझ्यावर आलेली होती.

पण आता विचार करीत बसायला उशीर झालेला होता; कारण ही वेळ येईपर्यंत, पुढ्यातली सामग्री पाहिल्याने ह्या तरुणाच्या संवेदना कमालीच्या तापून जाऊन, आत्तापर्यंत ज्या पापभीरूपणामुळे व मानसिक दडपणामुळे त्याच्या हालचालींवर लगाम बसला होता त्यांच्या ताब्यात याउपर राहणं शक्य होऊ नये इतकी त्याची उत्तेजना बळावली होती; तेव्हा त्यांच्याहीपेक्षा शक्तिशाली अशा केवळ निसर्गप्रणित उर्मींच्या प्रभावाखाली व निसर्गाच्याच मार्गदर्शनाला अनुसरून, अनावर अभिलाषेने थरथरत असताना त्याने माझ्या पेटिकोटाखाली हात सरकवला; आणि त्याला जरब बसवून त्याच्या आशांना सुरुंग लावतील असे काही विखारी कटाक्ष माझ्या समजुतीप्रमाणे त्याला माझ्या डोळयांत न दिसल्यामुळे, त्याची तप्तवेदना ज्या केंद्रस्थानाकडे आकर्षित होऊ लागली होती ते त्याने चाचपडलं आणि हळुवार हातात तो भाग पकडला.

अगं आई ग! त्याच्या बोटांचा धगधगता स्पर्श होताच माझ्या मनाचा हिय्या झाला, असह्य होणाऱ्या त्या आगीच्या डोंबात माझा सारा घाबरेपणा वितळून जाऊन मांड्या आपोआप उघडल्या, आणि त्याच्या हाताला तिथे आता पुरती मोकळीक मिळाली: मग एका झटक्यासरशी माझा पेटिकोट वर उडताच, आता रस्ता चुकणंच शक्य नाही इतका ढळढळीत खुला झाला. तो आता माझ्या वर होता: त्याचे प्रयत्न शक्य तितके सुकर व्हावेत अशा हेतूने मोकळे पाय फाकलेल्या अवस्थेत मी त्याच्या खाली गेलेले होते; मात्र हे प्रयत्न काहीसे अवघडूनच चालले होते, कारण त्याच्या अवजाराला आत येण्यासाठी दार मिळत नसल्यामुळे ते एकदा लक्ष्याच्या वर, एकदा खाली, एकदा बाजूला अशा रीतीने इकडेतिकडे टणकपणे टोचून ढुशा देत होतं: तेव्हा त्याच्या हैराण करणाऱ्या स्पर्शांनी माझी सहनशक्ती संपून जाऊ लागताच, ह्या चळवळत्या रुळाला हळू हाताने वळवून मी अशा ठिकाणी घेऊन गेले की जिथे ह्या कोवळया शिष्याला प्रेमाचा पहिला धडा शिकवला जाणार होता. अशा रीतीने त्याने त्या उबदार पण चिंचोळया छिद्रात थोडासा चंचुप्रवेश केला; पण कुठेही धडक मारून घुसणं शक्तीबाहेर नसावं अशी त्याची घडण

होती, आणि माझ्यात जरी अनेकदा शिरकाव झालेला असला तरीसुद्धा त्याला सहज आत घेईल इतकं ते रुंद मुळीच नव्हतं.

पण मी हस्तक्षेप केल्यामुळे ह्या अवजड यंत्राचं टोक इतक्या नेमक्या दिशेला रोखलं गेलेलं होतं, की त्या नाजुक प्रवेशद्वारापाशी तो हजर असल्याची मला जाणीव होताच, माझं नेमकं पुढे सरकणं व त्याचवेळी त्याने दिलेली ढुशी यांचा योगायोग होऊन तिथल्या जबरदस्त ताणलेल्या ओठांनी माझ्याकडून साहाय्य लाभलेल्या त्याच्या घुसखोरीला रस्ता खुला करून दिला, आणि तो आत शिरला असल्याची जाणीव आम्हा दोघांनाही झाली. मग आपला हेतू पुढे दामटवीत नेत, जोरकस व मला भयंकर दुखावणाऱ्या टोकेरी ढुशा देत देत तो इतपत आत घुसून बसला की तिथून सहजासहजी बाहेर गेला नसता: आणि आता जेव्हा तो तिथे अडकला, तेव्हा सुख आणि वेदना यांचं मला जाणवून गेलेलं मिश्रण शब्दात पकडणं शक्य नाही. तो मला आणखी पुढे चिरत नेईल किंवा बाहेर तरी काढेल, या दोन्ही गोष्टी मला तितक्याच नकोशा होत्या; तो मला सांभाळताही येईना पण जावासाही वाटेना. पण तरीदेखील, आतमध्ये घुसण्याकरिता चेकाळून जाऊन त्याने एकापाठोपाठ एक वेगाने मारलेल्या ढुशांमधून त्याच्या महाप्रचंड आकाराचा व टणकपणाचा माझ्यावर प्रयोग होत राहिल्याने शेवटी वेदनेची सरशी झाली, आणि "आई ग! दुखतंय!" अशी मी हळूच विव्हळले. ह्या गरीब स्वभावाच्या आदबशीर पोराची वाटचाल रोखून धरण्याकरिता इतकं पुरेसं होतं, आणि माझ्या तक्रारीचं गोड कारण जेव्हा त्याने ताबडतोब बाहेर काढलं, तेव्हा मला दुखावल्याबद्दलची दिलगिरी व ज्या ठिकाणच्या उबदार जवळिकीमुळे त्याला मिळालेली सुखाची थोडीशी चव आता पुरती घेण्यासाठी तो हपापला होता तिथून बाहेर पडल्याबद्दलची नाराजी, ह्या दोन्हींही भावना त्याच्या डोळयांमध्ये एकाचवेळी फार गहिरेपणाने दिसून येत होत्या; पण मला दुखावल्यामुळे मी त्याच्या सुखापासून त्याला वंचित ठेवेन, अशी भीती न वाटण्याइतका तो अजून सरावलेला नव्हता.

परंतु माझ्या करुण विनवण्या त्याने इतक्या मनावर घ्याव्या हे मला फारसं आवडलेलं नव्हतं; आणि रागाने ताठर होऊन, शिरस्त्राण उतरवून ठेवून, जांभळ्या रंगाचं भारदस्त डोकं दिमाखाने दाखवीत उभ्या असलेल्या त्या वस्तूकडे पाहून जेव्हा मी अधिकाधिक उतावळी होत गेले, तेव्हा ह्या पोराची हिंमत वाढवण्याकरिता म्हणून त्याला दिलेल्या चुंबनाची त्याने ज्या लगबगीने परतफेड केली, तिच्यातून माझ्याविषयी कृतज्ञता व्यक्त होण्याबरोबरच हे प्रकरण पुढे चालू ठेवण्यासाठी मला लाच चारण्याचा त्याचा हेतू उघड झाला. यापुढे वाटेल ते होवो, अशा वृत्तीने पुन्हा त्याचा हल्ला अंगावर घेण्याच्या पवित्र्यात मी लगेचच खाली पहुडले, आणि त्यानेही तो पुकारण्यात मुळीच दिरंगाई केली नाही: कारण तो नव्याने स्वार झाला असून, तोच गुळगुळीत टणक स्नायू पुन्हा एकदा बळजोरीने आत प्रवेश करीत

असल्याची भावना  मला झाली, मात्र ह्या प्रवेशाला त्याला आता पूर्वीइतकी अडचण आली नाही. पूर्णपणे आत येण्यासाठी तो जे प्रयत्न करीत होता, ते हळूहळू आणि अंशाअंशाने करण्याचा समंजसपणा त्याने दाखवल्यामुळे, मला दुखत असूनही, तक्रार न करण्याइतपत अवधान  मी सांभाळलं. ह्या कालावधीत तो मऊ चिंचोळा बोगदा हळूहळू सैलावला, आणि आत शिरलेल्या कडक, जाडजूड अवजारामुळे त्याच्या कमाल मर्यादेपर्यंत ताणला जाऊन तिथल्या संवेदनांमुळे होणारा पराकोटीचा आनंद व प्रसरण होत असल्याच्या वेदना एकाच वेळी मला जाणवत असताना, त्याने त्याला जवळजवळ अर्ध्यापर्यंत वाट काढून दिली; आणि आता मात्र आणखी शिरकाव करण्यासाठी त्याने जी काही जोरकस झटापट केली,  त्यामुळे त्याची तसूभरही प्रगती झाली नाही: कारण तो तिथे घोटाळला असतानाच सुखाच्या अंतिम क्षणाने त्याला गाठलं, आणि बाजूच्या उबदार घड्यांनी घट्ट बिलगून धरल्यामुळे परमोन्मादाचा झरा त्याच्यातून बाहेर पडला;  पण अजून निम्म्याशिम्म्यासुद्धा आत न गेलेल्या त्याच्या असह्य आकाराच्या हत्याराकरवी ह्या द्वंद्वात मला सोसाव्या लागलेल्या वेदनांमुळे,  माझा मात्र अजून त्याला भेटण्यासाठी तयारीत नव्हता.

आता तो बाहेर येईल अशी माझी अपेक्षा असली तरी इच्छा नव्हती, पण इतक्या सहजासहजी जाऊ देणाऱ्यांतला तो नसल्यामुळे माझा सुखद अपेक्षाभंग झाला. अंगात रग भरलेला, कामरसाने सळसळणारा, श्वासांना गोड वास येणारा हा तरुण, इथे सद्दी कुणाची चालते हे मला दाखवून देण्यासाठी सज्ज झाला होता. ज्या सुखातिरेकाच्या गुंगीत तो हरपला होता (आणि जिच्यामध्ये काही काळ त्याची प्रत्येक संज्ञा हरवून जाऊन,  डोळे मिटलेल्या अवस्थेत, वेगाने होणाऱ्या धपधप श्वासांनी त्याने आपला पहिला नजराणा सादर केला होता) तिच्यातून जागा होताच, आपली पहाऱ्याची जागा न सोडता, अजून तृप्ती झालेली नसून ह्या नव्या आनंदाची मजा चाखीत आहोत अशा अवस्थेत त्याने थोडासा विराम घेतला; आणि त्याचा जो ताठरपणा फारसा कमी झालेला नव्हताच तो पुन्हा शंभर हिस्से पूर्ववत होताच, म्यानातून हत्यार एकदाही बाहेर न काढता पुन्हा नव्याने खोदाखोदीला सुरुवात करून माझ्यातून एक अख्खा रस्ता काढण्याच्या मोहिमेला तो लागला, आणि नुकतीच माझ्यात आरोग्यवर्धक पिचकारी सोडून आतल्या सगळ्या भिंती त्याने भरपूर ओल्या केलेल्या असल्यामुळे ही मोहिम अधिक सुकर झाली. त्याने दुप्पट जोमाने मारत राहिलेल्या ढुशांना माझ्या हावऱ्या हालचालींची साथ मिळताच तुरुंगाची तेल घातलेली मऊमऊ दारं इतक्या कसबी कुलूपबंदासमोर टिकाव धरेनाशी होऊन आपसूक उघडली, आणि त्याचा मार्ग मोकळा झाला. आता त्याला सामील असलेली निसर्गशक्ती व मदतीला आलेले माझे काबाडकष्ट, यांच्या सामूहिक बळाने भोक पाडून घुसून, मजल दरमजल करीत इंचाइंचाने जमीन काबीज करीत तो पूर्ण आत आला, आणि शेवटी एक जबरदस्त मुसंडी मारून त्याने मुठीपर्यंत तलवार आत रुतवली. दोन्ही बाजूंचे केसदेखील एकमेकांत पुरते गुंतून जाऊन त्यांची एकत्र वेटोळी

व्हावीत इतकी आमची शरीरे चिकटून येताच, ह्या भान हरपलेल्या तरुणाचे डोळे हर्षोन्मादाने लकलकू लागले, आणि आनंदाची परिसीमा झाल्याची जी पावती त्याच्या साऱ्या हालचालींतून व दृष्टिक्षेपांतून मिळू लागली, त्या भावनेत मीही सहानुभूत होऊन गेले. मला तो आता शरीरात खूप खोलवर जाणवत होता, आणि सुखधारणा माझ्या अंगात मावेनाशा झाल्या होत्या.

ह्या वस्तूने आत मांडलेल्या प्रक्षोभक खळबळीमुळे मी अनावरपणे उफाळून उठले होते, आणि माझा तोबरा ठासून ओतप्रोत भरून गेला होता. अशीच मी त्याच्याखाली कशीबशी श्वास घेत, धापा टाकीत पडून राहिले असतानाच, त्याचे अडखळणारे श्वास, अस्पष्ट उद्गार, डोळयांत फुललेला ओलसर विस्तव, ढुशांतला बळावलेला जोर, आणि वाढलेला ताठरपणा या साऱ्यांमुळे दुसरा टप्पा जवळ आला असल्याची वर्दी मिळाली: तो आला, आणि सुखातिरेकाने पुरता चारीमुंड्या चीत झालेला हा गोंडस तरुण, माझ्या शरीरातल्या साऱ्या कोपऱ्याकंगोऱ्यांमध्ये उष्ण कामरसाच्या चिळकांड्या सोडणाऱ्या महापुरात विरघळून जाऊन माझ्या बाहुपाशात जेव्हा निचेष्ट पडून राहिला, तेव्हा त्या शरीरातला प्रत्येक कालवा या आनंदात पूर्ण सहभागी होऊन त्या प्रवाहाला सामोरा जाण्याकरिता ओसंडून भरून वाहत होता. भान हरवलेल्या अवस्थेत काही काळ पडून राहिलेलो असताना, ज्या ठिकाणी आयुष्यातला व संवेदनाविश्वातला आमच्या वाट्याचा सारा आनंद गोळा झालेला होता, ते निसर्गदेवतेचे शरीरातले लाडके अवयव वगळता आम्हाला बाकी कोणत्याही जागची शुद्ध राहिलेली नव्हती.

दोघांनाही एकमेकांमुळे लागलेली तंद्री जेव्हा काहीशी ओसरली, आणि ज्या खुमासदार लवचिक कांबीने सूडाचे सारे विचार प्रत्यक्ष सुखसंवेदनेमध्ये अगदी पुरते बुडवून टाकले होते ती त्याने बाहेर काढली, तेव्हा त्या रुंदावलेल्या, दुखावलेल्या बोगद्यातून मोत्याच्या रंगाच्या दाटसर द्रवाचा जो प्रवाह बाहेर पडून खाली माझ्या मांड्यापर्यंत पसरला, त्यामध्ये त्याच्या राक्षसी यंत्राने घातलेल्या थैमानाच्या खुणा म्हणून रक्ताचे ओघळ दिसत होते; जणू काही एक प्रकारचा आतला दुसरा बुरूज आता त्याने ढासळवला होता. तो सारवासारव करून बटणे पुन्हा लावीत असताना मी माझा हातरुमाल हळूच तिथे नेऊन तिथला भाग शक्य तितका पुसून घेऊन कोरडा केला.

आता मी त्याला माझ्याजवळ बसवला, आणि माझ्याशी इतका विशेष निकटचा संबंध आल्याकारणाने त्याचा धीर चेपला असल्यामुळे, सुखाचे जे नवे देखावे मी त्याच्यासमोर खुले केले होते त्यांबद्दलच्या हळव्या कृतज्ञतेचे व आनंदाचे जे सहजोद्गार त्याच्याकडून निसटले, ते ऐकून मला जेवणानंतरचा एक गोड घास मिळाला. हे देखावे त्याला पूर्णपणे नवे होते, कारण स्त्रीदेहाच्या रहस्याचा इतका खोलवर भेद करू शकण्याची आणि त्याचं चीज करण्याची त्याची अंगभूत पात्रता कुणालाही पुरून उरणारी असली,

तरीदेखील त्या देहाचं जे वैशिष्ट्य, ते मधोमध चीर असलेलं रहस्यमय चिह्न त्याने यापूर्वी ओझरतंदेखील पाहिलेलं नव्हतं. पण कल्पनाशक्ती ज्यांच्याभोवती खेचली जाऊन अधिरेपणाने घोटाळत राहते, ते शरीराचे भाग न्याहाळण्याची व हाताळण्याची अगदी साहजिक अशी उत्सुकता शमवण्यासाठी तो धडपडतो आहे, असं त्याच्या इतस्तत: (पण निरुद्देश म्हणता येणार नाहीत अशा प्रकारे) चाचपडणाऱ्या हातांच्या अस्वस्थ हालचालींवरून जेव्हा माझ्या ध्यानात आलं, तेव्हा ह्या बछड्याच्या मनात अंकुरणाऱ्या कामनांना गोंजारून त्यांचं शमन करण्याची प्रत्येक संधी मला घ्यावीशीच वाटण्यासारखी असल्यामुळे, कोणताही अटकाव न करता त्याच्या मनाला येईल ते मी त्याला करू देण्याचं ठरवलं.

त्याच्या सर्व इच्छांना मी दिलेली पूर्ण संमती त्याने जेव्हा माझ्या डोळ्यांत सहजच वाचली, आणि मग माझ्या पेटिकोट व सदऱ्याखाली हळूच हात सरकवून त्यांना चोरटेपणाने वर ढकलून दृष्टीसमोर आलेले अडथळे दूर केले, तेव्हा ह्या कृतीमुळे त्याला माझ्यापेक्षा जास्त सुख झालं असं नव्हे; पण हे सारं चालू असतानाच, कदाचित आपण जे करीत आहोत त्यापासून माझं लक्ष विचलित करण्यासाठी ती गरजेची आहेत अशी त्याची समजूत झाल्यामुळे त्याने माझी सहस्रश: चुंबने घेतली. माझे सगळे कपडे आता वर माझ्या कमरेपर्यंत गुंडाळले गेलेल्या अवस्थेत मी अशा पवित्र्यात दिवाणावर पहुडले, की जेणेकरून आनंदाचं निधान असणारा संपूर्ण प्रदेश व त्याभोवतालचा लगडलेला सृष्टिभाग त्याच्या डोळयांसमोर खुला व्हावा. भान हरपलेल्या त्या तरुणाने हे सारं काही आपल्या नजरेने पिऊन टाकलं, आणि त्या खोलपर्यंत गेलेल्या अधिऱ्या व अंधाऱ्या विवरामधली गुपितं आपल्या बोटांनी आणखी थोडी प्रकाशात आणण्याचा प्रयत्न केला: कोणत्याही कठीण वस्तूला आपल्या मऊपणाने आत सामावून घेणारे दुमडलेले ओठ त्याने उघडले, तसे ते त्याच्या बोटांभोवती वेढले जाऊन आतला देखावा दृष्टीआड गेला; आणि पुढे आणखी काहीशा आतमध्ये स्पर्श करताच त्याला एक मऊसर मांसल उंचवटा लागून तो अचंबित झाला. नुकत्याच घेतलेल्या सुखोपभोगामुळे सैलावून लवचीक झालेला तो भाग त्याच्या उष्ण बोटांच्या शोधक स्पर्शाखाली जसजसा अधिकाधिक दाट होऊन फुगू लागला, तसा तिथल्या रवरवणाऱ्या संवेदनांमुळे मी सुस्कारा सोडताच, मी दुखावले गेले असं वाटून त्याने आपली उत्सुक चिकित्सक बोटं काढून घेतली, आणि जणू माफी मागण्यासाठी म्हणून माझं जे चुंबन घेतलं, त्यामुळे तिथली ज्वाला अधिकच प्रखर झाली.

नावीन्याचा प्रभाव संवेदनेवर फार प्रकर्षाने पडतो, आणि सुखसंवेदनेच्या संबंधाने हे जास्त खरं आहे; तेव्हा ज्या गोष्टी निसर्गत:च मनोवेधक आहेत, आणि स्पर्शाच्या व डोळयांच्या सान्निध्यात ज्या प्रथमच आल्या आहेत, त्यांच्या आकर्षणाखाली तो गुंगून जावा यात आश्चर्य काहीच नव्हे. त्याच्या पराकोटीच्या कामना पुऱ्या होतील इथपर्यंत मी त्याच्या हाती सोडून दिलेल्या माझ्या मोकळया नग्नावयवांची त्या

भाबड्या निरागस कोकरावर मोहिनी पडलेली होती: त्याच्या डोळ्यांतून विस्तव बाहेर पाझरत होता, गाल फुलांसारखे लालभडक होऊन तो वेगाने उसासे सोडीत होता, आणि त्याचवेळी त्याचे हात झटापट करून त्या खोल जखमेचे ओठ व बाजू आवळून धरून त्यांची उघडझाप तरी करीत होते, किंवा तिथे वाढलेली हिरवळ हलकेच चाळवीत तरी होते; आणि या साऱ्यांतून बेभान हर्षातिरेकाची व त्याच्या वासनेचे कोड पुरवले जात असल्याची जी ग्वाही मिळत होती, तिला साक्ष राहिल्यामुळे मला मात्र त्याला दिलेल्या सुखाचा दामदुप्पट मोबदला मिळाला.

पण त्याने माझ्या संयमाचा फार वेळ अंत पाहिला नाही, कारण समोर वाढून ठेवलेल्या वस्तूंमुळे त्याच्याकडचा सगळा संपून गेला होता; तेव्हा आता आपलं प्रचंड उपकरण बाहेर काढून त्याने त्याचा उन्मादकल्लोळ मोकाट सोडून दिला, व मूकनाट्याच्या प्रयोगात गोड लटका विरोध करणाऱ्या रुसून बसलेल्या ओठांवर थेट नेम धरून, डोकं घुसवून आत सारून, पुन्हा उफाळून आलेल्या उर्मीने मुसंडी मारून, सुखवेदनांची नेआण करणाऱ्या त्या मऊसूत बोगद्यातला अख्खा रस्ता तुंबून टाकला; आणि सर्व काही पुन्हा हादरून टाकून माझ्या अंगांगात अशी खळबळ माजवली, की त्या आग ओकणाऱ्या यंत्रातून नव्याने बाहेर आलेला चिंब भिजवून टाकणारा फवारा, व पुराने पातळी ओलांडली की ज्यांच्याकरवी निसर्ग तो आनंदाचा कलश तुडुंब भरून टाकतो ते निर्झर, यांखेरीज कशानेही ती शांत होऊ शकली नसती.

ह्या जबरदस्त प्रतिस्पर्ध्याबरोबरच्या युद्धात मार खाल्ल्यामुळे आता मी इतकी थकून, चिरडून गेले होते की मला उठता येईना की हालचाल करता येईना; तेव्हा मी धापा टाकीत पडून राहिले, आणि माझ्या संवेदनांतला कोलाहल हलकेहलके शांत होत जाऊन जेव्हा ह्या पोराला परत पाठवण्याची वेळ झाली, तशी आता तुला निघायला पाहिजे अशी त्याला हळूच आठवण करताना त्याच्याइतकंच मलाही वाईट वाटलं; कारण अजूनही मैदानात टिकून राहून पुन्हा एकदा मुकाबला सुरू करण्याची त्याची तयारी दिसली. पण यात धोका फारच होता, तेव्हा जाताना कडकडून चुंबनं घेऊन, सांभाळून राहण्याबद्दल व कुणाला काही कळू न देण्याबद्दल त्याला बजावून सांगून त्याची पाठवणी करण्याची मी स्वत:वर बळजोरीच केली; पण याच कामासाठी आपण शक्य तितक्या लवकरच पुन्हा भेटू, असं त्याला आश्वासन दिल्याखेरीज न राहता मी एक गिन्नी त्याच्या हातात कोंबली: यापेक्षा जास्त नाही, नपेक्षा एकदम खूप पैसे मिळाल्यामुळे हातून काहीबाही होऊन उगीच संशय येण्याची अथवा पकडले जाण्याची शक्यता होती; कारण ह्या वयात असला काहीतरी आततायीपणा घडण्याची धास्ती फार असते, आणि खरोखरीच ह्या हिरव्यातरण्या पोरांमध्ये जर तो एक मोठा दोष नसता, तर आमच्यावर त्यांची जी मोहिनी पडते ती थोपवून धरणं अशक्यच झालं असतं.

असे तृप्त करणारे सुखाचे प्यालेच्या प्याले रिचवल्यामुळे माझं डोकं हल्लक होऊन मला अशी नशा चढली होती की मी अजूनही दिवाणावर अंग ताणून लोळत होते; एक प्रकारचा गोड आळसटलेपणा माझ्या अवयवांवर पसरला होता, आणि जिथे मला ही मूळ दुखापत झाली होती (असं म्हणायचं), अगदी त्याच जागी, अगदी त्याच पद्धतीने, त्या दुखापतीचा मनसोक्त बदला घेता यावा याबद्दल मी स्वत:वर अतिशय खूष झाले होते. परिणामांचा विचार करून मी डोक्याला त्रास करून घेतला नाही; आणि ज्या व्यवसायाची निर्भर्त्सना तर केली जाते पण वापर कमी होतो असं नाही, त्या व्यवसायात माझ्या या कृतीमुळे मी पूर्णपणे शिरले याबद्दल मी स्वत:ला एकही दूषण दिलं नाही. मिळालेल्या सुखाबद्दल पश्चात्ताप करून घेणं ही मला त्याच्याविषयी कृतघ्नता वाटली असती; आणि आता मर्यादा ओलांडलेली असल्यामुळे, ज्या प्रवाहातून मी जोराने वाहवत चालले होते त्यात डोक्यापर्यंत खाली जाऊन सगळी शरम व सारासारबुद्धी बुडवून टाकावी असं मी ठरवलं होतं.

अशा प्रकारचे स्तुत्य मनोरथ रचीत असताना आणि बेलगामपणे वागण्याची मूक प्रतिज्ञा करीत असताना, मिस्टर एच– आत आला. नुकत्याच झालेल्या श्रमांमुळे आलेली माझ्या गालांवरची लकाकी मी आत्ता काय करीत होते याच्या आठवणीने अधिकच वाढली, व त्यात माझ्या अस्ताव्यस्त कपड्यांमुळे आलेल्या खुमारीची भर पडल्यामुळे मिस्टर एच– च्या तोंडून माझ्या दिसण्याबद्दल कौतुकाचे शब्द बाहेर आले; पण इतकंच नव्हे तर ते मनापासून उच्चारलेले आहेत याचा पुरावा देण्यासाठी तो पुढे सरसावलाच होता; आणि तेही इतक्या चपळाईने, की त्या जागचे अवयव नुकतेच धुमश्चक्रीत सापडल्यामुळे त्यांची जी अवस्था झाली होती ती उघडकीस येईल अशी मला धास्ती वाटू लागली: कारण छिद्र ताणलं जाऊन लालभडक दिसत होतं, प्रमाणाबाहेर फाकल्यामुळे ओठ सुजले होते, केसांचे भोवरे दबून चिरडून जाऊन तिथे सगळीकडे ओल पसरल्यामुळे भिजून त्यांची गोलाई विस्कटली होती; थोडक्यात असं की तिथली परिस्थिती नेहमीपेक्षा वेगळी असण्यामागचं खरं कारण मिस्टर एच– इतकी शोधक दृष्टी आणि अनुभव असलेल्या माणसाच्या लक्षात येणार नाही, हे शक्य नव्हतं. पण इथे माझ्यामधल्या बाईकडून माझी सुटका झाली: मी बतावणी अशी केली, की माझं डोकं भयंकर दुखतं आहे आणि सणकून ताप आला आहे, तेव्हा ह्या प्रकृतिअस्वास्थ्यामुळे मी त्याचं प्रेमालिंगन सध्यातरी स्वीकारू शकत नाही. हे त्याला मान्य झालं, आणि शहाण्यासारखं वागून त्याने पुढे काही केलं नाही. यानंतर लगेचच एक वयस्क बाई भेटायला आल्यामुळे आम्ही तिघेजण होऊन, या अवघड परिस्थितीतून माझी सोयिस्कर सुटका झाली; आणि मला काळजी घ्यायला व आराम करायला बजावून सांगून मिस्टर एच– निघून जाताच मला चांगलंच हायसं वाटलं. रात्र होऊ लागताच मी टबात गरम पाणी करून त्यात सुंदर गोड वासाच्या वनस्पती टाकायला सांगितल्या, आणि त्यात मनसोक्त आंघोळ करून शांत होऊन

बाहेर येताच माझं मन व शरीर अगदी मस्त ताजं टवटवीत होऊन गेलं.

रात्रीच्या गाढ झोपेने आराम होऊन, दुसऱ्या दिवशी सकाळी जेव्हा मी काहीशी लवकरच उठले, तेव्हा माझ्या नाजुक आणि विसविशीत नगररचनेला उद्धवस्त करण्याकरिताच इतक्या प्रचंड आकाराच्या बनवलेल्या त्या यंत्राच्या आघाताने तिथे काय दैना उडाली असेल, ह्या विचारामुळे मला किंचित अस्वस्थपणा व धास्ती वाटल्याखेरीज राहिली नाही. आणि एकदा ही बाकबूक वाटू लागताच, खाली काय अवस्था आहे हे पडताळण्यासाठी हात तिथे नेण्याचा धीर होईना.

पण घाबरण्याचं कारण नाही, हे मला लवकरच कळून चुकलं. कडांवर झुकलेले रेशमी केस पुन्हा एकदा सारखे करून नीट बसवल्यानंतर त्यांना त्यांचा कुरळेपणा व नीटसपणा परत मिळाला होता; हल्ल्याचा बहुतेक मारा ज्यांना सोसावा लागला होता, त्या रुसलेल्या मांसल ओठांची सूज उतरून तिथली ओलही कमी झाली होती; आणि गरम पाण्यात आंघोळ केल्यानंतर येणारं शैथिल्य हिशेबात धरूनही, कितीही बारकाईने शोध घेतला तरीदेखील, त्यांच्यामध्ये किंवा ते ज्यात उघडत होते त्या कमालीचं प्रसरण सहन करावं लागलेल्या बोगद्यामध्ये आतून किंवा बाहेरून तसूभरही फरक दिसून येत नव्हता. हा जो स्त्रीदेहातला त्या जागचा आवळपणा असतो, आणि पुरुषांकरिता सुखाचा मूलस्रोतच असतो, तो माझ्या बाबतीत अबाधित राहावा याचं श्रेय माझ्या शरीराची तशी सहजप्रकृती असण्याला द्यायला हवं; कारण भरपूर रसाळ व गुबगुबीत असलेल्या तिथल्या माझ्या अवयवांचा पोतच असा होता, की कितीही ताण दिला तरी तिथल्या मऊ लवचिक पुष्ट मांसाचं त्याप्रमाणात तात्पुरतं प्रसरण होऊन पुन्हा लागलीच आकुंचन होत असे; जेणेकरून तिथल्या घडीदार वळ्यांची मगरमिठी पुन्हा एकदा घट्ट व्हावी, आणि ज्या भुयारी मार्गाच्या भिंतीलगत ह्या वळ्या असतात, तो मार्ग माझ्या शोधक तर्जनीला आत्ता जसा बिलगला होता, तसा आत आलेल्या कोणत्याही बाहेरच्या वस्तूला हळुवारपणे कवेत घेऊन सगळीकडून बिलगून रहावा.

सर्व काही आलबेल आहे असं पाहताच मला माझी जुनी भीती तिची मनोमन टर उडविण्यापुरती आठवली. आणि आता कितीही मोठ्या आकाराचा पुरुष मला पेलता येतो याचं प्रमाण मिळाल्यानंतर, सुखोपभोग आणि सूड असा दुहेरी प्रताप गाजवल्यामुळे हुरळून जाऊन, इथून पुढे कायकाय मजा येईल इत्यादि कल्पनांमध्ये मी आकंठ बुडून गेले. साऱ्या शरीरभर एक नवं स्फुरण येऊन अंग ताणून मी लोळत पडले, आणि अतिरेकी मिठ्ठास असणं हा एकच दोष ज्यामध्ये होता असा हा आनंदसोहळा पुन्हा केव्हा येईल याची वाट पाहताना कमालीची उतावळी होऊन गेले. आणि अपेक्षेप्रमाणे सकाळी दहाच्या सुमारास, विल (माझा नवा लाजाळू प्रियकर) त्याच्या मालकाकडून, मिस्टर एच– कडून, माझी प्रकृती

कशी आहे असा निरोप घेऊन आला, तेव्हा कुठे माझी प्रतीक्षा संपली. माझ्या मोलकरणीला ज्या काही कामानिमित्त गावात पाठवण्याची सावधगिरी मी बाळगली होती, ते व्हायला बराच वेळ लागेल अशी मला खात्री होती; आणि इमारतीतले इतर लोक बिचारे साधेसुधे व इतर कुणाच्या भानगडीत न पडण्याइतके शहाणे असल्यामुळे, त्यांच्या बाजूने मला काही भिण्यासारखं नव्हतं.

तो येईल तेव्हा बिछान्यात पडून राहायला न विसरणं, यासकट सर्व व्यवस्था झाल्यानंतर, जेव्हा तो माझ्या बेडरूमचं दार उघडून आत आला, तेव्हा मी तारेने बांधलेली एक खिटी खाली पाडताच ते बंद होऊन गेलं. माझा हा कोवळा कोकरा, त्याच्यासारख्या परिस्थितीत राहणाऱ्याकडून जितपत अपेक्षा करता येईल तितका झकपक पोषाख करून आलेला आहे, हे माझ्या लक्षात आल्यावाचून राहिलं नाही: यातून उघड होणारी मला खूष करण्याची त्याची धडपड मी नजरेआड मुळीच केली नाही, कारण तो माझ्यावर खूष आहे असा अर्थ यातून निघत होता: आणि हा शेवटचा मुद्दा माझ्या दृष्टीने तितकासा बिनमहत्त्वाचा नव्हता, हे मी इथे लागलीच कबूल करत्ये.

त्याचे नीटनेटके बसवलेले केस, स्वच्छ कपडे, आणि विशेष म्हणजे गावाकडच्या माणसाची धडधाकट, सळसळत्या रक्ताची, निरोगी अंगकाठी यामुळे कुठल्याही बाईने मिटक्या मारत खावा असाच तो दिसत असे; आणि निसर्गदेवतेने बनवलेल्या ह्या चमचमीत तुकड्यावर जी मनसोक्त ताव मारीत नाही, त्या बाईच्या तोंडाला अगदीच चव नाही असं मी म्हटलं असतं.



# भाग पाचवा

ह्या गोड प्राण्याच्या प्रत्येक भाबड्या दृष्टिक्षेपाशी, आणि अव्याज अशा प्रत्येक साहजिक हालचालीशी फितुरी करणारे त्याचे खट्याळ डोळे; त्याच्या ताज्या, नितळ, अर्धपारदर्शक त्वचेमधून दिसून येणारी रक्ताची लाली व सळसळ; गावरान धट्ट्याकट्ट्या अवयवांचा सुखावणारा विवक्षित भार; ह्या साऱ्या गोष्टींनी मला दिलेला आनंद मी इथे छपवून का बरं ठेवावा? आहा! पण तुम्ही म्हणाल की हा तरुण इतक्या खालच्या वर्गातून आलेला होता की असं आकर्षक बाह्यरूप लाभण्याची त्याची योग्यता नव्हती. असेलही तसं; पण काटेकोरपणे पाहिलं तर माझं स्वत:चं स्थान त्याच्यापेक्षा तिळभर तरी श्रेष्ठ होतं का? आणि खरोखरीच जरी मी त्याच्या तुलनेने उंचावर असते, तरीदेखील इतकं अपरंपार सुख देण्याच्या त्याच्या अंगच्या क्षमतेमुळे निदान माझ्याकरिता तरी त्याची इयत्ता वर येऊन मानसन्मानाचीच झाली नसती का?

चित्रकाराच्या, मूर्तिकाराच्या किंवा संगीतकाराच्या कलेमधून ज्या कुणाला जितका आनंद मिळतो त्या प्रमाणांत जर त्यांना आदराचा, जपणुकीचा आणि पैशाचा मोबदला दिला, तर माझी काहीसुद्धा अढी नाही; पण माझ्या वयात, आणि तेही सुखभोगाची मोठी प्राकृतिक उबळ असणाऱ्या माझ्यासारखीला, निसर्गानेच जर एखाद्या छान माणसाजवळ इतरांना सुख देण्याचं कौशल्य सुपूर्द केलेलं असेल, तर हाच कलागुण सर्वांत मोलाचा वाटतो; आणि त्याच्या तुलनेने बिल्ले, किताब, मानमरातब इत्यादींविषयी अडाण्यांना वाटणाऱ्या बडेजावाची किंमत फार तुच्छ वाटते. शरीराची सौंदर्ये खरेदी करून परिधान करिता येतील अशी जर सोय असती, तर ती आम्ही कवडीमोलाची समजतो असा लटका आव आणण्याची चूष थोडी कमी झाली असती. पण ज्या बाईचं सारं जडजंबाल तत्त्वज्ञान तिच्या लाडक्या संवेदनाकेंद्रामध्ये सामावलेलं आहे, आणि त्या केंद्रात बिऱ्हाड करून राहणारी व सुखाची गचांडी धरून ते हस्तगत करणारी जबरदस्त उर्मी जिच्यावर अंमल गाजवते आहे, अशा माझ्यासारखीला यापेक्षा जास्त नेमकी निवड करताच आली नसती.

जन्मजात सामाजिक स्तर, वैभव आणि जगाचं ज्ञान ह्या सर्वच बाबतींत मिस्टर एच– ची पायरी माझ्या बरीच वरची असल्यामुळे जो एक प्रकारचा मिंधेपणा व अवघडलेपणा माझ्यावर लादला गेलेला होता, त्यामुळे आमच्यातल्या प्रेमाच्या द्वंद्वगीताची गोडी वाढायला बिलकुल मदत होत नसे; आणि ह्या मुलीसाठी उंचावरून किंचित खाली यावं इतक्या योग्यतेची बहुतेक मी त्याला वाटले

नसणार; पण ह्या पोराबरोबर मात्र मी अशा पातळीवर होते की जिथे स्नेहभावनेला जास्त मौज वाटावी. तोंडाने कुणी काही म्हणो, पण ज्यांच्याबद्दल आपल्याला खूप जिव्हाळा असतो (मी प्रेम नाही म्हणत), त्यांच्याच सहवासात आपण खूप सहज आणि मोकळे वागतो. ह्या कोकराच्या अंगातल्या प्रीतीच्या साऱ्या कळा त्याच्या करून दाखवण्यामध्ये होत्या; दडपून न जाता किंवा स्वत:ला चोरून न ठेवता, आनंदभावनेला मोकाट सोडून, कामनेचे खेळ करण्याच्या ज्या काही योजना माझ्या लाडावलेल्या कल्पनाशक्तीला सुचतील त्या यच्चयावत साऱ्या मी त्याच्याबरोबर प्रत्यक्षात आणीत असे, आणि यामध्ये प्रत्येक अर्थाने तो मला अतिशय बहारीची साथ देई. आत्ताच ज्याला अंगमांस चढलेलं आहे, शिकारीचा रानवट वास आत्ताच ज्याच्या नाकात घुसलेला आहे पण अजून जो खेळात मुरायचा आहे, अशा ह्या कच्च्या बच्च्याची प्रत्येक सुरसुरी, प्रत्येक चावट लहर पुरवण्यात मला मोठी मजा वाटू लागली: आणि हीच उपमा पुढे चालवायची, तर जंगलातून याहून जास्त झपाट्याने वाट काढू शकेल किंवा सावजाच्या काळजात नेमका भाला रुतवू शकेल, असा दुसरा कोणी होता तरी का?

आता तो माझ्या बिछान्याशेजारी आला, आणि जेव्हा त्याने सांगायचा तो निरोप अडखळत मला सांगितला; तेव्हा माझ्या हे ध्यानात आलं, की जणू काही हा नाट्यप्रवेश त्यानेच सांगून लिहवून घेतला असावा अशा प्रकारे त्याच्या साऱ्या अनिर्बद्ध इच्छांना अनुकूल अवस्थेत मला पहुडलेली पाहून, त्याच्या चेहऱ्यावर लालीमा चढला आहे व डोळे आनंदाने चमकताहेत. मी हसून माझा हात त्याच्या पुढे करताच त्याने गुडघे टेकवले (हा आदबशीरपणा, त्याच्या मालकाने, म्हणजे कामदेवानेच त्याला शिकवला होता), आणि त्याचं हावरं चुंबन घेतलं. काही निरर्थक प्रश्नोत्तरांची देवाणघेवाण झाल्यानंतर मी त्याला विचारलं, की जो काही थोडा वेळ तुला थांबवून घेणं मला जमणार आहे, तेवढ्यात तू माझ्याबरोबर बिछान्यात येशील का? भुकेने प्राण जात असलेल्या माणसाला, जगातल्या तुला सर्वांत आवडत्या पदार्थावर ताव मारशील का, असंच विचारण्यासारखं हे होतं. तेव्हा अधिक चिंतन न करता त्याने क्षणार्धात कपडे काढून टाकले; आणि आपल्याला मिळालेल्या ह्या नव्या मोकळिकीमुळे लाजून जात, त्याला आत घेण्याकरिता मी वर उंच धरलेल्या पांघरुणाखाली तो शिरला– आता आयुष्यात प्रथमच तो एका स्त्रीबरोबर बिछान्यात होता.

आणि यानंतर, सुखाच्या परमोच्च बिंदूइतकीच कदाचित जी आनंददायी असते त्या नेहमीच्या लडिवाळ संथ आलापीला सुरुवात झाली; पण अनेकदा काय होतं, की ह्या बिंदूपर्यंत पोहोचण्यासाठी ती उतावळं करते; जेणेकरून शेवटच्या अंकाकडे जाण्याची घाई होऊन, ज्या सुखसंपृक्त नटकथेमध्ये

अभिनेते आपापल्या कामांवर इतके खूष असतात की ती अनंतकाळ चालत राहावी असंच त्यांना वाटतं, तीवर पडदा पडून सुखच सुखाला संपुष्टात आणतं.

माझ्या गोलदार गुबगुबीत स्तनांशी चाळा करून, त्यांच्या पाप्या घेऊन, त्यांना हाताळून, आणि त्याच्या गरम स्पर्शांनी तिथे धगधगता वणवा पेटवलेला असल्यामुळे ज्याला मी माझ्या चुलाणाचं तोंड म्हणेन तो भाग चाचपडून पाहून, आम्ही जेव्हा मजल दरमजल करीत मुख्य मुद्द्याच्या दिशेने बरीचशी वाटचाल पुरी केली; तेव्हा आत्तापर्यंत मिळालेल्या मनमुराद स्वातंत्र्यामुळे ज्याचं धारिष्ट्य वाढलेलं आहे अशा ह्या माझ्या तरण्याबांड शिकाऱ्याने माझा हात खेळकरपणे पकडून त्याच्या महाप्रचंड इंद्रियाकडे नेला. त्याचा ताठरपणा, टणकपणा, उभारलेला बाकदारपणा, आणि स्त्रीच्या कर्णभूषणांप्रमाणे खाली लोंबणारे अमाप आकाराचे दोन फुगीर लोलक, हा देखावा मोठा साजून दिसत होता. त्याला मुठीत पकडू पाहणारीला किंवा त्याची लांबी मोजू पाहणारीला जणू खिजवेल असा त्याचा विस्तार पाहून माझी भीती जवळजवळ पुन्हा जागी झाली. हा इतका जाडजूड प्रकार मी आत कसा घेणार किंवा त्याला नजरेआड कसा करणार, ह्याची मला काही कल्पना येईना. मी त्याला हळुवारपणे कुरवाळताच हा बेजुमान मवाली फुलून येऊन त्याच्या माजोरी कुर्रेबाजपणाने आणखी वरची पातळी गाठली; तेव्हा आता त्याला फार मस्करी सहन होणार नाही, असं पाहून मी निमूटपणे डावाच्या तयारीला लागले.

त्याच्या भूमिकेला पुरेसा वाव मिळावा याकरिता एक उशी माझ्या खाली सरकवून; ज्याचं लालभडक डोकं पाहून हृदयाचा भास व्हावा असं हे चवताळलेलं मुसळ माझ्या तत्पर हातात घेऊन, अगदी व्यवस्थित उंचीवर आलेल्या निशाणापर्यंत मी नेऊन लावलं; माझे पार्श्वगोल वर उचललेले असून मांड्या कमाल मर्यादेपर्यंत फाकलेल्या होत्या, आणि आतून वेगाने बाहेर येणाऱ्या उष्णतेच्या झोतांमुळे खोलीत हवा शोषून घेणाऱ्या कवाडापाशी असल्याचा त्याला भास होत होता; आता सरळ पुढे घुसताच, आनंदाला आसुसलेल्या त्या बोगद्याबाहेरच्या जोरदार ताकद लावल्याने विलग झालेल्या ओठांनी त्याला आत घेतलं. तो थोडासा अडखळला; पण एकदाचा स्थिरावल्यानंतर, चिंचोळ्या डोंगरकपारींतून पुढे रस्ता काढू लागताच, ज्यामुळे सुख होईल इतपतच विरोध त्याला होत गेला; आत येताना त्याने रुंदी वाढवीत नेत, प्रत्येक मऊमुलायम चाकोरी पुढे नेऊन गुळगुळीत करीत आणली, आणि माझ्यातल्या ज्या इंद्रियाने त्याला आता लपेटून घेतलेलं होतं, तिथले माझे व त्याचे सामायिक स्पर्शबिंदू जसजसे संख्येने वाढत गेले तसतशी आमच्या आनंदाला अधिकाधिक खुमारी येऊ लागली; आता तो अख्खा आत येऊन पूर्णपणे वेढला गेलेला होता: आणि कोंबून

भरलेल्या, तुटेपर्यंत ताणल्या गेलेल्या माझ्या इंद्रियाने केवढ्या कृतज्ञतेने त्याचं बिलगून स्वागत केलं! घड्या अशा घट्ट झाल्या होत्या! कशा प्राणांतिक त्वेषाने त्याला शोषून घेऊ पहात होत्या! ज्या आनंदाची देवाणघेवाण होत होती, त्याला उच्चार नाही.

जितके एकत्र येणं शक्य आहे तितके आता आम्ही आलो होतो, पण जेव्हा तो आणखी वेगाने पुढे येण्यासाठी मागे सरला, तेव्हा जणू काही त्याला गमावून बसेन अशा भीतीने मी डिवचले जाऊन, कमालीच्या तिरीमिरीने त्याच्या नितंबांभोवती माझ्या पायांचा विळखा घालताच तिथले घट्टसर, लवचिक स्नायू पुन्हा त्या दाबाखाली थरथरले; आता मी सर्व बाजूंनी वेढून त्याला काबीज केलेला होता, आणि माझ्या घरात ओढून आणून, जणू काही आमची शरीरं मला एकच बनवायची असावीत अशा प्रकारे पकडून धरून ठेवला होता. यामुळे चलनवलन स्थगित होऊन एक सुखविराम मिळाला; आणि त्याचवेळी, ओतप्रोत भरून गेलेलं व हावरेपणा करायला सोकावलेलं माझं नाजुकसं खालचं तोंड, घेतलेल्या घासाची मोठ्या मिटक्या मारीत चव पाहू लागलं.

पण समाधान न करता केवळ अतोनात चाळवीत राहणारं सुख निसर्गाला फार काळ धरवलं नसतं; तेव्हा आपला हृदयस्थ हेतू पुढे चालवीत त्याने आता दुप्पट जोमाने पुन्हा भडिमार सुरू केला: आणि माझ्या बाजूने मीही निष्क्रियपणे पडून न राहता, आवाक्यात होती तितकी जोरकस हालचाल चालू ठेवून त्याचा मुकाबला करीत राहिले. एकमेकांना भिडलेल्या आमच्या टेकाडांवरील मऊशार विसविशीत त्वचेचा ह्या रेटारेटीचा मारा कमी करण्याकरिता उत्तम उपयोग होत होता; पण मग लवकरच (फारच लवकर!), इतक्या इरेला पडून केलेलं रणकंदन, आणि वरखाली घर्षणामुळे उद्भवलेली गोड आणीबाणीची परिस्थिती, यांमुळे माझ्यातली चाळवणूक निर्वाणीच्या अवस्थेला पोहोचली; तेव्हा मी आता येणार असं समजून, आणि माझ्या सुखाच्या सुकुमार साथीदाराला मागे सोडून जाण्याची कल्पना नकोशी वाटून, माझ्या अनुभवातून ज्या काही निर्णायक हालचाली व युक्त्याप्रयुक्त्या मला सुचल्या त्या साऱ्या मी उपयोगात आणल्या, आणि प्रवासात तो मला शेवटापर्यंत साथ देईल अशी व्यवस्था पाहिली.

ज्यांचं यादृच्छिक चलनवलन करता येतं अशा तिथे असणाऱ्या सुप्त लवचीक स्नायूंकरवी घर्षण व दाब वाढवून माझ्या अधिऱ्या झालेल्या बंदिवानाभोवतीचा विळखा मी घट्ट केला, पण इतकंच नव्हे तर निसर्गाची चविष्ट मिठाई ज्या पिशवीत साठवलेली असते, आणि ती आमच्यापर्यंत पोहोचवणारी नळी मोठ्या गंमतीदारपणे बसवलेली असते, तिथे माझा हात अलगदपणे चोरून नेला; आता ते

नाजुकसे गोलाकार कुंभ हाताळताच व हळुवारपणे दाबताच, माझ्या जादुई स्पर्शाचा तत्क्षणी परिणाम होऊन त्या मधुर वेदनेची लक्षणं तात्काळ दिसू लागली. शरीर वितळवून टाकणाऱ्या त्या विरघळत्या क्षणी सुखाची सुखाने हत्या होते, आणि ह्याला कारणीभूत ठरणारं ते मायावी यंत्र तिथल्या इंद्रियांमध्ये आपणच निर्माण केलेली खळबळ अशा एका धारोष्ण द्रवपदार्थाचा धबधबा ओतून विझवून टाकतं, की तो स्वत: त्याहीपेक्षा प्रचंड अशी खळबळ माजवतो; आणि चवताळलेल्या जळूने अंगाचा दाह शांत करण्याकरिता आजूबाजूचा ओलेपणा चिवटपणे शोषून घ्यावा, त्याप्रमाणे तिथले तहानलेले अवयव ह्या द्रवाला पिळून ओढून घेतात. त्याच्याशी एकरूप होऊन मी पाघळून जात असतानाच, त्याने जसा हा आरोग्यवर्धक स्निग्धद्रव माझ्यात एखाद्या मंजुळ नादलहरीप्रमाणे सोडून दिला, तसा माझ्यातून भळभळा वाहू लागणाऱ्या रसांमध्ये तो मोठ्या खुबीने मिसळून जाऊन, सुखाच्या साऱ्या झिणझिण्यांवर आवरण पडून त्या बोथटल्या; आणि हर्षोन्मादामध्ये आम्ही दोघे असे भिरकावले गेलो की श्वास तुटला, भान हरपलं व मोहिनी पडली. एका मादक आळसटपणाने आमच्या शरीरांचा ताबा घेतला आणि एकमेकांच्या घट्ट बाहुपाशांत आम्ही निचेष्ट पडून राहिलो.

हा आनंद यापेक्षा अधिक टिकू नये हे केवढं दुर्दैव! कारण आता सुखाची धार कमी झाली, आमच्या उफाळलेल्या संवेदना खाली बसून गेल्या, आणि दैनंदिन निरस आयुष्यांतल्या थंडावलेल्या काळज्यांनी पुन्हा आमचा ताबा घेतला. त्याच्या मिठीतून स्वत:ला सोडवून घेत, त्याने आता मला का सोडून जाणं गरजेचं आहे याची कारणं मी त्याच्या लक्षात आणून दिली; तसे नाखुषीने का होईना, पण जितका वेळ काढणं शक्य आहे तितका काढीत त्याने पुन्हा कपडे चढवले, पण हे चालू असताना पाप्या, मिठ्या आणि स्पर्शांची जी ढापाढापी मध्येमध्ये केली तिचा मोह मला आवरता आला नाही. अजून का आला नाही अशी विचारणा होण्याआधीच तो आपल्या मालकाकडे परत गेला; पण जाण्यापूर्वी, सैनिकी छावण्यांमध्ये छानछोकी मिरवण्याचं सर्वमान्य साधन, अर्थात चांदीचं घड्याळ, खरेदी करता येईल इतके पैसे मी त्याला जबरदस्तीने घ्यायला लावले (कारण नको म्हणण्याइतकी माझ्या भावनांची चाड त्याला होती), आणि माझ्या स्नेहाची आठवण जपून ठेवण्याकरिता म्हणून शेवटी त्याने ते घेतले.

मदाम, फार प्रकर्षाने जाणवल्यामुळे आठवणीवर खोल परिणाम ठेवून गेलेल्या ह्या अशा गोष्टी मी किरकोळ तपशीलासकट का सांगत बसते आहे यामागचं काहीतरी कारण तुम्हाला द्यायला हवं; पण एकतर ह्या प्रकरणामुळे माझ्या आयुष्यात जी एक मोठी उलथापालथ झाली, ती मला तुमच्यापासून दडवून चालणार नाही अशी इतिहासाची ताकीद आहे; आणि याचबरोबर दुसरं असंही नव्हे का, की

इतकं विलक्षण सुख मला खालच्या वर्गातल्या एकाकडून मिळालं म्हणून कृतघ्नपणे ते मी विसरून जाऊ नये किंवा अनुल्लेखित ठेवू नये? आणि जाताजाता सांगायचं, तर उच्चभ्रू लोक खोटारड्या आणि हास्यास्पद नखऱ्यांकरवी आपल्या अहंमन्यतेकडून स्वत:ची जी धडधडीत फसवणूक करून घेतात, त्यापेक्षा उलट याच वर्गात हे सुख अधिक खऱ्याखुऱ्या व निर्भेळ स्वरूपात पाहायला मिळतं. ह्या उच्चभ्रूंबद्दल तरी काय सांगू तुम्हाला?! जगावं कसं या कलेविषयी त्यांच्यापेक्षाही जास्त अडाणी असणारे, आणि या कलेला त्यांच्यापेक्षाही कमी जोपासणारे नमुने, ज्यांना कुत्सितपणे आचारीपाणके लोक म्हटलं जातं त्या समाजात क्वचितच आढळतील. वास्तविक सौंदर्याचा आस्वाद घेणं हेच सुखाचं मुख्य व आवडतं उद्दिष्ट असतं, मग ती दुर्मीळ अमोलिक चीज कुठल्या सामाजिक स्तरात आढळली किंवा ती धारण करणाऱ्या व्यक्तीचा जन्म कुठल्या घराण्यात झाला होता याची त्याला काही पर्वा नसते; पण हे उच्चभ्रू मात्र ह्या सुखाच्या सहजप्रकृतीशी अगदी फटकून वागणाऱ्या गोष्टींशी त्याची सदोदित गल्लत करीत असतात.

ह्या देखण्या तरुणाशी माझे जे संबंध होते, त्यांत प्रेमाचा जसा कधीच काही भाग नव्हता तसा आता सूडाचाही राहिलेला नव्हता. केवळ शरीराची सुखं हा एकच दुवा आमच्यामध्ये होता: कारण त्याच्या बाह्य रूपाकरिता जरी निसर्गाने त्याला इतकं भरभरून दिलेलं होतं, आणि विशेष म्हणजे ते बावनकशी उपकरण उदारहस्ते बहाल केलेलं होतं; आणि यामुळे संवेदनांना मोठी चमचमीत मेजवानी देण्याची त्याची क्षमता जरी होती, तरीदेखील माझ्यामध्ये प्रेमभावना निर्माण होऊन तिने आकार घ्यावा, यासाठी कशाचीतरी कमतरता होती. पण विल स्वभावाने तसा फार चांगला होता: बरीक प्रेमळ होता, सांगितलेलं ऐकणारा होता, कृतज्ञ होता, वाजवीपेक्षा काहीसा अधिकच घुमा व अबोल होता; कोणत्याही वेळी तो फार कमी बोले, पण ही उणीव कृतीने पुरेपूर भरून काढी; याचबरोबर एक गोष्ट त्याच्या बाजूने पारड्यात टाकायला हवी, आणि ती म्हणजे माझ्याकडून त्याला जी मोकळीक मिळाली होती तिचा फायदा घेऊन तो माझ्या अंगावर आला आहे, किंवा कुठेतरी काहीतरी निष्काळजीपणे बरळला आहे, अशी तक्रार करायला त्याने मला कधीही थोडाही वाव दिला नाही. प्रेमात काहीसा योगायोगाचा भाग असतो, अन्यथा माझं त्याच्यावर प्रेम बसलंच असतं; कारण तो म्हणजे खरोखरीच एक रत्न होता, एखाद्या राणीच्या तोंडाला चव यावी अशातला होता– अगदी खरं सांगायचं तर मला तो इतका कडेलोट आवडत असे, की त्याच्या मी प्रेमात नाही असं म्हणणं हे अतिसूक्ष्म फरकांचा बाऊ करण्यासारखं होतं.

पण ते काही असलं तरीदेखील त्याच्याबरोबरचं माझं सुख फार काळ टिकलं नाही, आणि माझ्याच

बेसावध चुकीमुळे त्याचा शेवट झाला. पकडले जाऊ नये यासाठी गरजेपेक्षा कितीतरी जास्त दक्षता घेतल्यानंतर, आम्ही पुन्हापुन्हा घेतलेल्या भेटी निर्विघ्नपणे पार पडल्यामुळे मी बेफिकीर झाले आणि किमान आवश्यक त्या दक्षतासुद्धा घ्यायची विसरले. आमचा पहिला संबंध आल्यानंतर अंदाजे महिनाभराने, एका वाईट मुहूर्तावरच्या सकाळी (मिस्टर एच– अशा अवेळी बहुधा कधीच मला भेटायला येत नसे) मी माझ्या कपडे टांगलेल्या लहानशा कपाटवजा खोलीमध्ये अंगावर एक तोकडा सदरा, अंडर-पेटिकोट आणि झोपायचा गाउन एवढंच घालून होते. विल माझ्याबरोबर होता, आणि संधी दवडण्याइतके निरुत्साही आम्ही कधीच नव्हतो. माझ्यात अचानक सुरसुरी दाटून आली, आणि माझं तिथल्या तिथे ताबडतोब समाधान करण्याची माझ्या पुरुषाला फर्माईश करताच ही लहर पुरवायला त्याने अनमान केला नाही: मी आरामखुर्चीत बसवली गेले होते, माझा सदरा व पेटिकोट वर करून, मांड्या रुंद फाकून आरामखुर्चीच्या हातांवर चढवलेल्या असल्यामुळे निशाण अगदी अचूक विलच्या उगारलेल्या हत्यारासमोर आलेलं होतं; माझ्यात ते खुपसण्याच्या बेतातच तो होता, आणि तेव्हाच, मोठ्या खोलीचं दार बंद करायला मी विसरलेले असताना व कपाटाचं सताड उघडं असताना, आम्हाला काही कळण्याच्या आत मिस्टर एच– गुपचूप सामोरा आला, आणि गुन्हा शाबीत व्हावा अशा त्या पवित्र्यात त्याने आम्हाला नेमकं पाहिलं.

मी मोठ्याने किंचाळून पेटिकोट खाली टाकला, आणि अंगावर वीज कोसळलेला हा पोरगा फिकट पडलेल्या चेहऱ्याने थरथरत उभा राहून आपल्या मृत्युदंडाची वाट पाहू लागला. मिस्टर एच– ने आम्हा दोघांकडे एकेकदा, नजरेत संताप व तुच्छता यांचं मिश्रण आणून पाहिलं; आणि एकही शब्द न बोलता तडकाफडकी पाठ वळवून तो बाहेर निघून गेला. जरी मी बावचळले असले, तरीसुद्धा त्याने किल्ली फिरवून खोलीच्या दाराला कुलूप लावल्याचा आवाज स्पष्टपणे ऐकला; आता फक्त डायनिंग रूममधून बाहेर जायला रस्ता होता, अगदी तिथेच तो तिरीमिरीने येरझाऱ्या घालीत, मोठमोठ्याने पाय आपटत चालत होता, आणि अर्थात आमचं काय करावं याचा स्वत:शी खल करीत होता. इतकं होईपर्यंत बिचारा विल्यम अतोनात घाबरला होता, आणि मानसिक आधाराकरिता म्हणून हिम्मत धरण्याची मला स्वत:ला गरज असली तरीदेखील त्याची थोडीफार टिकून राहावी म्हणून माझी सगळी खर्च करावी लागली. मी त्याच्यावर आणलेल्या अरिष्टामुळे तो मला अधिकच आवडू लागला होता, आणि त्याला जिच्यात वाटा घ्यावा लागणार नाही अशी कुठलीही शिक्षा मी आनंदाने भोगायला तयार झाले असते. उभं राहण्याचं त्राण नसल्यामुळे एखाद्या थंड निर्जीव पुतळ्याप्रमाणे बसून राहिलेल्या या भयभीत तरुणाचा चेहरा मी माझ्या घळघळा वाहणाऱ्या अश्रूंनी भिजवून काढला.

मिस्टर एच– पुन्हा आमच्यासमोर आत आला, आणि अंगाची थरथर होते आहे व निकाल काय लागतो याबद्दल पोटात बाकबूक होते आहे, अशा अवस्थेत त्याने आम्हाला डायनिंग रूममध्ये त्याच्यासमोर यायला लावलं. मिस्टर एच– खुर्चीवर बसला, आणि चौकशीला तोंड देणाऱ्या गुन्हेगारांप्रमाणे आम्ही दोघे समोर उभे राहिलो; आता माझ्यापासून सुरुवात करून, मऊपणा किंवा कठोरपणा नव्हे तर ज्यामध्ये फक्त क्रूर बेपर्वाई आहे, अशा आपल्या करारी आवाजाच्या एकसारख्या पट्टीत त्याने मला विचारलं, की तू इतक्या खालच्या पातळीला येऊन माझा गैरफायदा घ्यावास, आणि तेही माझ्याच नोकराबरोबर, याबद्दल तुला काय म्हणायचं आहे, आणि हे तू करावंस इतकी माझी लायकी घसरण्यासारखं मी काय केलं होतं?

मी केलेल्या व्यभिचाराच्या गुन्ह्याला निर्लज्जपणे बचावाचं भाषण करण्याचा गुन्हा न जोडता, ठेवलेल्या बायकांच्या पारंपरिक रिवाजाला अनुसरून शालीन वृत्तीने, मध्येमध्ये अश्रू ढाळून व्यत्यय आणीत जे उत्तर मी दिलं, त्याचा सारांश असा: तुम्हाला दुखावण्याचा माझा बिलकुल हेतू नव्हता (आणि हे खरंच होतं), पण मग तुम्ही माझ्या नोकराणीबरोबर शेवटापर्यंत जाताना मी पाहिलं (इथे त्याचा चेहरा भयंकर गोरामोरा झाला), आणि यामुळे माझा जो संताप झाला, त्याला तुमच्याकडे तक्रार करून किंवा स्पष्टीकरण मागून वाट करून देण्याइतकं धाडस माझ्यात नसल्यामुळे ह्या मार्गाकडे मी वाहवत गेले; पण त्याचं समर्थन करण्याचा बनाव मी रचू इच्छित नाही, आणि ह्या पोराबद्दल बोलायचं तर त्याची काहीही चूक नाही, कारण सूड घेण्यासाठी त्याचा उपयोग करायचा या हेतूने मीच सरळसरळ त्याला नादी लावलं; तेव्हा तुम्ही माझं काहीही करायचं ठरवलंत, तरीदेखील गुन्हेगार कोण व निरपराध कोण यांमध्ये तुम्ही फरक करावा अशी मी विनंती करत्ये, आणि याउपर आता सगळं तुमच्या हाती आहे.

हे ऐकून मिस्टर एच– काहीसा शरमिंदा झाला; पण लगेचच सावरून तो मला जे काही म्हणाला, ते जितपत आठवतं ते असं: "मदाम, मला माझीच लाज वाटते, आणि तुम्ही माझ्यावर चांगलीच बाजू उलटवलीत हे मी कबूल करतो. तुमची आगळीक व माझी आगळीक यांत केवढा मोठा फरक आहे, याविषयी तुमच्या वर्गातल्या व तुमच्याइतकी समजूत असणाऱ्या बाईबरोबर मी चर्चा करीत बसणार नाही: पण तुम्ही मला ज्या कारणाकरिता बोल लावला आहे ते विचारात घेऊन मी माझा आधीचा निर्णय बदलावा, इतपत तुमच्या म्हणण्यात तथ्य असल्याचं मी मान्य करतो आहे एवढं तुम्हाला पुरेसं व्हावं. या हरामखोराची चूक तुम्ही अंगावर घेतलीत हा तुमचा प्रांजळपणा आहे. गुन्हा इतका

घाणेरडा आहे की यापुढे तुमच्याबरोबर संधान ठेवणं मला शक्य नाही. ही जागा खाली करण्यासाठी मी तुम्हाला एक आठवड्याची मुदत देतो; मी जे तुम्हाला दिलेलं आहे ते तुम्हीच घेऊन जा; आता पुन्हा तुम्हाला कधीही भेटण्याची माझी इच्छा नसल्यामुळे माझ्या वतीने घरमालक तुम्हाला पन्नास गिन्न्या देईल, आणि त्याशिवाय तुमची सगळी शिल्लक देणी भागवली जातील; तेव्हा जशा अवस्थेत मी तुम्हाला घेतलं, किंवा माझ्याकडून जितपत मिळावं अशी तुमची लायकी आहे, त्यापेक्षा वाईट परिस्थितीत मी तुम्हाला सोडून दिलेलं नाही, हे आपण कबूल कराल अशी आशा आहे. यापेक्षा जास्त मिळालं नाही हा तुमचाच दोष समजा."

मला उत्तर देण्याची संधी न देता तो या पोराला म्हणाला, "तू टग्या आहेस, पण तुझ्या वडिलांखातर मी तुझी काळजी घेईन: लंडन ही जागा तुझ्यासारख्या बावळटासाठी नाही; तेव्हा माझा एक माणूस उद्या तुझा ताबा घेऊन वडिलांकडे तुला परत सोडून येईल, आणि याला इथे पुन्हा परत येऊन बिघडू देऊ नका, असा स्पष्ट इशारा त्यांना माझ्यातर्फे पोहोचवला जाईल." इतकं बोलून तो निघून गेला, आणि मी त्याच्या पायाशी लोळण घेऊन केलेला त्याला थांबवण्याचा प्रयत्न अयशस्वी झाला. त्याने मला झाडून टाकलं असलं तरीसुद्धा त्याला फार वाईट वाटलं असावंसं दिसलं; जाताना विलला तो आपल्याबरोबर घेऊन गेला – तो मात्र आपण फार स्वस्तात सुटलो असं समजला असणार, हे नक्की.

आता मी पुन्हा भरकटले होते, आणि ज्याच्याबरोबर असण्याची खरोखरीच माझी लायकी नव्हती, अशा त्या भल्या माणसाने मला स्वत:च्या नशीबावर सोडून दिलेलं होतं. त्या ठिकाणी मला देण्यात आलेल्या आठवडाभराच्या मुदतीत मी लिहिलेली पत्रं, योजलेल्या युक्त्या, सामायिक ओळखीच्या लोकांकडून करविलेल्या विनवण्या, ह्या सगळ्याचा, त्याने एकदा मला भेटायला तयार व्हावं इतकाही परिणाम झाला नाही. मी खड्डयात जावं असं त्याने कायमचं ठरवून टाकलेलं होतं, आणि त्यापुढे मान तुकवणं एवढीच भूमिका माझ्याकरिता उरलेली होती. त्यानंतर काही दिवसांतच एका प्रतिष्ठित घराण्यातल्या श्रीमंत बाईशी त्याने लग्न केलं; आणि मला कळलेल्या माहितीनुसार, नवरा म्हणून तो कुठेही नाव ठेवायला जागा राहणार नाही असा वागला. बिचाऱ्या विलबद्दल सांगायचं तर त्याचा बाप बिचारा एक खेडवळ शेतकरी होता, तिकडे त्याला परत पाठवण्यात आलं; आणि तिथे चार महिने जातात न जातात तोच, पैसाअडका व धंदापाणी या दोन्ही बाजूंनी बळकट असलेल्या, आणि कदाचित त्याच्या सुप्त गुणवैशिष्ट्यांशी आधीपासूनच ओळख असलेल्या, एका खाणावळवाल्याच्या तरण्याताठ्या टंच विधवेने त्याच्याशी पाट लावला: त्यांच्या दांपत्यसुखाला निदान एक तरी भक्कम आधारस्तंभ होता हे मात्र निश्चित. तो जाण्यापूर्वी त्याला भेटायला मला

फार आवडलं असतं, पण मिस्टर एच– च्या हुकुमावरून जशा प्रकारच्या तजविजी करण्यात आलेल्या होत्या, त्यामुळे ते अशक्य होतं; नाहीतर त्याला लंडनमध्ये ठेवण्यासाठी मी खटपट केली असती, आणि तो माझ्याबरोबर राहण्यातलं सुख मिळवण्याकरिता कितीही खर्चाला नाही म्हटलं नसतं. माझ्या मनातल्या इच्छांवर त्याचा असा जबरदस्त पगडा होता की तो सहजासहजी बाजूला करणं किंवा त्याला पर्याय शोधणं सोपं नव्हतं; माझं हृदय गुंतलं असण्याचा अर्थात प्रश्न नव्हता: पण ते काही असलं, तरीदेखील याहीपेक्षा वाईट झालं नाही याचा मला मनापासून आनंद वाटला, आणि गोष्टी जशा घडल्या त्यापेक्षा त्याच्याकरिता त्या अनुकूल घडण्याची शक्यता फारशी नव्हतीच.

मिस्टर एच– बद्दल बोलायचं, तर सुरवातीला माझ्या स्वार्थाकरिता त्याची मर्जी परत मिळवण्याचे मी प्रयत्न केले खरे, पण मी इतकी अविचारी आणि थिल्लर होते की ह्या प्रयत्नांत आलेलं अपयश स्वीकारण्याच्या कामी जितकी यायला हवी होती, त्यापेक्षा मला खूपच कमी अडचण आली; शिवाय एकतर माझं त्याच्यावर प्रेम केव्हाच नव्हतं, आणि जी एक प्रकारची बंधमुक्तता मला कित्येक दिवस हवीहवीशी वाटत होती, ती त्याने सोडून दिल्यामुळे मिळताच मला लवकरच हायसं वाटू लागलं. याखेरीज, तारुण्य व सौंदर्याची जी पुंजी घेऊन मी व्यवसायात शिरू पाहात होते, तिच्या जोरावर माझा उदरनिर्वाह चालायला काहीसुद्धा तोशीस पडणार नाही अशी मी स्वत:ची खुषामत करून घेत असल्यामुळे, त्या पुंजीच्या जोरावरच जर स्वत:चं नशीब अजमावायचं तर हे काम निराशेचा स्पर्शही होऊ न देता उलट आनंदाने व सुखासीन वृत्तीने करायला हवं असं मी स्वत:ला बजावू लागले.

मधल्या कालावधीत माझ्या भगिनीमंडळातल्या अनेक ओळखीच्या बायकांना या दुर्घटनेची बातमी कळली, आणि त्या आपल्या कुत्सित सांत्वनांनी माझा अपमान करण्याकरिता धावून आल्या. मला ज्या श्रीमंतीत व डामडौलात ठेवलेलं होतं, त्याची त्यातल्या बहुतेकींना खूप पूर्वीपासून असूया वाटत होती; अर्थात माझ्यासारखीच गत होण्यासारखं जिने काही केलेलं नाही अशी त्यांच्यातली जवळपास एकही जरी नसली, आणि केव्हा ना केव्हातरी त्यांतली प्रत्येकजण तशाच अवस्थेला येण्याची दाट शक्यता असली, तरीदेखील त्यांनी वरकरणी जी कीव दाखविली, तिच्यामध्ये माझी नाचक्की करून मला टाकून दिल्याबद्दल त्यांना वाटणारा सुप्त आनंद आणि माझं याहून जास्त नुकसान झालं नाही याबद्दलची सुप्त नाराजी, अशा दोन्ही गोष्टी सहज वाचता येत होत्या. माणसाचं हृदय असं किडलेलं का असावं याला काही उत्तर नाही, आणि त्या बायका ज्या सामाजिक स्तरातून आलेल्या होत्या, त्यापुरती ही वृत्ती मर्यादित नाही.

पण आता स्वत:चं काय करावं याबद्दल निश्चित काही ठरवण्याची वेळ जेव्हा येऊन ठेपली, आणि बस्तान कुठे हलवावं याचा मी विचार करीत होते, तेव्हा मला भेटायला येणाऱ्या बायकांपैकी एकीने माझी जिच्याशी ओळख करून दिलेली होती अशी मिसेस कोल नावाची एक जपून वागणंबोलणं असणारी मध्यम वयाची बाई माझ्या परिस्थितीबद्दल ऐकून मला भेटायला आली, तिने मला आपला मदतीचा हात व प्रांजळ सल्ला देऊ केला, आणि माझ्या वर्तुळातल्या बायकांपैकी मला ती त्यातल्यात्यात जास्त जवळची वाटत असल्यामुळे तिचा प्रस्ताव मी विशेष कान देऊन ऐकला. आणि सारं काही झाल्यानंतर शेवटी असं म्हणता येईल, की अख्ख्या लंडनमध्ये, यापेक्षा चुकीच्या किंवा यापेक्षा चांगल्या हाती स्वत:ला सोपवून देणं मला शक्यच झालं नसतं; चुकीच्या अशासाठी की ती एक आतिथ्यभवन चालवीत असल्यामुळे तिच्या गिऱ्हाईकांच्या लहरीखातर शरीरसुखाच्या प्रांतात कुठेकुठे जाण्याचा ती मला सल्ला देईल याला काही कमाल मर्यादा नव्हती; वासनाशमनाची किंवा बेबंद स्वैराचाराची देखील अशी काही कंत्राटं अस्तित्वात नव्हती की जी पुढे दामटताना तिला हर्षवायू होत नसे; आणि चांगल्या अशासाठी की लंडनच्या लुच्च्या बाजूचा तिच्याइतका दांडगा अनुभव कुणालाच नसल्यामुळे, ह्या धंद्यात संभवणाऱ्या मोठमोठ्या धोक्यांबद्दल मला सल्ला देऊन सावध करण्याकरिता याहून लायक व्यक्ती कुणी मिळाली नसती. आणि त्याखेरीज, हा धंदा सांभाळणाऱ्या बायांत क्वचितच आढळणारा गुण म्हणजे, झटून काम करून व इतरांच्या उपयोगी पडून, आरामात जगता येईल इतपत नफा मिळवण्यावर ती समाधानी असे; इतरांसारखी हावरी, ओरबाडून घेण्याची वृत्ती तिच्यात नव्हती.

खरं तर ती चांगल्या घरात जन्मलेली व वाढलेली बाई होती, पण असेच काही अनपेक्षित प्रसंग एकामागून एक येत गेल्याने तिला हा मार्ग पत्करावा लागला होता, आणि काही प्रमाणात गरज म्हणून व काही प्रमाणात आवड म्हणून ती त्याला धरून चाललेली होती; केवळ व्यवसायातली उलाढाल भराभर वाढावी यातच मजा वाटून त्या दिशेने प्रयत्न करणारी इतकी उत्साही बाई दुसरी कुणी मिळाली नसती, आणि त्यातल्या कोपऱ्याकंगोऱ्यांची व अंतस्थ भानगडींची तिच्याइतकी पक्की समजही दुसऱ्या कुणाला नव्हती; परिणामी ती आपल्या व्यवसायाच्या शिखरावर विसावलेली होती, आणि फक्त खास ग्राहकांशीच व्यवहार करीत असे: त्यांच्या मागण्या पूर्ण व्हाव्यात याकरिता ती अनेक स्त्रिया सतत तैनातीवर ठेवीत असे; आणि तिच्या शिकवणीतून व तिच्या मार्गदर्शनाखाली त्यांतल्या ज्या पुढे जगात नाव काढतील, त्यांना ती 'माझ्या मुली' असंच म्हणत असे.

अशा ज्या उपयुक्त महिलेवर मी आता माझा भार सोपवला होता, तिची इच्छा ही होती की सदर

प्रकरणी आपण फार गुंतलेल्या आहोत असं डोळ्यावर येऊ नये (मिस्टर एच– आणि ती यांच्यातल्या काही औपचारिकतेचा इथे प्रश्न होता); त्यामुळे मी तिथून बाहेर पडणार होते त्या दिवशी तिने एका ओळखीच्या बाईला माझ्याकडे पाठवलं; आणि कव्हेंट गार्डनमधल्या आर– स्ट्रीटवरच्या तिच्या स्वत:च्या घरी मला राहण्यासाठी सोय नसल्यामुळे, त्याच्याच शेजारी एक झाडू तयार करणारा व्यावसायिक जागा भाड्याने देत असे, तिथे ती मला घेऊन गेली: ह्या घरात परंपरेने एकामागून एक अनेक वेश्या राहिलेल्या असल्यामुळे घरमालकाला त्यांच्या रीतीभातींची सवय झालेली होती; आणि जोपर्यंत भाडं वेळेवर मिळतं आहे, तोपर्यंत सगळं काही बिनकटकटीचं आणि अघळपघळ होतं.

माझ्याशी संबंध तोडताना मिस्टर एच– ने दिलेल्या वचनाप्रमाणे पन्नास गिन्न्या मला रीतसर देण्यात आल्यानंतर, माझं सगळं कापडचोपड व सामानसुमान पेट्यांत बंद करण्यात आलं (याची एकूण किंमत किमान दोनेकशे पाउंड भरली असती), आणि ते एका घोडागाडीतून पुढे पाठवून देऊन मी लगेच त्यामागून गेले. त्याआधी जेव्हा मी घरमालकाची व त्याच्या कुटुंबाची औपचारिक रजा घेतली, तेव्हा निघून जाणार असल्याचं वाईट वाटावं इतके आमचे जवळिकीचे संबंध कधीच जरी नव्हते, तरीदेखील हा निघून जाण्याचा प्रसंग आहे या भावनेनेच मला रडू आलं. मिस्टर एच– पासून आता  कायमची विभक्त झाले आहे असं मी समजून चालले (आणि ते खरंही होतं), तेव्हा आभार मानणारी एक चिठ्ठी त्याच्याकरिता मी ठेवून आले. आदल्या दिवशी मी मोलकरणीला कायमची रजा दिलेली होती, याचं कारण ती मला मिस्टर एच– कडून मिळालेली होती इतकंच नव्हे; तर कदाचित तिच्याबद्दल मी त्याच्यासंबंधाने विश्वास बाळगला नाही याचा वचपा म्हणून, त्याने मला पकडण्यात तिचा काही ना काहीतरी हात आहे असा मला संशय होता.

आम्ही आता माझ्या नवीन जागी येऊन पोहोचलो; इथे पूर्वीच्या घराइतकं उंची सामानसुमान नसलं आणि वातावरण झकपक नसलं, तरीदेखील सोयी अगदी तितक्याच होत्या आणि जागा पहिल्या मजल्यावर असूनही भाडं निम्मं होतं. माझ्या पेट्या व्यवस्थित येऊन पोहोचल्या व घरात नीट चढवण्यात आल्या; आता तिथे माझी शेजारीण व मास्तरीण असलेली मिसेस कोल माझं स्वागत करायला घरमालकासह हजर झालेली होती; त्याच्यासमोर माझं पुष्कळ कौतुक करण्यावर तिचा कटाक्ष होता, आणि हिच्याकडून भाडं अगदी वेळच्यावेळी मिळत जायला असलेली कारणं स्पष्टच दिसताहेत असंही ती म्हणाली: ह्या एका शिफारसीच्या मानाने मला चिकटवलेल्या इतर महान सद्गुणांचं वजन निम्मंदेखील भरलं नसतं.

आता माझ्या स्वत:च्या घरात माझं बस्तान बसलेलं होतं, मी काय करावं हे माझ्यावर सोपवलेलं होतं, आणि लंडनमध्ये जे जे काही घडेल त्या प्रवाहात माझ्या वकूबानुसार तरण्यासाठी किंवा बुडण्यासाठी मला सुटं सोडून देण्यात आलेलं होतं; तेव्हा याचे परिणाम काय झाले, आणि नवा व्यवसाय करीत असताना माझ्या आयुष्यात कोणकोणत्या साहसी घटना घडल्या, हे आता मी पुढच्या पत्रात लिहित्ये; कारण ह्या पत्राला पूर्णविराम देण्याची वेळ केव्हाच होऊन गेलेली आहे.

आपली सदैव स्नेहांकित,

इत्यादि इत्यादि इत्यादि ...

❊ ❊

# पत्र दुसरे

## भाग सहावा

मदाम,

माझ्या आत्मवृत्ताचा पुढला भाग तुम्हाला पाठवण्यात जर माझ्याकडून दिरंगाई झाली असेल, तर त्यामागचं कारण इतकंच की मला किंचित उसंत हवीशी वाटू लागली होती; आणि ती घेत असतानाही मी थोडीफार आशा अशी बाळगून होते, की पुढे काय झालं हे सांगण्याची मला गळ घालण्याऐवजी, माझ्या आत्मप्रतिष्ठेला इतक्या ठेचा खायला लावणारा हा कबुलीजबाब चालू ठेवण्याच्या कामातून तुम्ही मला सूट द्याल.

मी असंच समजून चालले होते की घटनांचा आणि वर्णनांचा जो एक तोचतोचपणा अशा तऱ्हेच्या विषयात न टाळता येण्यासारखा असतो, त्याचं पर्यवसान म्हणून तुम्ही विटला-वैतागला असाल; कारण वेगवेगळ्या प्रसंगांमध्ये रचनांचं व कार्यपद्धतींचं वैविध्य जे काही असायचं ते असलं, तरीदेखील निसर्गपरत्वे त्याचा पाया किंवा मूलाधार सदोदित तोच असल्यामुळे, त्याच त्या प्रतिमा, त्याच त्या उपमा आणि तेच ते भाषेचे वळसे यांतून सुटका होण्यासारखी नसते; आणि यामुळे जो उबग येऊ लागतो, त्यात भर म्हणून आणखी एक गैरसोय होते ती अशी की सुखाकडे नेणाऱ्या कृतींवरच विसंबून असलेली हकिकत सांगितली जात असताना, त्यांच्या साहचर्याने आपसूकच येणाऱ्या व नित्याच्याच होऊन गेलेल्या, 'बेहोशी, बेभानी, हर्षोन्माद, सुखोपभोग, सुखातिरेक' इत्यादि भावसूचक शब्दांना नाईलाजाने पुन्हापुन्हा हजेरी लावावी लागते; परिणामी ते बसकण मारतात, आणि त्यांच्यातला मूळचा अर्थवाहीपणा बहुतेक सगळा खलास होऊन जातो. म्हणूनच या बाबतीत माझी अपरिहार्यपणे लंगडी असलेली बाजू आपण सांभाळून घ्याल असा भरवसा मी आपल्या सुज्ञपणावर ठेवत्ये; आणि त्याचप्रमाणे, जिथेजिथे माझी वर्णनं मरगळतील किंवा कुचकामी ठरतील, तिथेतिथे त्यांत गुणात्मक भर घालून ती सावरून घेण्याचं गोड काम आपल्या कल्पनाशक्तीला व संवेदनाशक्तीला निभावून नेता येईल असाच त्यांच्यावरही ठेवत्ये. मी काढलेली चित्रं तत्काळ आपल्या डोळ्यांसमोर घेऊन येण्याचं काम यांपैकी पहिलीचं असेल; आणि त्या चित्रांतले रंग जर फिकुटले असतील किंवा वारंवार हाताळल्याने पुसट झाले असतील, तर त्यांच्यात तजेला आणण्याचं काम दुसरीचं असेल.

ह्याच विषयाच्या अनुषंगाने पाहता, एका बाजूला किळस येईल अशी घाणेरडी ग्राम्य भाषा, तर दुसऱ्या बाजूला हास्यास्पद वाटणाऱ्या भित्रट उपमा व कृत्रिम आढेवेढे घेत राहणारे शब्दप्रयोग, अशा दोहोंतून वाट काढून अभिरुचीला मान्य होईल असा सुवर्णमध्य शोधून त्याच पट्टीत बराच वेळ गात राहणं सोपं नाही; ह्या आशयाचा मला प्रोत्साहन देण्याच्या हेतूने आपण लिहिलेला मजकूर मला तरी इतका शहाणा व समंजस वाटतो, की पूर्णपणे माझ्याच खर्चातून भागविल्या जाणाऱ्या आपल्या उत्कंठेपुढे मान तुकवली हे मी सर्वसाधारणपणे ठीकच केलं, असा एक दिलासा सध्या माझ्यापाशी आहे.

मागचं पत्र जिथे थांबवलं तिथूनच सुरुवात करून पुढे सांगत्ये. माझ्या नव्या घरी जेव्हा मी येऊन पोहोचले तेव्हा अंधार पडून गेलेला होता; सामान मांडायला व चीजवस्तू नीट ठेवायला मला मदत केल्यानंतर मिसेस कोल पूर्ण संध्याकाळभर माझ्याबरोबरच राहिली; आम्ही एकत्र जेवलो; आणि माझ्या व्यवसायातल्या ज्या नव्या पायरीवर मी उभी होते, सुखाची केवळ एकांतात आराधना करण्याच्या भूमिकेतून बाहेर पडून आता सामुदायिक आराधनेला लागणार होते, एक जनहिताचं साधन बनणार होते, आणि त्या अनुषंगाने स्वत:च्या आनंदासाठी, आर्थिक लभ्यांशासाठी (किंवा दोहोंसाठी) जर माझं शरीर उपयोगात आणायचं तर जी पूर्वतयारी आवश्यक होती, तिच्यासंबंधाने तिने मला अतिशय मौलिक सल्ला दिला आणि युक्तीच्या चार गोष्टी सांगितल्या.

पण यानंतर ती म्हणाली, की एका अर्थाने लंडनमध्ये तुझा तोंडवळा नवा असल्यामुळे तशा प्रकारची उचित संधी पहिल्यांदा जेव्हा मिळेल, तेव्हा स्वत:ला कुमारिका म्हणून खपवावं असा ह्या व्यवसायात एक पायंडा पडून गेलेला आहे; पण हे होईपर्यंत मध्यंतरीच्या काळात तुला जे आवडीने करावंसं वाटेल त्यापासून फटकून राहायला हवं असं मात्र मुळीच नाही, उलट अशा बाबतींत वेळ दवडू नका असं मी मुलींना नेहमी निक्षून सांगत असत्ये. अर्थात अशी योग्य व्यक्ती शोधून काढण्यासाठी तोपर्यंत मी शक्य तितके प्रयत्न करीन; आणि हा नाजुक मुद्दा सांभाळून नेण्याच्या कामी जर तू माझ्यावर भिस्त ठेवून माझा सल्ला मानलास, तर एक लुटूपुटूचा आडपडदा गमावताना खरा गमावल्याचे सगळे फायदे तुला उपटायला मिळतील. प्रमाणाबाहेर नैतिक शंकाकुशंका काढण्याची प्रवृत्ती जरी त्या काळी माझ्यात नव्हती, तरीदेखील ज्या प्रस्तावाबद्दल माझ्यातल्या प्रामाणिकपणापोटी व बुद्धिमत्तेपोटी माझ्या मनात काहीशी अढी निर्माण झाली होती, त्याला कदाचित मी फार पटकन हो म्हणाले हे इथे कबूल करताना मला ओशाळं वाटतं आहे; पण माझ्या जीवनातले यच्चयावत निर्णय जिच्यावर मी पुरते सोडून दिलेले होते, तिला विरोध करण्याइतपत या अढीमध्ये जोर नव्हता.

मिसेस कोलने माझ्यावर पुरता विजय मिळवून माझा ताबा घेतलेला होता; पण ज्याचं स्पष्टीकरण देता येत नाही असा एक प्रकारचा चिवट भावबंध विशेषत: बायकाबायकांमध्ये काही वेळा जुळतो, याखेरीज त्यामागचं वेगळं कारण मला सांगता येणार नाही. तिच्या बाजूने मला तिने असं बोलून दाखविलं, की माझी एकुलती एक मुलगी तुझ्याएवढीच असताना मला कायमची सोडून गेली, तू अगदी तंतोतंत तिच्यासारखी दिसतेस, आणि त्यामुळे मला तुझ्याबद्दल पहिल्यापासूनच फार जिव्हाळा वाटू लागला होता. असेलही तसं: सुरवातीला इतपतच तोळामासा असलेलं काही ना काही निमित्त घडून अनेकदा माणसामाणसांत अशी जवळीक निर्माण होते, की परिचयामुळे व परस्परप्रेमामुळे जर तिला बळकटी मिळत गेली, तर त्यामानाने कितीतरी जास्त भक्कम पायावर प्रस्थापित झालेल्या संबंधांपेक्षा ती दीर्घकाळ टिकून राहते; पण एवढं मात्र खरं, की मिस्टर एच– कडे राहात असताना मला विणलेल्या टोप्या वगैरे विकण्यासाठी ती मधूनमधून येत असे यापलिकडे जरी आमची घसट नव्हती, तरीदेखील अंशाअंशाने मला तिने इतकं विश्वासात घेतलं की मी स्वत:ला आंधळेपणाने तिच्या हाती सोपवून दिलं; कालांतराने माझा तिच्यावर स्नेह जडला, मी तिला मान देऊ लागले, आणि आपसूकच तिचं ऐकू लागले; पण तिच्या वाट्याचं श्रेय तिला द्यायचं तर इतकं म्हणायलाच हवं, की माझ्यावर खरीखुरी माया व माझ्या हिताची काळजी, ह्या तिच्या व्यवसायात ऐकायलाही न मिळणाऱ्या गोष्टींशी विसंगत ठरेल असा कोणताही उपरा अनुभव मला तिच्या हातून कधीही आला नाही. एकमेकींपासून काही राखून ठेवायचं नाही इतकी गट्टी झाल्यानंतर त्या रात्री आम्ही निरोप घेतला; दुसऱ्या दिवशी सकाळी मिसेस कोल परत आली, आणि पहिल्यांदा मला तिच्या घरी घेऊन गेली.

इथे मला सोज्वळपणाचं, घरंदाजपणाचं व टापटिपीचं वातावरण निदान प्रथमदर्शनी तरी चोहोंबाजूंना आढळून आलं. बाहेरच्या दिवाणखान्यात, किंवा खरं तर दुकानात, तीन तरुण मुली अतिशय निमूटपणे मान खाली घालून ज्या टोप्या विणत बसलेल्या दिसत होत्या, त्यांपेक्षा जास्त किंमती वस्तूंचा बाजार या देखाव्याखाली लपलेला होता; पण देखणेपणाच्या बाबतीत त्यांच्यावर कुरघोडी करतील अशा कुणी इतरत्र मिळाल्या नसत्या. तिघींपैकी दोघी झगझगीत गोऱ्या होत्या, व त्यांतली थोरली वयाने एकोणीसच्या वर नसेल; आणि तिसरी जी अदमासे तितक्याच वयाची काळ्याभोर केसांची चविष्ट मुलगी होती, तिचे चमकदार काळे डोळे, आणि चेहरेपट्टी व शरीराचा आकार यांतला मोठा बहारदार मेळ, यांमुळे तिला आपल्या जास्त गोऱ्या सोबतिणींचा हेवा करण्याचं कसलंही कारण शिल्लक उरलेलं नव्हतं. तिघींचाही पोषाख सर्व बाजूंनी व्यवस्थित नीटनेटका असून त्यात एक डौलदार साधेपणा होता; आणि त्यामागे फारसा विचार नसावा असं जितकं वाटत असे तितका तो होता. ह्या मुलींचा तिथे एक छोटासा घरगुती कळप बनलेला होता, आणि तरुण पोरी एकदा मोकाट सुटल्या की डोक्यात

वारं जाऊन कशा वेड्यासारख्या वागतात हे लक्षात घेता, आश्चर्य वाटावं इतक्या शिस्तीत मालकीणबाईंनी तो शिकवून तयार केलेला होता. पण उमेदवारीसाठी दिलेला ठराविक काळ एकदाचा संपल्यानंतर जी मुलगी नाठाळपणे वागेल किंवा घराचे नियम पाळण्यात कुचराई करील, तिला ती पुढे ठेवून घेतच नसे. मिसेस कोलने ह्या मुली जितक्या त्यांच्या सौंदर्याकडे पाहून निवडल्या होत्या तितक्याच त्यांच्या स्वभावाकडे पाहून निवडलेल्या असल्यामुळे, स्वत:ला व त्यांनाही विशेष त्रास न होता ती त्यांच्यावर राज्य करीत असे; आणि अजाणतेपणी तिने परस्परांशी प्रेमाने वागणाऱ्यांचं जे एक छोटं कुटुंबच तयार केलेलं होतं, त्यातल्या सदस्यांना ही बाब पुरेपूर ठाऊक होती की इथे सुखसिद्धी व आर्थिक लभ्यांश यांचा दुर्मीळ असा समसमासंयोग झालेला आहे; आणि त्याचबरोबर, गरजेपोटी पांघराव्या लागणाऱ्या वरकरणी शालीनतेखालून अतोनात स्वैराचार गुप्तपणे उपभोगण्याची सोय आहे.

अशा प्रकारे तयार केलेल्या तिच्या ह्या शिष्यिणींसमोर तिने माझी नवीन राहायला आलेली मुलगी म्हणून ओळख करून दिली, आणि ती त्यांना म्हणाली की घरातलं काहीसुद्धा हिच्यापासून गुपित ठेवू नका; यानंतर लागलीच त्या गोड मुलींनी माझं भरभरून स्वागत केलं, आणि स्त्रीवर्गातल्या कुणाकडून मी कधी अपेक्षिल्या नव्हत्या अशा माझं रूप बेहद्द आवडल्याच्या खुणा मला त्यांच्या चर्येवर दिसल्या: पण असूयेला, किंवा कोण किती चांगली दिसते याविषयीच्या अहमहमिकेला, सामूहिक हिताच्या दृष्टीने तिलांजली द्यायला हवी अशी त्यांना खडी शिकवणच होती, आणि घरच्या व्यापाराकरिता उत्तम प्रतीचा माल घेऊन आलेली एक समान हक्क असलेली भागीदारीण, ह्या दृष्टीने त्या माझ्याकडे पाहात होत्या. माझ्याभोवती त्या गोळा झाल्या, त्यांनी मला सर्व बाजूंनी न्याहाळलं, आणि ह्या फुलपाखरी चमूमध्ये माझी भरती झाल्याच्या निमित्ताने लहानशी सुट्टी लागून कामाचा देखावा बाजूला ठेवण्यात आला; त्यांना आता माझी काळजी घ्यायला बजावून सांगून, त्यांच्या मिठ्या व चिवचिवाटावर मला सोडून देऊन, घरातलं दैनंदिन कामकाज पाहायला मिसेस कोल निघून गेली.

आम्ही सगळ्या मुलीमुलीच होतो, त्याही एकाच व्यवसायातल्या व एकसारखा विचार करणाऱ्या; त्यामुळे काही मिनिटांतच माझ्यात्यांच्यात इतकी मोकळीक व जवळीक निर्माण झाली की जणू काही आमची कित्येक वर्षांची ओळख असावी. त्यांनी माझा ताबा घेऊन मला घर दाखवलं, आणि साऱ्या छानछोकीच्या वस्तू व सोयीसुविधा असलेल्या त्यांच्या खोल्या दाखवल्या; याखेरीज विशेष म्हणजे घरात एक प्रशस्त दिवाणखाना होता, आणि तिथे अनेकदा निवडक खुशालचेंडूंचा एक कंपू सुखविलासाकरिता एकत्र जमत असे; मुली आपापल्या वाट्याच्या तरुणांबरोबर खातपीत आणि उच्छृंखलपणे वागून मनसोक्त चावटपणा करीत; बुजरेपणा, लाजाळूपणा किंवा असूया अशा गोष्टींची

पत्रास ठेवायची नाही असा तिथला कायमस्वरूपी दंडक होता, आणि यामागे त्यांच्या संस्थेचा सिद्धान्त असा होता, की तो पाळल्यामुळे सुखामध्ये भावनिक अंगाने जी काही कमतरता पडत असेल, ती इंद्रियांच्या चैनी पुरवल्यामुळे आणि वैविध्यातून येणाऱ्या धारदारपणामुळे शारीरिक अंगाने पुरेपूर भरून निघते. ह्या भूमिगत संस्थेचे संस्थापक व सध्याचे आश्रयदाते रंगात आलेले असताना असं म्हणत, की सुखभोगांवर बेगड चढलेलं नाही, आणि त्यांच्या मुळातल्या निरागस प्रकृतीवर लाजिरवाणेपणाचा व नीतिहीनतेचा शिक्का मारला जाण्याचा घोर अन्याय अजून झालेला नाही, असं एक सुवर्णयुग पूर्वी होतं; आणि आम्ही त्याचं पुनरुज्जीवन करणारे आहोत.

संध्याकाळ होताच दुकानाचा बनाव गुंडाळला जाऊन अकादमी उघडत असे, दिखाऊ शालीनतेचा मुखवटा चेहऱ्यावरून उतरवला जाई, आणि प्रत्येक मुलगी आपापल्या पुरुषाकडे सुख किंवा पैसे मिळवण्याकरिता सोपवली जाई; पण वाटेल त्या पुरुषाला आत शिरायला मुभा होती असं नव्हे, तर ज्यांच्या वर्तनाबद्दल व गुप्तता बाळगण्याच्या पात्रतेबद्दल मिसेस कोलने पूर्वीच शहानिशा करून घेतलेली असे, त्यांनाच फक्त ती होती. थोडक्यात असं, की लंडनमधलं हे सर्वांत निर्धोक, सर्वांत उच्चभ्रू, आणि त्याचबरोबर वाटेल ते मिळवून देणारं, अशा प्रकारचं वेश्यागार होतं: कमालीच्या बेबंद सुखभोगांवर मर्यादाशीलतेचं अतिक्रमण होणार नाही अशा तऱ्हेने इथला सारा व्यवहार चालविला जात असे; आणि यांत मग्न असतानादेखील, एका बाजूला अभिरुचीचं चोखंदळ भान व दुसऱ्या बाजूला विचकट वासनांचा मोकाट नग्नोत्सव, या दोन ध्रुवांचा यशस्वी मेळ घालण्याची करामत त्या घरचं वळण पक्कं ठाऊक असलेल्या अत्यंत मातब्बर विभूतींनाही मुळीच सहजसाध्य वाटली नव्हती.

माझ्या नवपरिचितांनी केलेल्या सूचना व कौतुके ऐकण्यात सकाळ खर्ची पडल्यानंतर आमच्या दुपारच्या जेवणाची वेळ जेव्हा झाली, तेव्हा ह्या चमूची अध्यक्षा ही भूमिका मिसेस कोल बजावीत असताना, साऱ्या मुलींच्या मनात तिने आपल्याविषयी किती जिव्हाळा व आदर निर्माण केलेला आहे, हे पाहून तिच्या बोलण्यातल्या व व्यवस्थापनातल्या चातुर्याची पहिली चुणूक मला दिसली. अवघडलेपणा, इतरांपासून अंतर राखून राहणं, नखरे दाखविणं, किरकोळ चढाओढी करणं असला काही प्रकार तिथे औषधालाही नव्हता, तर याउलट सारं वातावरण मोकळंचाकळं, हलकंफुलकं व आनंदी होतं. जेवणानंतर मिसेस कोल मला म्हणाली (आणि मुलीही दुजोरा देत होत्याच), की भगिनीसमाजात झालेला तुझा प्रवेश साजरा करण्यासाठी आज रात्री औपचारिक समारंभ ठरवलेला आहे; पुढे विशिष्ट प्रसंगी अनुरूप असं भोटम गिऱ्हाईक मिळाल्यानंतर तुझ्या काल्पनिक कौमार्याचं

वाढप होणार आहे हे जरी खरं असलं, तरीही आज तुझा दीक्षासमारंभ व्हायचा आहे; आणि आमची अशी पक्की खात्री आहे की तो तुला आवडला नाही असं होणारच नाही. एवीतेवी आता मी दर्यावर आलेलीच होते, आणि त्यातसुद्धा माझ्या नव्या मैत्रिणींची मला भुरळ पडलेली असल्यामुळे त्यांनी सुचविलेल्या कुठल्याही प्रस्तावाच्या बाजूने आधीच इतकी पक्षपाती होते, की हो म्हणण्याआधी बिचकण्याचाही प्रश्न नव्हता; तेव्हा लागलीच, 'तुम्ही म्हणाल तसं करीन' असं मी म्हणताच, माझ्या समजूतदारपणावर साऱ्याजणी खूष होऊन त्यांच्याकडून मला नव्याने कौतुकाची चुंबने मिळाली. मी 'किती गोड मुलगी आहे', मी 'किती समंजस आहे', 'बरीक इतकादेखील ताठा नाही हो' आणि 'या घराचं नाव ती मोठं करील', इत्यादि इत्यादि उद्गार काढण्यात आले.

हा मुद्दा स्थिरस्थावर झाल्यानंतर, माझ्याशी बोलून पुढील व्यवस्था ठरविण्याचं काम मिसेस कोलवर सोपवून साऱ्या मुली निघून गेल्या: ती मला म्हणाली, की आजच संध्याकाळी माझ्या अतिशय जवळच्या चार स्नेह्यांशी मी तुझी ओळख करून देणार आहे, आणि घरच्या रीतीनुसार तुझ्या पहिल्या सुखसोहळ्यातला साथीदार म्हणून त्यातल्या एकाला मी मुक्रर केलेलं आहे; माझं मन निश्चिंत व्हावं याकरिता ती पुढे म्हणाली की चौघेहीजण तरुण आहेत, देखणे आहेत, आणि खोट काढायला त्यांच्यात कुठेच जागा नाही; सुखभोगातल्या आवडीनिवडींच्या बाबतीत ते समानशीलव्यसनी असल्यामुळे त्यांचं सख्य जुळलेलं असून आपल्या घराचा ते मुख्य आधार आहेत, त्यांच्या आवडीचं करणाऱ्या व त्यांचे कोड पुरवणाऱ्या मुलींना ते सढळ हाताने बक्षिसी देतात, तेव्हा वास्तविक ह्या छोट्याशा रंगमहालाचे ते स्थापनाकर्ते आणि आश्रयदाते आहेत असंच म्हणायला हवं. अर्थात ऋतुमानाप्रमाणे प्रसंगानुरूप माझ्याकडे इतर ग्राहक नसतात असं नाही, पण त्या इतरांचे मी इतके कशिदाकाम करून नखरे सांभाळीत नाही; आता दाखलाच द्यायचा, तर ह्या चौघांसमोर तुला कुमारिका म्हणून खपवण्याचा प्रयत्न मी कधी करायची नाही, कारण एकतर ते लंडनमध्ये इतक्या ठिकाणचं पाणी प्यालेले आहेत की असलं आमिष गिळण्याइतके दुधखुळे नव्हेत, आणि दुसरं म्हणजे त्यांनी मला अतिशय उदारमनाने मदत केलेली असल्यामुळे असा विचारही करणं हलकटपणाचं ठरेल.

आगामी प्रसंगातून आपल्याला सुख मिळणार आहे (निदान अशीच माझी धारणा होती) ह्या पूर्वसूचनेमुळे माझं हृदय धडधडून भावना उचंबळून आलेल्या असतानाही, मी अगदी जरुरीपुरते आढेवेढे घेऊन, खरंतर मला नको बाई, पण माझ्या मालकिणीच्या आग्रहावरून हे मी करते आहे, असं चिमूटभर श्रेय घेण्याइतपत स्त्रीत्व दाखवलं; आणि हीच भूमिका पुढे चालवून तिला म्हटलं की पहिल्यांदाच त्यांच्यासमोर येणार आहे, तेव्हा त्यांचं मत बरं व्हावं म्हणून निदान घरी जाऊन चांगले कपडे तरी घालून येत्ये. पण याविरुद्ध मत देत मिसेस कोल मला म्हणाली, की काही मूर्ख मुली उंची

कपडे व दागिने आपल्या सौंदर्याला खुलवण्याऐवजी त्याला गुदमरून टाकून त्याचा चुथडा करण्यासाठी वापरतात, पण तसल्या झगमगाटाला हुरळून जाणाऱ्यांच्या तुलनेने आज तुला पाहायला येणाऱ्या पुरुषांची अभिरुची फार वरची आहे; ह्या मुरलेल्या विलासरसिकांची जाण अशी पक्की असते की त्यांच्यासमोर केवळ नैसर्गिक सौंदर्याचीच मात्रा काय ती चालू शकते, आणि असल्या मुलींचा कडेलोट तिटकारा केल्याखेरीज ते राहात नाहीत; त्यामुळे अगदी केव्हाही, एखाद्या ध्रुवट, फिक्कट, रंगकाम केलेल्या डचेसला तिच्या नशिबावर सोडून देऊन ते रसरशीत, लालबुंद, टणटणीत मांसाच्या गावरान भवानीमागेच जातील; निसर्गाने तुला इतकं भरभरून दिलेलं आहे की कृत्रिम कलाकुसरीच्या उपकारांखाली राहायचं तुला काही कारणच नाही; आणि शेवटी तिचा निर्वाळा असा पडला, की प्रस्तुत प्रसंगी निर्वस्त्र होण्याइतकं उत्तम वस्त्र नाही.

ह्या विषयातली माझ्या मालकीणबाईंची जाण माझ्या मते फार उत्तम असल्यामुळे माझं हृदयपरिवर्तन मी फार सहजी होऊ दिलं: यावर ती पुढे म्हणाली, की सुखाचा शोध घेणाऱ्यांमध्ये अनेक वैचित्र्यपूर्ण आवडीनिवडी आढळतात, काहीजण त्यांना कलेची अधिक उन्नत रूपं समजतात, तर इतरजण कलाभ्रष्टता समजतात; इतरांना आनंद देऊन जिला स्वत:चा लाभ करून घ्यायचा आहे अशा साध्यासुध्या मुलीचं काम ह्या मतमतांतरात उजवं-डावं ठरवणं हे नसून सांगितलेलं करणं हे आहे, तेव्हा त्या विशिष्ट रुचींच्या आड न येता आज्ञाधारकपणे निमूट वागणं हाच मार्ग श्रेयस्कर आहे. अत्यंत काकुळतीच्या सुरात पुढे बराच वेळ ह्या अर्थाची शिकवण ती माझ्यावर बिंबवत राहिली. अशा उद्‍बोधक धड्यांतून मी शहाणी होत असतानाच चहा आला, आणि मुली परत येऊन आमच्यांत मिसळल्या.

बराच वेळ इकडची तिकडची बडबड, थट्टामस्करी व चहाटळपणा झाल्यानंतर त्यांतली एकजण म्हणाली, की सगळे जमायला अजून पुष्कळ अवकाश आहे; तेव्हा प्रत्येक मुलीने आपापल्या आयुष्यक्रमामध्ये ज्या मोक्याच्या क्षणी कौमार्य देऊन स्त्रीत्व घेतलं त्याचा वृत्तान्त सांगून सर्वांचं रंजन करावं. हा प्रस्ताव सार्वत्रिक पसंतीस उतरला, पण मिसेस कोलने अशी अट मांडली की मला माझ्या वयामुळे व फॅनीला तिच्या नामधारी कौमार्यामुळे, निदान तिचा समारंभपूर्वक गृहप्रवेश होईपर्यंत तरी यातून सूट मिळावी. याप्रमाणे मी सुटले, आणि हा प्रस्ताव पुढे आणणारीने आपली कथा सांगायला सुरुवात करावी असं ठरलं.

एमिली असं तिचं नाव होतं; ती अतिशय गोरीपान होती, आणि गरगरीत भरगच्च असलेले तिचे अवयव, स्त्रीसौंदर्याबद्दल ज्यांची आवडनिवड फार सूक्ष्म आहे अशांना पसंत असणाऱ्या नाजुक

शेलाटेपणाच्या विरुद्ध प्रकृतीचे असल्यामुळे काहीसे अधिकच पुष्टावलेले म्हणता येतील; तिच्या निळ्या डोळ्यांतून अवर्णनीय गोडवा पाझरत असे, आणि तिची जिवणी व एकसारख्या एक पांढऱ्याशुभ्र दातांच्या ओळींवर आवरण घालणारी ओठांची जोडी, इतक्या लोभस वस्तू इतरत्र मिळायला पंचाईत पडली असती.

ती म्हणाली: "ज्या प्रस्तावाला तुम्ही अनुमोदन दिलेलं आहे, त्याचा पाठपुरावा करीत असताना माझ्यावर आढ्यताखोरीचा आरोप शाबीत होऊ शकेल, इतकी मोठी माझ्या जन्मघराण्याची प्रतिष्ठा नाही, आणि माझ्या आयुष्यातली ती विशिष्ट घटनाही नाही. लंडनपासून चाळीसेक मैलावरच्या एका खेड्यात माझे आईवडिल शेतकरी होते, आणि कुणास ठाऊक अजूनही असतील; मला डावलून फक्त आपल्या मुलावरच माया करण्याचा जो क्रूरपणा त्यांनी माझ्याशी केला, त्यामुळे त्यांच्या घरातून पळून जाऊन ह्या भल्याथोरल्या जगावर स्वत:ला भिरकावून द्यावं असं किमान हजारदा तरी मी मनाशी घोकलं होतं; पण अचानक एक घटना अशी घडली की वयाच्या पंधराव्या वर्षीच ही जीवघेणी उडी मला घ्यावी लागली. त्यांचा जीव की प्राण असलेला एक चिनी मातीचा वाडगा जेव्हा मी फोडला, तेव्हा दयामाया न दाखवता मारझोड एवढं तरी त्यांच्या हस्ते मला मिळण्याची निश्चिती असल्यामुळे, कोवळ्या वयातल्या अविचारीपणापोटी मी घर सोडलं, आणि काय व्हायचं ते होवो असं म्हणून लंडनचा रस्ता धरला. मी गेल्याचं दु:ख त्यांना कितपत झालं हे मला माहित नाही, कारण या क्षणापर्यंत त्यांच्याबद्दल एक अक्षरही माझ्या कानी पडलेलं नाही.

"मी बाळगून असलेली यच्चयावत मालमत्ता म्हणजे माझ्या आज्जीकडून आलेली क्रॉमवेलच्या काळातली सोन्याची दोन जाडसर नाणी, काही फुटकळ शिलिंग, चांदीचे शू-बकल्स आणि एक चांदीचं अंगुस्तान. एवढी बेगमी, आणि अंगावर होते तेवढेच रोजचे कपडे, अशा अवस्थेत माझ्या मागून येणाऱ्या प्रत्येक आवाजाला किंवा चाहुलीला घाबरत मी घाईघाईने जात राहिले; आणि अतोनात दमून जाऊन अंगात त्राण न उरल्यामुळे जेव्हा थांबले, त्याआधी किमान डझनभर मैल तरी चालले असणार हे नक्की. शेवटी मी एका शेताच्या कुंपणाजवळ एका लाकडी शिडीवर बसले व धाय मोकलून रडू लागले; पळून आल्यामुळे अजूनही मी घाबरलेलीच होते, आणि आईबापांची माया नसलेल्या आईबापांकडे परत जाऊन त्यांना तोंड देण्याची मला मरणापेक्षाही धास्ती वाटत होती. ह्या थोड्याशा विश्रांतीने हुशारून जाऊन, रडून घेतल्यामुळे मोकळं वाटून मी पुढे चालले होते; तेव्हा लंडनमध्ये काही नशीब फळफळतं का हे बघायला चाललेला, आणि माझ्याप्रमाणेच त्याच्या मित्रांना गुंगारा देऊन आलेला एक धट्टाकट्टा खेडवळ पोरगा माझ्यामागून पुढे गेला. जेमतेम सतरा वर्षांचा,

सळसळत्या रक्ताचा, बांधेसूद असा तो होता, फिकट सोनेरी रंगाचे त्याचे केस विस्कटलेले होते, कानांवर येणारी लहानशी टोपी होती, शिपाईगडी घालतात तसला कोट अंगात होता, लोकरीचे पायमोजे होते; थोडक्यात औतावर मस्त शोभून दिसेल असला तो पोरगा होता. शीळ घालत तो माझ्यामागून आलेला मला दिसला, आणि काठीला बांधलेलं बोचकं एवढाच काय तो प्रवासाचा सरंजाम त्याच्यापाशी होता. काही वेळ आम्ही न बोलता एकमेकांच्या बाजूने चालत राहिलो; थोड्या वेळानंतर ओळख करून घेतली, आणि प्रवास संपेपर्यंत एकमेकांची सोबत करायची असं ठरवलं. त्याचा काय बेत किंवा हेतू होता हे मला माहित नाही; पण माझ्या मनात काही नव्हतं हे मी शपथ घेऊन सांगत्ये.

"जसजशी रात्र होऊ लागली, तसं काही वसतीचं ठिकाण किंवा आसरा दिसतो का हे आता आम्हाला पाहावं लागणार होतं; आणि ह्या अडचणीत आणखी भर पडली ती म्हणजे कुणी विचारलं तर आम्ही एकमेकांचे कोण आहोत असं सांगायचं. थोडा वेळ डोकं खाजवून ह्या तरुणाने मांडलेला प्रस्ताव मला बेहद्द पसंत पडला, आणि तो काय असेल तर आपण नवरा-बायको आहोत असं सांगायचं: याच्या संभाव्य परिणामांवर मी स्वप्नातही विचार केला नव्हता. ह्या नामी युक्तीवर एकमत झाल्यानंतर वाटेत आम्हाला पायी चालणाऱ्या वाटसरूंसाठी उभारलेली एक खोपटवजा खाणावळ दिसली; दाराशी एक कुरूप चक्रम म्हातारी उभी होती, आणि आम्ही बाजूने खुरडत निघालेलो असताना ती म्हणाली की इथे राहा. काहीतरी आसरा आहे याचा आनंद होऊन आम्ही आत गेलो, माझ्या सहप्रवाशाने सगळं आपल्या अंगावर घेऊन घरात असेल ते मागवलं, आणि आम्ही नवराबायको या नात्याने एकत्र जेवलो; वास्तविक आमची वयं आणि अवतार पाहता ह्या सोंगावर ज्याचा विश्वास बसला असता त्याचा कशावरही बसला असता.

"पण जेव्हा झोपायची वेळ झाली, तेव्हा पहिल्यांदा सांगितलेल्या कथेत फेरफार करण्याचं धाडस आम्हा दोघांतही नव्हतं; आमच्या नात्याविषयी आम्ही जी थाप मारलेली होती त्यानंतर आता एकत्र झोपणं साहजिक होतं, आणि ह्यातून कसं सुटायचं याबद्दल तो पोरगाही माझ्याइतकाच बावचळलेला असावा ही फारच मजेची गोष्ट होती. आम्ही दुग्ध्यात असताना मालकीणबाईने मेणबत्ती उचलली, आणि एका लांबलचक सोप्यामधून उजेड पाडत जात, अगदी टोकाशी घरापासून काहीशा अलग असलेल्या एका खोलीत आम्हाला ती घेऊन गेली. एका शब्दानेही विरोध न करता आम्ही स्वत:ला निमूटपणे इथवर आणू दिलं; आणि एका अतिशय भिकार खोलीत, बेतासबात पलंगावर, जणू यामध्ये चर्चा करण्यासारखं काहीच नसावं, अशा तऱ्हेने एकमेकांबरोबर रात्र घालवण्याची पाळी आमच्यावर

आली. मी तर इतकी अतोनात निरागस होते, की तरुण माणसाबरोबर झोपण्यात मला आमच्यातल्या एखाद्या गवळणीबरोबर झोपण्यापेक्षा जास्त धोका वाटत नव्हता; आणि अशी सुसंधी गवसल्यामुळे काही वेगळं डोक्यात येण्याच्या आधी कदाचित या पोराच्या भावनादेखील पूर्ण निरागसच होत्या. आम्हा दोघांपैकी कोणी कपडे उतरवण्याआधी त्याने मेणबत्ती विझवून टाकली, आणि चावऱ्या थंडीमुळे मला बिछान्यात जाणं भागच पडलं: तेव्हा माझे कपडे उतरवून मी चादरीखाली शिरले, तर तिथे हे कोकरू आधीच गुरफटून पडलेलं होतं; पण त्याच्या उबदार शरीराच्या स्पर्शाने भीतीपेक्षा मला सुख अधिक वाटलं.

"परिस्थितीच्या नवेपणाने मी इतकी कमालीची भांबावून गेले होते की झोप येणं अवघड होतं; पण काही आपत्ती आहे असा विचारही मला शिवलेला नव्हता. परंतु निसर्गाच्या उर्मी केवढ्या प्रबळ असतात! आणि त्यांच्यात चलनवलन यायला किती लहानसं कारण पुरतं! ह्या पोराने त्याचा हात माझ्या अंगाखाली सरकवून, जणू मला व त्यालाही ऊब देण्याकरिता हलकेच मला त्याच्याजवळ ओढलं; आणि आमचे वक्ष एकमेकांना स्पर्श करताच जी उष्णता मला जाणवली, तिचा परिणाम म्हणून, मला पूर्वी कधीही न जाणवलेली व जिचं रहस्य तेव्हादेखील मला अज्ञात होतं अशी एक वेगळी उष्णता प्रज्वलित झाली. माझा कयास असा की माझ्या मऊ प्रतिक्रियेमुळे त्याची भीड चेपली असावी; आता त्याने माझं चुंबन घेण्याचा प्रयत्न केला, आणि नकळत मी त्याची परतफेड जरी केली तरी याचे होणारे परिणाम मला ठाऊक नव्हते; कारण ह्या प्रोत्साहनानंतर त्याने आपला हात माझ्या स्तनांपासून सरकवत खाली आणून, ज्या भागात संवेदना अतिशय तरलतीव्र असते तिथपर्यंत पोहोचवल्याचं माझ्या लक्षात आलं ते त्याचा स्पर्श होताक्षणीच भडका उडाल्यामुळे, आणि याचबरोबर एका विचित्रपणे चाळवणाऱ्या उष्म्याने त्या ठिकाणी भगभग होऊ लागल्यामुळे: तिथे हात फिरवून त्याने स्वत:ला व मलाही सुख दिलं, पण यानंतर थोडी अधिकच धिटाई करून मला दुखावताच मी कळवळले.

"आता त्याने माझा हात हातात घेऊन, माझी फारशी अनिच्छा नसताना, चिकटून बसलेल्या त्याच्या मांड्यांमधल्या फटीत नेला तेव्हा त्या अतिशय गरम होत्या; तो तिथे खुपसून ठेवून त्याने दाबून धरला, आणि मग अंशाअंशाने वर नेऊन, स्त्रीकडे नसणाऱ्या पण पुरुषाकडे असणाऱ्या त्या कुर्रेबाज वस्तूला मला स्पर्श करायला लावला. ह्या नव्या प्रकाराने धास्तावून जाऊन मी हात मागे ओढला: पण तरीदेखील, त्या अपरिचित सुखसंवेदनांच्या रेट्यामुळे नकळतच माझ्या तोंडून अधिरा प्रश्न निघाला की हे कशासाठी असतं? तो म्हणाला – तू हो म्हणत असशील तर तुला दाखवीन; आणि मग माझ्या उत्तराची वाट न पाहता, आणि माझी ज्यांना मुळीच हरकत नव्हती अशा चुंबनांनी माझं तोंड

बंद करून हे उत्तर बाहेरच येऊ नये अशी व्यवस्था केल्यानंतर, तो माझ्यावर चढला; माझ्या मांड्यांमध्ये त्याचा एक पाय घालून, स्वत:करिता रस्ता करण्यासाठी त्या फाकवून, त्याला हवं तसं त्याने मला जखडून टाकलं; हे सारं होत असताना परिस्थितीचं माझं नेहमीचं भान इतकं सुटलेलं होतं, आणि एका नव्याच जाणीवेने माझा असा हुकमी ताबा घेतला होता, की भीती व कामना यांच्या मधोमध अडकून मी निचेष्ट पडून राहिले, ती मात्र एका अणकुचीदार वेदनेमुळे भान येऊन तोंडातून किंकाळी बाहेर पडेपर्यंत. पण आता फार उशीर झाला होता: खोगीरात तो असा घट्ट बसला होता, की मी शक्य तितकी झटापट करूनही बाहेर फेकला न जाता उलट त्याची प्रगतीच झाली, आणि शेवटी त्याच्या एका जबरदस्त ढुशीमुळे माझ्या बालेकिल्ल्याचा व जवळजवळ माझाही खून पडला. काट्यांवरून मध गोळा करण्याची जी पाळी स्त्रीजातीवर येते, तिची साक्षीदार होऊन मी रक्तस्राव होत पडून राहिले.

"पण वेदना शमताच सुखाची भावना जीव धरू लागली, आणि पुन्हा प्रयोग करून घेण्याकरिता लवकरच मी राजी झाले; सकाळ होईपर्यंत, पूर्वी न चाखल्या गेलेल्या माझ्या मिठाईवर ताव मारणाऱ्या ह्या लुटारूइतकी प्रिय व्यक्ती मला जगात दुसरी राहिलेली नव्हती: माझं सर्वस्व आता तो होता. आम्ही एकमेकांबरोबर नशीब काढायचं कसं ठरवलं, लंडनला एकत्र कसे आलो, काही दिवस कुठे राहिलो, आणि शेवटी नाईलाजाने कसं एकमेकांपासून दूर व्हावं लागलं व मला हा मार्ग पत्करावा लागला; या घरात जर मला आसरा मिळाला नसता, तर माझ्या साधेभोळेपणामुळे व विकारी स्वभावामुळे आत्तापर्यंत मी केव्हाच मार खाऊन फाटूनतुटून कशी गेले असते: हा सारा वृत्तान्त मी नेमून दिलेल्या मर्यादेच्या बाहेर असल्यामुळे माझी कहाणी मी इथे थांबवत्ये."

ज्या क्रमाने आम्ही बसलो होतो त्याप्रमाणे आता हॅरिअटची पाळी होती. त्याआधी किंवा त्यानंतर स्त्रीसौंदर्याने जे नमुने मी पाहिलेले आहेत, त्यांमध्ये तिच्याशी स्पर्धा करू शकतील असे फार थोडे सापडतील. मध्यरेषेच्या दोहोंबाजूंना भूमितीतल्या आकृतीप्रमाणे काटेकोर एकसारखी असलेली तिच्या लहानखुऱ्या अवयवांची रचना कोमल नसून कोमलता ह्या अमूर्त गुणाचं मूर्तस्वरूप होती. मुळातच गोरा असलेला तिचा वर्ण अधिकच गोरा भासविणाऱ्या तिच्या काळयाभोर डोळयांनी तिच्या चेहऱ्याला जिवंतपणा आणण्याचं काम त्यावरील रंगछटेपेक्षा अधिक चांगलं केलेलं होतं; आणि फिकटपणाच्या आरोपातून ह्या छटेची सुटका करणारा गालांवरील गोड रक्तिमा अंशाअंशाने अधिकाधिक पुसट होऊन कमालीच्या शुभ्रतेत शेवटी मिसळून गेलेला होता. अशा त्या तोंडवळयावर पसरलेल्या मिठ्ठास गोडीचा अतिरेक करण्यात तिच्या छोटेखानी नाकाचं व जिवणीचं सहकार्य होतंच; आणि काहीसा अंगभूत आळसावलेपणा, मांद्य व वैषयिक सुखासीनता हे तिच्या स्वभावात

मुरलेले गुणविशेष, ह्या गोडीशी तितकेसे विसंगत म्हणता येण्यासारखे नव्हते.

तिच्या वाट्याची वर्गणी देण्याकरिता आग्रह होताच ती हसली, किंचित लाजली व तिने आमचा हट्ट पुरवला तो अशा प्रकारे: "यॉर्क शहरापासून थोड्या अंतरावर माझे वडील एक पिठाची गिरणी चालवीत असत. मी तान्ही असताना ते आणि माझी आई दोघेही वारल्यामुळे एका मूलबाळ नसलेल्या विधवा मावशीकडे मला सोपवण्यात आलं; — काउंटीमधल्या लॉर्ड एन– च्या मालकीच्या वंशपरंपरागत वाड्यावर ती हाउसकीपर म्हणून राहात होती, आणि त्या ठिकाणी तिने माझा अतिशय कनवाळूपणाने सांभाळ केला.

"मला तेव्हा अजून सतरा वर्षं पुरी झालेली नसली (तशी अजून अठरा झालेली नाहीत), आणि माझ्यापाशी वारसा मालमत्ता काहीही नाही हे जगजाहीर असलं, तरीदेखील केवळ माझ्या दिसण्यामुळे मला अनेक चांगल्या स्थळांकडून मागणी आलेली होती; पण निसर्गदेवतेने तिच्या लाडक्या भावनेची मला जाणीव करून देण्यात दिरंगाई केल्यामुळे असेल, किंवा तिची जवळून ओळख व्हावी अशी उर्मी किंवा उत्सुकता थोडीसुद्धा जागी करू शकेल असा कोणी पुरुष न भेटल्यामुळे असेल, पण इतकं वय वाढेपर्यंत मी शरीराचीच काय पण मनाचीही निरागसता पूर्णपणे जतन करून ठेवलेली होती: आणि नेमकी कशाची ते ठाऊक नाही अशी एक भीती तिच्याच बरोबरीने माझ्यात घर करून बसलेली असल्यामुळे, मरून जायला जशी मी उत्सुक नव्हते तशीच लग्नालाही नव्हते. हा सारा बालिश हट्टीपणा आहे असा माझ्या मावशीचा ग्रह होता, आणि जसजसा काळ जाईल तसतसा तो झिजून जाईल, अशी बहुतेक तिच्या स्वत:च्या अनुभवावरून तिला खात्री होती; तेव्हा नाकासमोर चालणाऱ्यांतली ती असल्यामुळे तिने ह्या भेदरटपणाची पाठराखण केली, आणि माझ्या इच्छुकांना माझ्या वतीने योग्य ती उत्तरं दिली.

"मालकाचं कुटुंब लंडनहून अनेक वर्षांत वाड्यावर आलेलं नसल्यामुळे त्याकडे दुर्लक्ष होऊन, फक्त माझी मावशी आणि दोन म्हातारे नोकर यांच्यावर सगळी निगराणी सोपवून देण्यात आलेली होती. परिणामी, ऐसपैस पसरलेली रिकामी हवेली व भोवतालचा बागबगीचा, यात कुठेही हिंडायला मला सरसकट मोकळीक होती; आणि एकाददुसरं चुकून मागे राहिलेलं खोपट सोडलं तर बाकीची मनुष्यवस्ती अर्ध्याएक मैलावर होती. अशा त्या परिसरात, विशेष लक्षात राहण्यासारखी काहीही घडामोड न होता, शांत व निरागस वातावरणात मी लहानाची मोठी झाले; पण नियतीने मुक्रर केलेल्या त्या दिवशी मात्र, दुपारच्या जेवणानंतर निदान काही तासांसाठी मावशी गाढ झोपलेली असताना, नेहमीसारखीच मी बरोबर माझं शिवणकाम घेऊन वाड्यापासून काही अंतरावर असलेल्या

एका जुन्या समर हाउसकडे चालत गेले; आणि त्याचं दार व एकुलती खिडकी एका ओहोळाकडे तोंड करून होती, त्या दिशेला पाहात बसले.

"उन्हाळ्यातल्या दुपारच्या अतोनात उष्म्यामुळे माझ्या संवेदना क्लांत होऊ लागल्या, तशी एक हलकीशी डुलकी चोरपावलांनी येऊन त्यांच्यावर आरूढ झाली; झोप घ्यायची तर तिथे वेताचा एक दिवाण आणि उशाला कामाची टोपली इतकीच काय ती सोय होती; पण ही झोपही थोडाच वेळ टिकली, कारण काहीतरी भरकन हालचाल झाल्याच्या व पाणी उडवलं गेल्याच्या आवाजाने मी दचकून जागी झाले. काय प्रकार आहे ते पाहायला मी उठले; तर आसपासच राहणाऱ्या एका जमीनदाराचा मुलगा (हे सारं मला नंतर कळलं, कारण त्याला मी पूर्वी कधी पाहिला नव्हता) तिथे बंदूक घेऊन भटकंती करीत आला होता; आधीच हवेतला उष्मा व त्यात शिकारीचे श्रम यांमुळे अंगाची काहिली होऊन त्याला ताज्या वाहत्या पाण्याचा मोह पडला; आणि पलिकडच्या काठावर जे रान माजलेलं होतं, त्यातल्या पाण्यापर्यंत ओणवलेल्या काही झाडांनी एक आरामशीर सावलीवजा आडोसा तयार केलेला होता, त्या जागी सोयिस्करपणे सगळे कपडे उतरवून ठेवून, त्याने आत उडी घेतली होती.

"हातचं काहीही राखून न ठेवता खरं सांगायचं, तर पाण्यातल्या ह्या नग्न तरुणाला पाहताच, अचंबा आणि भीती याच माझ्या पहिल्या भावना होत्या; मला ताबडतोब बाहेर पळूनच जावंसं वाटत होतं, पण ह्या प्रस्तावाला माझ्यातल्या शालीनतेने असा आक्षेप घेतला (तिच्या घाताला तो कारणीभूत झाला), की खिडकी व दाराची रचना लक्षात घेता, मी बाहेर पडून काठाकाठाने घरी जाणं हे त्याने मला न पाहता मुळीच शक्य नव्हतं: त्यातदेखील त्याला बघूनच मी इतकी शरमलेली व गोंधळलेली होते की हा विचारही मला सहन होण्यासारखा नव्हता. तेव्हा तो जाईपर्यंत मला तिथेच खोळंबून राहण्याची शिक्षा झाल्याकारणाने यापुढे काय करावं हे मला अजिबात कळेना: लाज व भेदरटपणा या दोहोंमध्ये माझी कात्री होऊन काही वेळ मी खिडकीबाहेर बघितलं देखील नाही, पण ती जुन्या पद्धतीची बाजूने उघडणारी खिडकी असून माझ्यामागे प्रकाश नसल्यामुळे मी आत असल्याचं बाहेरच्याला कळण्यासारखं नव्हतं; आणि दार इतकं मजबूत होतं की तोडून काढल्याखेरीज किंवा माझीच संमती असल्याखेरीज ते उघडलं जाणार नव्हतं. पण आता स्वानुभवावरून मला हे पटलं की एखाद्या वस्तूची आपल्याला भीती वाटत असेल व तिच्यापासून दूर जाता येत नसेल, तर सुखविणाऱ्या वस्तूइतक्याच ताकदीने ती आपले डोळे खेचून घेते. हे नवं दृश्य पाहण्याची इच्छा नसतानाही त्या दिशेने बळेबळे ढकलणारी ही अनामिक उर्मी मला फार काळ आवरता आली नाही;

काही इजा होण्यासारखी नसून कुणी मला पाहूदेखील शकत नाही अशी खात्री झाल्यामुळे माझी भीड चेपली, आणि माझ्या कुमारिकासुलभ लज्जेला धक्कादायक व महाभयानक वाटणाऱ्या, 'नग्नपुरुष' ह्या वस्तूविशेषाकडे मी कलाकलाने डोळे वळवून पाहू लागले.

"पण मी चोरून दृष्टिक्षेप टाकताच मला दिसलेली पहिली गोष्ट म्हणजे पराकोटीच्या पांढऱ्याशुभ्र त्वचेची ओलसर लकाकी, आणि त्यावर खेळणाऱ्या सूर्याचं बिंदुप्रखर प्रतिबिंब. त्याच्या चेहऱ्यामध्ये तरुणाई व तजेला ओतप्रोत भरलेला होता, पण यापलीकडे मात्र त्याचा आकार माझं मन थाऱ्यावर नसल्यामुळे मला स्पष्टसा पाहता आला नाही. पोहण्याच्या किंवा पाण्यात मस्ती करण्याच्या नादात पृष्ठभागावर दिसणाऱ्या त्याच्या चमकत्या अवयवांचा खेळकरपणा व खट्याळपणा पाहून मी नकळत आनंदून, खूष होऊन गेले: काही वेळा तो हालचाल न करता पाण्यावर उताणा पडून राही, आणि त्याचे तरंगणारे भरघोस कुरळे केस आपल्या काळयाभोर घनदाटपणाने पाणी कापीत जात. कधीकधी वाहत्या पाण्यामुळे त्याची छाती व पांढरंशुभ्र पोट यांत अंतर पडे; आणि या पोटाखाली जो काळा केसाळ उंचवटा होता, त्यातून गोलसर, मऊ, लवचिक, पांढऱ्या रंगाचं, पाण्याच्या किंचितही हालचालीबरोबर किंवा भोवऱ्याबरोबर इकडेतिकडे हलणारं असं काहीतरी बाहेर आलेलं आहे, ही अत्यंत लक्षवेधक बाब माझ्या दृष्टिक्षेपातून सुटणं शक्य नव्हतं. एक प्रकारच्या निसर्गदत्त अंत:प्रेरणेमुळे मुख्यत्वेकरून ह्या अवयवानेच माझं लक्ष वेधून घेऊन खिळवून ठेवलं हे मला नाकारता येणार नाही: तिथे पाहू नका, अशी आज्ञा माझ्या डोळ्यांना पाळायला लावणं माझ्यातल्या शालीनतेच्या पूर्णपणे आवाक्याबाहेर होतं; आणि फार अक्राळविक्राळ असं काही त्यात न दिसल्यामुळे, भीतीशी निगडित अशा माझ्या सर्व भावना मी नकळत कुलूपबंद करून टाकल्या: पण त्या नाहीशा होतात न होतात तोच अजब इच्छा व नव्या कामना त्यांच्या जागी हजर झाल्या, आणि टक लावून पाहात असताना मी विरघळत गेले. जो निसर्गप्रणित अग्नी इतके दिवस लुप्त अथवा निद्रिस्त होता; तो आता बाहेर फुटू लागला, आणि प्रथमच त्याने मला माझ्या स्त्रीत्वाची जाणीव करून दिली.

"ह्या तरुणाने आता पवित्रा बदलला होता, व मुद्दाम घडवले तरी इतके कोरीव होणार नाहीत असे त्याचे हातपाय हलवीत, पोटावर पडून तो पोहत होता; आणि त्याचवेळी त्याच्या गोऱ्यापान मानेवर व बाहूंवर खेळणाऱ्या तरंगत्या कुरळ्या केसांचा रंगविरोध अत्यंत मनोहर असा खुलून दिसत होता. पाठीचा मणका जिथे संपत होता तिथून जन्म घेणारा, आणि जिथे मांड्या सुरू होत होत्या तिथे आपली दुहेरी कमान पुरी करणारा असा तो मिजाशी मांसाचा फुलोरा, त्यावरील ओलेत्या व निथळत्या चमकदारपणामुळे डोळे दिपवून टाकीत होता. मला दोलायमान करणाऱ्या अंतस्थ भावनांनी आतापर्यंत मी इतकी हेलावले होते, ह्या दृश्याने इतकी मेणावून गेले होते, की दगाफटका

होऊन कमालीच्या भीतीकडून कमालीच्या वासनांसमोर मला अचानक नेऊन टाकण्यात आलं; त्या माझ्यावर अशा स्वार झाल्या, आणि वातावरणातल्या उष्म्याने त्यांचा दाह असा भडकला की ह्या प्रभावाखाली माझं शरीर जवळजवळ मूर्च्छित झालं. आपल्याला नक्की काय हवं आहे हे जरी मला ठाऊक नसलं, तरीदेखील इतका गोड दिसणारा हा तरुण मला सुखच देईल एवढा मात्र विचार माझ्या मनात होता; पण त्याच्याशी ओळख होण्याची किंवा कदाचित तो पुन्हा पाहायला देखील मिळण्याची शक्यता कमी असल्यामुळे, माझ्या कामना तुटूनफुटून जाऊन त्यांचं रूपांतर छळवादामध्ये झालं. ह्या जादुई वस्तूला अजूनही मी डोळयांत प्राण आणून न्याहाळत होते, आणि तेव्हाच तो क्षणार्धात खाली गेला.

"कुणा पट्टीच्या पोहणाऱ्याचेही हातपाय आखडले व क्वचित तो बुडाला देखील, अशा गोष्टी मी ऐकलेल्या होत्या; आणि ह्या अचानक लागलेल्या ग्रहणामागे हेच कारण आहे अशी माझी धारणा होऊन, त्या अनोळखी पोराने माझ्यात जो अतोनात लळा उत्पन्न केला होता त्यामुळे कमालीची घाबरून जाऊन मी सैरभैर झाले; इतकी की तात्काळ माझ्यात चपळाई आली, दारापर्यंत झेप घेऊन मी ते उघडलं, तो मरेल अशी धास्ती वाटून त्याला वाचवण्यासाठी आपण काहीतरी करावं ह्या आत्यंतिक इच्छेने ओहोळापर्यंत वेड्यासारखी धावत गेले, पण नक्की काय आणि कसं करायचं याची अक्कल मला बिलकुल नव्हती: अर्थात भावनांचा व भीतीचा जो उद्रेक माझ्यामध्ये निमिषार्धात झालेला होता, त्याला डोकं चालविणं कुठून ठाऊक असणार?

"हे सारं घडायला काही क्षणच पुरेसे होते. पाण्याच्या हिरव्या काठापर्यंत जाण्याइतपतच माझ्यात त्राण शिल्लक होतं, आणि विस्कटलेल्या मनाने तिथे ह्या तरुणाचा शोध करताच व अजूनही तो दिसत नाही असं पाहताच भीतीमुळे व काळजीमुळे मी खोल बेशुद्धीत गेले; ती काही काळ तरी टिकली असली पाहिजे, कारण माझ्या शरीरात खूप खोलवर टोचणाऱ्या वेदनेची जाणीव होईपर्यंत मी जागी झाले नाही; आणि त्यातही मला विलक्षण आश्चर्याची गोष्ट अशी, की ज्या तरुणाला मी इतक्या परोपकारी बुद्धीने वाचवायला गेले होते त्याच्याच बाहुपाशात मी होते इतकंच नव्हे, तर त्याने माझ्या हतबल अवस्थेचा चांगलाच फायदा घेऊन माझ्यात प्रवेश करून घेतलेला होता; आणि तोही इतक्या खोलपर्यंत, की याआधीच्या मानसिक आंदोलनांनी मी कमकुवत झालेली असल्यामुळे व अतोनात अचंबा वाटून हतबुद्ध झाल्यामुळे, ओरडा करण्याची किंवा त्याच्या आवळमिठीतून सुटण्याचीही शक्ती माझ्यात उरलेली नव्हती; पण स्वतःचा मुद्दा जबरदस्तीने पुढे दामटवीत नेत असताना त्याने माझ्या कौमार्यावर पूर्ण विजय मिळवलेला आहे, हे जरी त्याला शिरकाव करताना सामोऱ्या आलेल्या अडचणींमुळे मघाशीच उमगलेलं असलं, तरीदेखील बाहेर काढल्याकाढल्या भळभळा वाहू लागलेल्या

रक्तामुळे आता अगदी डोळयांसमोरच दिसायला हरकत नव्हती.

"पण (त्याने मला नंतर सांगितलं त्याप्रमाणे) त्याच्या वासनेचा बेछूट मोकाटपणा आता काहीसा कमी झाला असल्यामुळे, समोरचं रक्त पाहताच व माझ्या अवस्थेचं भान येताच तो मनाने इतका धसकला, की याचे परिणाम अतिशय वाईट होण्याची भीती असली तरीदेखील मला सोडून पळून जाणं सहज शक्य असूनही त्याच्याने झालं नाही. मी अजूनही रक्तबंबाळ, घायाळ अवस्थेत, धापा टाकीत, काही न बोलता पडून होते; मला उठता येत नव्हतं, मी भेदरले होते, जखमी झालेल्या पाणकोंबडीसारखी तडफडत होते; आणि आपल्याला काय झालं आहे हे कळून चुकताच पुन्हा बेशुद्ध होण्याच्या बेतात होते.

"हा तरुण माझ्या शेजारी होता, वाकून माझ्या हाताचं चुंबन घेत होता; आणि मला क्षमा कर, तू बरी व्हावीस म्हणून शक्य असेल ते सगळं मी करेन, असं डोळयांत पाणी आणून काकुळतीने म्हणत होता. पण हे मात्र निश्चित, की शुद्धीवर आल्याक्षणी मी ओरडा करू शकले असते, किंवा त्याला रक्ताच्या थारोळ्यात पाडून त्याचा सूड घेऊ शकले असते, तर त्याचं मी काही ऐकून घेतलं नसतं: आणि माझ्यावरचा हा अतिप्रसंग त्या परिस्थितीत विशेष दोषास्पद म्हणायला हवा; कारण त्याला जरी हे ठाऊक नसलं, तरीदेखील त्याचा जीव वाचावा म्हणून धडपड केल्यामुळेच माझं मडकं फुटलेलं होतं. पण एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत भावनांचा थारेपालट किती झपाट्याने होऊ शकतो! आणि ज्यांना हे पटत नाही, ते मानवी स्वभावाला किती कमी ओळखतात! अचानक जडलेल्या माझ्या प्रेमाचा, आणि आता तितक्याच अचानकपणे जडलेल्या माझ्या रास्त तिरस्काराचा हा धनी, हा लोभस गुन्हेगार, गुडघे टेकून माझा हात अश्रूंनी भिजवीत असलेला पाहताच, न विरघळणं मला शक्य नव्हतं. अजूनही तो पूर्ण नग्नावस्थेत होता, पण केवळ वावगं दृश्य पाहावं लागल्यामुळे माझ्या शालीनतेला एरवी जो धक्का बसला असता, तो याआधीच मोक्याच्या जागी तिला मोठी जखम झालेली असल्यामुळे फारसा बसला नाही; थोडक्यात सांगायचं तर माझा राग इतका झरझर उतरला, आणि प्रेमाची लाट पुन्हा एकदा माझ्यावर इतक्या जोराने कोसळली, की त्याला क्षमा करीत असताना माझ्याच आनंदाकरिता ती करते आहे, असं मला वाटलं.

"मी त्याची कानउघाडणी केली ती इतक्या मऊसूत आवाजात, आणि माझे डोळे ज्या प्रकारे त्याच्या डोळयांशी भिडले त्यात धुंदी अधिक व सूडभावना इतकी कमी होती, की आपली निर्दोष मुक्तता इथून अगदीच हातपाय गाळावेत इतक्या दूरवर नाही असा साहजिकच त्याचा ग्रह झाला; पण तरीही त्याला मी रीतसर समारंभपूर्वक क्षमा करेपर्यंत त्याने शरणागतीचा पवित्रा सोडला नाही; आणि

अर्थात अत्यंत आवेगाने केलेल्या याचना, रडणंभेकणं व आश्वासनं, इतकं सारं झाल्यानंतर ती हातची राखून ठेवणं माझ्याच्याने होण्यासारखं नव्हतंच. परंतु यापुढे मात्र आपण पुन्हा आगळीक करतो आहोत की काय अशी मोठी धास्ती वाटत असल्याची चिन्हे दाखवीत तो जेव्हा माझ्या ओठांचं चुंबन घेण्याचा प्रयत्न करू लागला, तेव्हा मी नको म्हणाले नाही किंवा मला ते नावडलं असंही नाही; पण त्याने मला रासवटपणे वागवल्याबद्दल मी सौम्य शब्दांत त्याचं वाक्ताडन करताच माझ्या कौमार्यभंगामागचं रहस्य त्याने स्पष्ट करून सांगितलं; आणि यामुळे जरी त्याचा अपराध शंभर टक्के पुसला गेला नसला, तरीदेखील त्याच्या बाजूने धडधडीत पक्षपात करू लागलेल्या माझ्यासारख्या न्यायाधीशाला तो बऱ्यापैकी मामुली वाटू लागला.

"त्याचं पाण्याखाली जाणं किंवा बुडणं ही काहीतरी भयंकर दुर्घटना आहे असं जे माझ्या प्रचंड गावंढळपणामुळे मी समजत होते, ती वास्तविक सूर मारण्याची कला होती; ह्याबद्दल मी पूर्वी कधी ऐकलंसुद्धा नव्हतं, किंवा निदान तसा कुणी उल्लेख केलेला माझ्या लक्षात आला नव्हता: आणि त्याचा श्वास इतका दमदार होता, की त्याला वाचवण्यासाठी मी बाहेर पळत येऊन पुढे बेशुद्ध पडेपर्यंत जो वेळ गेला तेवढ्यात तो अजून वर आलाही नव्हता; मात्र त्याने पाण्याबाहेर डोकं काढताच, मला काठावर आडवी पडलेली पाहून, त्याला याआधीच न दिसता कुणी तिथे झोपी जाणं शक्य नाही हे माहित असल्यामुळे, ही पोरगी आपल्याशी मस्करी किंवा चावटपणा करते आहे असं सुरवातीला त्याला वाटलं: या समजुतीप्रमाणे तो हिय्या करून माझ्याजवळ आला; आणि माझ्यात काही धुगधुगी नसलेली पाहून, हा काय विचित्र प्रकार असेल याचा अचंबा करीत, आता काय व्हायचं ते होवो असं म्हणून तो मला उचलून समर हाउसचं दार उघडं दिसल्यामुळे तिथे घेऊन गेला; तिथे त्याने मला दिवाणावर झोपवलं, आणि निदान मला अगदी शपथ घेऊन सांगितलं त्याप्रमाणे मी शुद्धीवर यावं म्हणून बरेच प्रयत्न केले; पण हे करीत असताना माझ्या शरीराच्या बिनबचाव उघड्या पडलेल्या विविध अवयवांच्या प्रदर्शनामुळे व स्पर्शामुळे कामज्वर भडकून स्वत:च्या मनावरचा त्याचा ताबा सुटला; माझी बेशुद्धी लुटूपुटूची आहे हा आपला पहिला तर्क चुकीचा निघाला, अशी अजून त्याची पुरती खात्री झालेली नसल्याकारणाने आगीत तेलच ओतलं गेलं; तेव्हा अशा गोड समजुतीची भुरळ पडून, जे प्रलोभन अव्हेरणं त्याच्या मते मानवी शक्तीपलीकडचं होतं त्याच्या जाळ्यात तो गुरफटला; आणि भरीस भर म्हणून आजूबाजूला शुकशुकाट असून बिनबोभाट प्रयत्न करून पाहता येईल अशी सोय असल्यामुळे, तो न करण्याइतका त्याचा स्वत:वर धरबंध राहिला नाही.

"फक्त दार आतून बंद करण्यापुरता माझ्यापासून दूर जाऊन तो दुप्पट अभिलाषेने भक्ष्याकडे पुन्हा परत आला: मी अजूनही गुंगीतच आहे असं पाहताच त्याने स्वत:ला हवं तसं माझं शरीर वळवून

घेतलं, तेव्हा अर्थात त्याचं काय चालू आहे याची जाणीव एखाद्या मृतदेहाला असेल त्यापेक्षा जास्त मला नव्हती; आणि शेवटी त्याने मला दुखवल्यामुळे, जो हल्ला मी परतवू शकले नव्हते त्यात त्याने विजय मिळवला असल्याची साक्षीदार म्हणून नेमक्या वेळी जागी झाले: पण यानंतर मात्र तो माझ्याशी बोलू लागताच त्याचा आवाज माझ्या कानांत गोडगोड गुदगुल्या करू लागला, आणि चमत्कृतीने भरलेली ही नवी वस्तू इतकी जवळ आल्यामुळे माझं मन खोलवर भारलं गेलं; एका वेगळ्या व आल्हाद पसरविणाऱ्या प्रकाशझोतातून हा सारा प्रकार मला दिसू लागताच दुखावली गेल्याची पूर्वीची जाणीव अंशाअंशाने मी संपूर्णपणे विसरून गेले, आणि स्वतःच्या ह्या पराभवाची मला विशेष खंतही वाटेनाशी झाली.

"समेट होण्याची चिन्हं आहेत, हे ओलसर झालेल्या माझ्या दृष्टिक्षेपांवरून ह्या तरुणाने लागलीच ओळखलं; आणि त्यावर माझ्या ओठांचं शिक्कामोर्तब व्हावं यासाठी घाई करून, आपली क्षमायाचना माझ्यापर्यंत पोहोचवण्याकरिता त्यांना हळुवारपणे दाबून धरून जे चुंबन दिलं, त्यातल्या प्रखर उष्णतेमुळे ते हृदयापर्यंत पोहोचल्याची व तेथून नव्यानेच सापडलेल्या माझ्यातल्या कामदेवाच्या साम्राज्यापर्यंत झिरपल्याची मला जाणीव झाली, आणि आता कशाकरिताही त्याला नाही म्हणता येऊ नये, इतकी मी वितळून मऊ होऊन गेले. यापूर्वीच्या वेदनांवर थंडगार फुंकर घालणाऱ्या सांत्वनभावना व यापुढे येणाऱ्या सुखाच्या अधिकाधिक मधाळ अपेक्षा ज्यातून मोठ्या खुबीदारपणे सूचित व्हाव्यात अशा आविर्भावात तो मला बिलगून मोठ्या मिठ्ठास शब्दांत माझी समजूत काढीत असताना, जरी केवळ लाजरेपणामुळे माझ्या डोळ्यांनी त्याच्या डोळ्यांकडे पाहायचं अव्हेरून त्यांना उलट टाळण्याचाच प्रयत्न केला, तरीदेखील ज्यामुळे हा सारा अनर्थ घडला होता त्या उपकरणाकडे मी चोरून दृष्टी फेकताच ते ह्या गुन्ह्याची पुनरावृत्ती करण्याच्या तयारीला लागल्याचं तौलनिक निरीक्षणाची संधी याआधी मिळालेली नसतानाही मला सहजच कळून चुकलं; आणि निष्काळजीपणे खाली लोंबकळत असलेल्या माझ्या हातावर त्याने निःसंशय सहेतुकपणे त्याचा घट्ट कडकपणा लावून धरलेला असताना, ते आणखी मोठं होऊ लागताच मी चांगलीच धास्तावून गेले; पण त्याने मला इतक्या हळुवारपणे पूर्वकल्पना दिली, व मला इतका आनंद देत आपली प्रगती करून घेतली की त्याच्या लकाकणाऱ्या सुंदर नग्नावयवांतून मिळणाऱ्या दृष्टिसुखामुळे व दाहक स्पर्शसुखामुळे माझ्या कामना पुन्हा एकदा प्रखरपणे प्रज्वलित होऊन मी संवेदनांच्या कल्लोळाला पुरती शरण गेले; आणि माझ्या बेशुद्धावस्थेत, माझ्या शरीरातल्या सर्वात मूल्यवान फुलाची राखण करणं मला शक्य राहिलेलं नसताना ते फूल खुडून नेल्यानंतर, जी सुखं देण्याची क्षमता माझ्या गरीब बिचाऱ्या शरीरात उरलेली होती, ती सारी माझ्या अबोल, लाजऱ्या संमतीनंतर त्याने भरभरून वसूल केली.

"घालून दिलेल्या नियमाप्रमाणे मी इथे थांबायला हवं, पण मी इतकी वाहावते आहे की प्रयत्न करूनही मला ते शक्य नाही. पुढे एवढंच सांगत्ये, की पकडली न जाता किंवा झाल्या प्रसंगाचा कुणाला संशय न येता मी घरी परतले. माझ्या तरण्याबांड तस्कराला त्यानंतर मी अनेकदा भेटले, त्याच्यावर माझं प्राणांतिक प्रेम बसलं, आणि त्याच्या नावे असलेली छोटीशी इस्टेट हाती पडण्याच्या वयाचा अजून जरी तो नव्हता, तरीही माझ्याशी लग्न करायला तयार झाला असता; पण कोणत्या अनपेक्षित घटनांमुळे हे व्हायचं राहिलं, आणि परिणामी मी बाजारात कशी येऊन पडले, ह्या गोष्टी गंभीर प्रकृतीच्या व मनाला खिन्नता आणणाऱ्या असल्यामुळे आत्ता सांगण्यासारख्या नाहीत, तेव्हा मी इथे आवरतं घेत्ये."

यापुढील क्रमाला अनुसरून, जिचा मी याआधी उल्लेख केलेला आहे त्या काळ्याभोर केसांच्या लुईसाने आपला इतिहास उपस्थितांना सांगायला सुरुवात केली. प्रकर्षाने डोळ्यांत भरणाऱ्या अशा तिच्या सौंदर्यलक्षणांबद्दल मी यापूर्वीच तुम्हाला थोडंसं सांगितलं आहे; 'डोळ्यांत भरणाऱ्या' हा शब्दप्रयोग मी पुन्हा वापरत्ये, कारण 'दिपवून टाकणाऱ्या' पेक्षा वेगळा गुणधर्म दर्शवण्याकरिता मला तो चोख वाटतो; माझं तरी मत असं की दिपवून टाकण्याचा परिणाम हा तुलनेने नेहमीच कमी टिकतो आणि सर्वसाधारणपणे गोऱ्या रंगात पाहायला मिळतो; पण हा निर्णय प्रत्येकाच्या आवडीनिवडीवर सोडून, मी तुम्हाला लुईसाचा वृत्तान्त सांगत्ये:

"नेहमी दिल्या जाणाऱ्या सल्ल्यानुसार, माझा जन्म ज्या पार्श्वभूमीवर झाला तिच्याबद्दल मी फुशारकी मारायला हवी कारण त्याच्या मुळाशी शुद्ध प्रेम होतं पण लग्न नव्हतं; आणि मी अस्तित्वात यायला कारणीभूत ठरणारी ही उर्मी जर रक्तातून पुढच्या पिढीत येत असेल, तर माझ्याइतकी ती दुसऱ्या कुणात आलेली असणं शक्य वाटत नाही. लाकडी कपाटं बनवणाऱ्या एका कसबी सुताराने त्याच्या मालकाच्या मोलकरणीवर जो पहिला प्रयत्न केला त्याचं दुर्लभ फळ म्हणजे मी; आणि यातून झालेलं निष्पन्न म्हणजे पोट आल्यामुळे तिची नोकरी गेली. तिच्यासाठी फार काही करण्याच्या परिस्थितीत तो नव्हता; पण हा दोष तिला लागलेला असूनही, ओझं उतरवल्यानंतर व गावाकडच्या एका गरीब नातलगाकडे मला खपवल्यानंतर इथे लंडनमध्ये धंदापाणी जोरात असलेल्या एका मिठाईवाल्याशी लग्न करून तिने तो धुऊन काढला; आणि त्याने तिला पुरतं डोक्यावर बसू दिल्यामुळे, मी तिच्या पहिल्या लग्नातून झालेली मुलगी आहे असं सांगून त्यानंतर काही महिन्यांतच तिने प्रकरण मारून नेलं. ह्या नात्याने मला घरी आणण्यात आलं, आणि मी सहा वर्षांची असेन नसेन तोच माझ्या आईला बऱ्यापैकी सांपत्तिक स्थितीत सोडून, पण स्वत:ची इतर काही अपत्यं मागे न ठेवता, माझा सावत्र बाप मरून गेला. जन्मदाता बाप समुद्रावर गेलेला होता; खरी गोष्ट बाहेर आली तेव्हा मला असं

सांगण्यात आलं की तो मेला, आणि तुम्हाला वाटत असेल तसा काही फार पैसा करून नव्हे, कारण तो एक साधा खलाशी होता.

"माझ्या आईने व्यवसाय पुढे चालविला, व तिच्या डोळ्यांसमोर मी मोठी होऊ लागताच, तिचा पाय जसा घसरला तीच वृत्ती माझ्यात उतरू नये ही तिच्या मनातली काळजी, माझ्यावर तिची जी सततची कडक नजर असे त्यावरून उघडउघड दिसून येत होती; पण आपल्या त्वचेचा वर्ण किंवा तोंडवळा जसा आपल्या हाती असत नाही, तसे स्वभावातील विकारदेखील असत नाहीत; आणि ह्या निषिद्ध सुखाकडे माझा ओढा इतका प्रबळ होता की तिच्या सगळया काळजीला व खबरदारीला शेवटी तो पुरून उरला. मी जेमतेम बारा वर्षांची असताना, माझ्यातल्या ज्या अवयवाला धक्का पोहोचू नये अशी तिची फार इच्छा होती, तो आपल्याकडे लक्ष दिलं जावं व आपल्या कर्तृत्वाला वाव मिळावा म्हणून अधिरा होऊ लागल्याचं मला जाणवलं: एव्हाना त्याने स्वत:वर मऊ लव उगवून घेऊन आपल्या धाष्टर्याची चुणूक दाखवली होती, आणि मी एकसारखा हात तिथे नेऊन विचारपूस करीत राहिल्यामुळे फुशारून जाऊन तिची वाढ झालेली होती; माझ्या समजुतीप्रमाणे ती एक प्रकारची माझ्या बाईपणाची दस्तऐवजी हमी असल्यामुळे मी तिच्यावर फार खूष होते, कारण माझ्या कल्पनेत ह्या अवस्थेशी अनेक सुखे निगडित असल्याकारणाने त्यात पदार्पण करायला आसुसलेले होते. माझ्यातल्या त्या अवयवाचं व त्यामधल्या नव्या संवेदनांचं प्रस्थ वाढत चालल्यामुळे माझ्या पोरकट भातुकल्या व पोरकट करमणुकी आता तडकाफडकी ढासळल्या, त्यांच्यापेक्षा जास्त ठोस अशा मनोरंजक कृती निसर्गप्रेरणेनेच मला शिकवल्या; आणि याचबरोबर वासनेच्या साऱ्या नांग्या त्या केंद्रात अशा एकवटल्या, की मला खेळगडी नेमका कुठे हवा आहे याबद्दल चुकीची समजूत व्हायला वाव राहिला नाही.

"मला हव्याहव्याशा वाटणाऱ्या वस्तूजवळ पोहोचण्याची जिथे आशा नसेल, अशा प्रसंगी माणसांच्या सहवासात वावरण्याचं मी टाळू लागले, स्वत:ला कोंडून घेऊन राहू लागले; आणि मी कळवळून वाट पाहात असलेल्या त्या अज्ञात स्वर्गानंदाने आत यावं, याकरिता जी दारं व जो रस्ता मुक्रर झालेला आहे अशी निसर्गानेच मला ग्वाही दिलेली होती, तिथे हात लावून चाचपडून पाहात, मला साद घालणाऱ्या सुखसंवेदनांवर उठणारे गहिरे विचारतरंग अनुभवीत, एकांतात माझ्या मनाचे कोड पुरवू लागले. पण ह्या एकसारख्या स्वत:तच मग्न राहण्याने माझी अस्वस्थता उलट वाढवली, आणि अंगात खवळलेला विस्तव अधिकच भडकवला. मला छळत राहणाऱ्या ह्या लहानशा पाकोळीच्या असह्य चुरचुरीमुळे सहनशक्ती संपून जाऊन जेव्हा मी तिला बोटांत पकडलं आणि न थांबता चाळवीत राहिले, तेव्हा तर माझी अवस्था अधिकच वाईट झाली. वासनेच्या आवेगाने कित्येकदा मी स्वत:ला

पलंगावर झोकून देई, आ वासून मांड्या फाकवी, आणि कितीएक वेळ मिळता मिळत नसलेला आराम जणू काही आता मिळेल ह्या अपेक्षेने पडून राही; पण तो आभास आहे हे हळूहळू उमगल्यानंतर, शरीर तापून थरथरत असताना त्या पुन्हा बंद करून गच्च आवळून धरी. लहर येईल तेव्हा मला डिवचणाऱ्या व चूड पेटवून चाळवणाऱ्या या हडळीने माझ्या आयुष्याबरोबर अशी लगट केली, की मलाही व तिलाही अहोरात्र चैन पडेना. मात्र ज्या आकाराच्या वस्तूकरिता मी आसुसले होते काहीशा तशासारखीच माझी बोटं आहेत हे लक्षात येताच आपल्याला भलंथोरलं बक्षीसच मिळालं आहे असं मला वाटलं; मोठ्या घाबरत घाबरत पण सुखावून जात त्यातलं एक मी आत घातलं, आणि थोड्याफार वेदना सहन करीत का होईना पण जिथपर्यंत ते आत जाईल तिथपर्यंत माझा यौवनभेद केला; माझ्या त्या एकुलत्या अवस्थेत निर्वाणीचा म्हणून हा उपाय करीत असताना मी इतक्या बेभान आवेगात आले, की सारं संपल्यानंतर शेवटी धापा टाकीत कामज्वराच्या वितळत्या बेहोशीत बिछान्यावर शरीर ताणून पडून राहिले.

"पण पुन्हापुन्हा वापरल्यामुळे संवेदना बोथट होत गेली; आणि लवकरच मला असं लक्षात येऊ लागलं की ह्या तात्पुरत्या, फालतू, वरकरणी सोयीमुळे समाधान तुटपुंजंच मिळतं: असली कोरडीखट्ट, क्षुल्लक चाळवाचाळव करून कंडू जितकी शमते, त्यापेक्षा उठते जास्त. ही बंडखोर तगमग शांत करणारी एकमेव मुळी फक्त पुरुषाकडे असते हे मला जवळजवळ अंत:प्रेरणेतूनच समजलेलं होतं, आणि लग्नसमारंभ किंवा बाप्तिस्मा अशासारख्या प्रसंगी कान देऊन ऐकलेल्या गोष्टींवरूनही मी ते ताडलं होतंच; पण माझ्यावर सतत पाळत असल्यामुळे, ती मिळवायची कशी हाच जो एक कळीचा प्रश्न होता तो सुटण्यासारखा नाही असंच प्रथमदर्शनी वाटत होतं. अर्थात माझ्या आईचा पहारा कसा चुकवायचा, आणि डोक्यात भिनलेली उत्सुकता पुरी करून आत्तापर्यंत न चाखलेल्या ह्या अकटोविकट सुखाची चटक कशी भागवायची, याकरिता मी डोकं खाजखाजवून विचार केला नाही किंवा युक्त्या शोधल्या नाहीत, असं मात्र मुळीच नाही.

"पण कितीतरी दिवस प्रयत्न करूनही हुशारीला न साधलेलं काम एका अनपेक्षित प्रसंगाने एकदम करून टाकलं. आमच्या घराच्या पहिल्या मजल्यावर भाड्याने राहणाऱ्या एका बाईबरोबर एका ओळखीच्या ठिकाणी आम्ही दुपारी जेवायला गेलो होतो, आणि काही तातडीच्या कारणाने माझ्या आईला ह्या बाईबरोबर ग्रीनिचला जावं लागणार असं दिसू लागलं: सगळा बेत ठरला, तेव्हा कुणास ठाऊक कुठल्या बेरकी भुताने माझ्या कानात कुजबूज केली, की 'डोकं दुखतंय' अशी सबब सांग (तसं काहीही होत नव्हतं), म्हणजे तुला मुळीच नको असलेली ही तंगडेतोड टाळता येईल. थाप पचली, आणि बरीच नाराजी गिळल्यानंतर का होईना पण माझ्या आईने स्वत:ला असं पटवून दिलं की हिला

सोडून जायला हरकत नाही; पण मग तिने आवर्जून काळजी घेऊन, मला सुखरूप घरी पोहोचवून, दुकानात काम करणाऱ्या एका म्हाताऱ्या विश्वासू मोलकरणीच्या हाती सुपूर्द केलं – आमच्या घरात एकही पुरुष नव्हता, हे सांगायला नकोच. ती गेल्यानंतर लागलीच मी मोलकरणीला म्हणाले, की माझा बिछाना अजून घातलेला नाही, तेव्हा मी जाऊन आपल्या भाडेकरूच्या पलंगावर जाऊन पडत्ये; आणि त्याचवेळी तिला असं बजावून सांगितलं, की मला फक्त आराम करायचा आहे, तेव्हा उठवू नकोस. ह्या सूचनेचा बहुतेक मला नंतर मौलिक उपयोग झाला. बेडरूममध्ये जाताच मी बॉडीसच्या नाड्या सोडून टाकल्या, आणि अस्ताव्यस्त झालेल्या तोकड्या सैलसर कपड्यांत पांघरुणाच्या वर पडून राहिले. इथे मी स्वत:ला न्याहाळणं, हाताळणं आणि चाळवणं, असल्या सगळ्या जुनाट आणि वातड झालेल्या आपल्याआपण करायच्या भागवाभागवीत चूर होऊन गेले; किंवा वेगळ्या शब्दांत सांगायचं तर माझ्या आवाक्याबाहेर असलेल्या अज्ञाताची भुरळ पडून, माझ्यासमोरून पळून चाललेल्या सुखाचा पाठपुरावा करीत असताना, स्वत:मध्ये काय दडलेलं आहे हे उमजून घेण्याकरिता रस्ते शोधीत राहिले; याचा परिणाम माझा दाह भडकण्यात व माझ्या वासना त्वेषाने उफाळून येण्यातच झाला; पण त्या शमण्याकरिता गरजेची असलेली वस्तू तीच तेवढी जवळ नव्हती, आणि तिच्या वाट्याचं काम माझ्या बोटांना मुळीच जमत नसल्याबद्दल मला ती चावावीशी वाटत होती.

"माझ्यातला सर्वांत संवेदनाशील अवयव कठोर वास्तवाखेरीज दुसरं काहीही स्वीकारायला नाकबूल असताना, मी मात्र सावल्या पकडण्याच्या प्रयत्नांत स्वत:ला दमवून-श्रमवून घेत होते; यामुळे अनावर झालेल्या कामना, विरघळत्या विरामाकडे जातानाची निसर्गप्रेरणेची प्राणांतिक धडपड, आणि मुळात तो विराम मिळवण्यासाठी मी स्वत:शी केलेली पराकोटीची चाळवणूक, यामुळे थकून जाऊन मला एक अस्वस्थ ग्लानी आली: तिथून पुढे मला स्वप्नांत दिसलेल्या भासमान दृश्यांच्या प्रमाणात जर मी माझं अंगप्रत्यंग इतस्तत: हलवलं असेल (मला तशीच शंका आहे), तर पाहणाऱ्याला माझा कामज्वर लक्षात आल्याखेरीज राहिला नसता.

"आणि पाहणारा एकजण होता; कारण फारच थोडा वेळ टिकलेल्या झोपेतून मी जागी होताच, माझा हात एका तरुणाच्या हातात घट्ट पकडला गेलेला मला दिसला; माझ्या पलंगाशेजारी गुडघे टेकून त्याच्या धिटाईबद्दल तो माझी माफी मागत होता: ही बेडरूम ज्या स्त्रीची होती तिचा तो मुलगा, आणि ही तिच्याकरिता आहे हे त्याला ठाऊक होतं; त्याच्या समजुतीप्रमाणे दुकानातल्या नोकराणीला कळू न देता तो इथे लपूनछपून आला होता, आणि मला झोपलेली बघून इथून निघून जावं असं

सुरवातीला त्याच्या मनात आलं; पण अशा काही आकर्षणामुळे तो तिथेच खिळून राहिला होता, की त्यामागची कारणमीमांसा सांगण्यापेक्षा ते अव्हेरणं त्याला अवघड वाटलं असतं.

"आहाहा! काय सांगू?! – ह्या धाडसी प्रसंगातून जे सुख मिळवता येईल असं माझ्या चाणाक्ष मनाने ओळखलं, त्याच्या आशेने मला सुरवातीला वाटलेल्या भीतीवर आणि आश्चर्यावर तात्काळ मात केली. ढगांमधून खाली उतरवलेला, माझ्यावर करुणा करणारा एक देवदूत, असाच मला तो वाटला: कोणीही पुरुष चालेल इथपर्यंतच माझ्या इच्छांची कमालमर्यादा पोहोचलेली असल्यामुळे, त्याचं तारुण्य व कमालीचं देखणेपण ह्या बाबी माझ्या अपेक्षेच्या मानाने खूपच जास्त होत्या. तेव्हा माझी समजूत अशी झाली, की डोळ्यांत आणि आवाजात मला जितकं प्रोत्साहन आणता येईल तितकं कमीच होईल – सगळं पार पडल्यानंतर त्याचं माझ्या धिटाईबद्दल काहीही मत होवो, पण जेणेकरून माझी आत्ताच्या क्षणीची तातडीची निकड भागवायला तो कबूल होईल अशा उघडउघड सूचक हालचाली करण्यात मी मागे राहणार नव्हते; कारण प्राप्त प्रसंगी मला देणंघेणं होतं ते त्याच्या मनाशी नव्हे तर कृतीशी. त्याप्रमाणे मी उशीवरून माझं डोकं उंचावून अतिशय हलक्या आवाजात त्याला म्हणाले (त्याच पट्टीत आपणही बोलावं हे त्याने ओळखावं म्हणून!) की तुझी आई बाहेर गेलेली आहे, आणि रात्री उशीरापर्यंत परत येणार नाही: एवढा इशारा अगदीच कमी पडणार नाही असं मला वाटलं, पण नंतर हे सिद्ध झालं की माझी गाठ नवशिक्याशी नव्हती.

"नंतर तो मला म्हणाला त्याप्रमाणे, झोपेत असताना शरीराला इतस्ततः आळोखेपिळोखे दिल्यामुळे माझ्या शरीराची गुपिते त्याच्यासमोर उघडी होऊन त्याच्या मनावर उमटलेल्या चित्रांमुळे तो इतका मंत्रमुग्ध व आतुर होऊन गेलेला होता, की त्याचा कल जर मला आधी ठाऊक असता, तर तो आपल्याशी नम्रपणे वागेल ह्या भीतीपेक्षा धसमुसळेपणा करील हीच आशा वरचढ ठरली असती; आणि ह्या संधीचा त्याने पुरेपूर फायदा उठवावा म्हणून त्याला उत्तेजन देण्याकरिता माझ्या आवाजात व डोळ्यांत जी आत्यंतिक कोमलता मी ओतलेली होती, त्यापेक्षा बरीच कमी पुरली असती. त्याने माझ्या हातांवर उमटवलेली चुंबने मी अगदी बिनविरोध स्वीकारली असं लक्षात येताच तो वर माझ्या ओठांपर्यंत आला; त्याने स्वतःचे ओठ त्यांना चिकटवताच आनंदातिरेकाने मला अशी चक्कर आली की मी मागे कोसळले, आणि पलंगाच्या एका बाजूपासून नकळत मध्ये सरकून जिथे मी आमंत्रणवजा जागा तयार करून ठेवलेली होती, तिथे तो आपसूकच चढून आला. आता तो माझ्या शेजारी पहुडला होता; आणि सव्यापसव्ये किंवा शृंगारचेष्टा करण्यात वाया घालवण्याइतका वेळ हाताशी नसल्यामुळे, ज्या टोकाच्या भूमिकेला विरोध होण्याची मुळीच धास्ती नाही हे माझ्या हृदयाची धडधड व लालबुंद झालेली चर्या पाहून त्याला पक्कं कळून चुकलं होतं, ती घेण्याच्या तो ताबडतोब तयारीस लागला:

पुरुष ही मवाली जात अशा प्रसंगी आपल्याला पक्की ओळखून असते. आता केव्हाही होईल अशा त्या हल्ल्याची मनोमन तयारी करीत धापा टाकीत जेव्हा मी पडून राहिले, तेव्हा माझ्या मनातल्या आकांक्षा भीतीच्या फार पुढे गेलेल्या होत्या; आणि माझ्यासारखी जेमतेम तेरा वर्षांची पण उफाड्याची मुलगी ह्या प्रकरणाकरिता जितकी उतावळी होणं शक्य आहे तितकी मी होते. त्याने माझा पेटिकोट व आतला सदरा वर नेताच निसर्गप्रेरणेच्या सूचनेवरून माझ्या मांड्या कमाल मर्यादेपर्यंत फाकवल्या गेल्या; वासनांनी माझ्यातल्या शालीनतेची तेव्हा अशी सपशेल खांडोळी केलेली होती, की अनावृत्त अवस्थेत त्याच्यासमोर त्या उघडल्या जाण्याची पूर्वतयारी होत असताना, माझे गाल शरमेने नव्हे तर सुखवेदनेने लालभडक झाले होते.

"पण जेव्हा केंद्रभागाकडे आपसूकच खेचल्या गेलेल्या त्याच्या हाताच्या स्पर्शांनी त्यांच्यातला सारा खट्याळपणा व सारा उष्मा मला आतमध्ये व भोवताली जाणवून दिला, तेव्हा – आई गं! – जे काही मला जाणवलं त्यामध्ये आणि माझ्या स्वत:च्या निरस चिवडाचिवडीमध्ये केवढा फरक होता! आता त्याच्या कोटाची बटणं निघाली, पाटलोणीची बंदिशाळा ढासळली, आणि माझ्या स्वप्नांतल्या सर्व मनोकामना पूर्ण करणारा तो आश्चर्यमूर्ती, सुखकर्ता व प्रेमस्वरूप असा राजाधिराजदंड बाहेर पडला! त्याच्या लांबीकडे, त्याच्या जाडजूडपणाकडे एकटक पाहात राहून माझ्या डोळ्यांनी मी त्याला खाऊन टाकलं; पण शेवटी त्याने माझ्यावर चढून तो माझ्या मांड्यांच्या मधोमध ठेवताच, त्याच्याकडे पाहण्याचं सुख हिरावलं जाऊन, ज्या भागात ऐंद्रिय संवेदना सूक्ष्मातिसूक्ष्म व अतितीव्र असते, तिथे त्याचा स्पर्श होण्याचं कृतकृत्य करणारं जास्त थोरलं सुख मला त्या बदल्यात मिळालं.

"त्या वयात अर्थात प्रवेशद्वार खूपच छोटं होतं; त्यावर ते त्याने लावून धरताच मी त्याला इतक्या अपार उत्साहाने सामोरी गेले, व पहिल्याप्रथम आत शिरताच असा प्रचंड सुखस्फोट माझ्यामध्ये झाला की त्यानंतर होणाऱ्या क्लेशांची मी विशेष पर्वा केली नाही: संवेदनांना मिळणाऱ्या ह्या राजेशाही मेजवानीकरिता कुठलीही किंमत मला महाग वाटली नसती; आणि ह्याची परिणती म्हणून, रक्ताळलेली, तुटलीफाटलेली, घायाळ झालेली अशी मी इतक्या अलोट आनंदात होते, की हा सगळा मिठ्ठास विध्वंस घडवून आणणाऱ्या कारागीराला मिठीच मारली. पण यापुढे लवकरच जेव्हा त्याने दुसरा हल्ला केला, तेव्हा ती सारीच जागा जरी दुखरी असली तरीदेखील त्या राजसगुणी द्रवपदार्थामुळे तिथली भगभग शांत झाली; माझं सारं कुजबुजतं विव्हळणं बंद पडलं, आणि वेदना झपाट्याने वितळून जाऊन सुखात पालटून गेली. ह्या सुखाच्या बेहोशीत मी हरवून जाऊन माझ्या आत्म्याचा व देहाचा पुरता ताबा तिच्याकडे दिला; कारण माझे सारे मनोव्यापार आता संपलेले होते, आणि शारीर जाणीवांपुरताच काय तो माझ्यात जीव उरला होता. नावीन्याची व आश्चर्यानंदाची भर

पडल्यामुळे उंचावल्या गेलेल्या त्या भावनांचं आणि आंतरिक खळबळींचं वर्णन कोणाला कसं करता येईल?! माझ्यातला हा विशिष्ट अवयव ज्या गोड घासाकरिता इतके दिवस भुकेजला होता, तो आता तिथे मोठ्या खुमासदारपणे ठासून भरलेला होता; माझा लाडका पाहुणा जोपर्यंत वस्तीला होता, तोपर्यंत माझ्या साऱ्या ऐंद्रिय संवेदनांनाही तिथे बिऱ्हाड करून राहणं भाग पडलं; आणि मी त्याचं मनापासून स्वागत केल्याची परतफेड म्हणून, माझ्या ऐकीवातली कुठलीशी राणी ऐषारामी पेय देऊन तिच्या प्रियकराची खातिरदारी करीत असे त्याहीपेक्षा श्रीमंतीचा असा वितळलेल्या मोत्यांचा आहेर त्याने मला केला; माझ्यात तो फेसाळून ओतला जाताच, त्याचं कोरडं स्वागत करणं अशक्य व्हावं इतकी मीही विरघळून गेलेली असल्यामुळे माझ्यातल्या धारोष्ण प्रवाहासह ज्या पराकोटीच्या आनंदाने त्याला मी कडकडून भेटले, तो इथे उपस्थित असलेल्या मंडळींना अनोळखी मुळीच नसणार अशी माझी बालंबाल खात्री आहे!

"अशा तऱ्हेने मला माझ्या कामनांच्या अत्युच्च शिखरावर पोहोचवणारा हा प्रसंग अनपेक्षित खरा पण असंभाव्य मात्र नव्हता, कारण हा तरुण नुकताच विद्यापीठातून परत गावी आल्यानंतर त्याच्या आईच्या घरी सहजच आला होता; इथे तो पूर्वी एकदा येऊन गेला होता, पण निव्वळ अपघाताने. मी त्याला पूर्वी पाहिलेला नव्हता, त्यामुळे आम्ही दोघे एकमेकांना सांगोवांगीनेच ठाऊक होतो, आणि त्याच्या आईच्या बिछान्यावर पडून राहिलेल्या मला पाहताच, तिच्या वर्णनावरून मी कोण हे त्याने लागलीच ओळखलं होतं. बाकी सारं तुम्हाला सांगितलं. त्यावेळी व त्यानंतर अनेकदा हा पोरगा न सापडता सहीसलामत निसटला; तेव्हा ह्या प्रकरणाचे अनिष्ट परिणाम असे काही झाले नाहीत. परंतु माझ्या शरीरप्रकृतीतल्या ज्या उष्णतेमुळे कामसुख ही माझ्याकरिता एक प्रकारची जीवनावश्यक गरज बनली होती, तिने अनेक अविचारी लटपटींत मला फशी पाडल्यामुळे माझ्याकडचा पैसा गेला आणि शेवटी मी सार्वजनिक झाले. माझं नशीब बलवत्तर म्हणून, त्रास न होता निर्धोकपणे राहता येईल अशा ह्या आसऱ्यात मी येऊन पडले; नपेक्षा माझी बहुतेक पूर्ण वासलात लागली असती."

इथे लुईसा थांबली, तेव्हा आता ही लहानशी आत्मचरित्रं संपून मुलींनी आपापल्या खोल्यांत जाऊन संध्याकाळच्या मनोरंजनाची तयारी करण्याची वेळ झालेली होती; दरम्यान मी मिसेस कोलबरोबर राहिले, व काही वेळाने एमिली येऊन आम्हाला म्हणाली की पाहुणे जमलेले आहेत आणि तुमची वाट पाहताहेत.



## भाग सातवा

पहिला जिना चढून जाताच, एक अतिशय उत्तम कपडे घातलेला छानदार देखणा तरुण आमची वाट पाहात असलेला आम्हाला दिसला; त्या घरातली मौज प्रथमच चाखण्याच्या कामी हा माझा वाटाड्या असणार होता. मोठ्या आदबीने स्त्रीदाक्षिण्य दाखवीत त्याने मला नमस्कार केला; आणि यानंतर माझा हात धरून ज्या तुर्कस्तानी गालिचा पांघरलेल्या दिवाणखान्यात तो मला घेऊन आला, त्यामधली प्रत्येकच स्थावर वस्तू, अभ्यासू व चोखंदळ रसिकाच्या भोगसुखाकरिता अचूक उपयोगी पडायला हवी असा विचार मनात ठेवून निवडलेली होती; याखेरीज तिथे चौफेर मांडलेल्या दिव्यांनी ज्या प्रकाशाची उधळण करून अंतर्भागाला जिवंतपणा आणलेला होता, तो मध्यान्हीच्या सूर्यापेक्षा कोणत्याही दृष्टीने दुय्यम प्रतीचा तर नव्हताच; पण कदाचित त्याच्या मार्दवामुळे अधिक सुखावणारा, आणि आनंदसोहळ्याकरिता अधिक अनुकूल असा होता.

माझा प्रवेश होताक्षणीच उपस्थितांत पसरत गेलेला वाहवा करणाऱ्या शब्दांचा गुंजारव माझ्या कानी पडून मी आनंदून गेले; आता तिथे माझा 'खाजगीतला' धरून (प्रत्येकीच्या त्या त्या वेळच्या जोडीदारासाठी हा त्यांचा रुळलेला शब्द होता) एकूण चार पुरुष, तोलूनमापून निवडलेले तोकडे आणि ओघळते कपडे घातलेल्या तीन तरुणी, ह्या शिक्षणसंस्थेची स्वामिनी आणि मी, असा गोतावळा जमलेला होता. वर्तुळातल्या प्रत्येक व्यक्तीने चुंबन घेऊन माझं स्वागत केलं; पण त्यातसुद्धा पुरुषी चुंबनांतल्या कामनाप्राबल्यामुळे दोन्ही लिंगामधला फरक अधोरेखित होतच होता. इतके अनोळखी लोक एकाच वेळी मला वेढून, मिठीत घेऊन, माझी विचारपूस करीत असल्यामुळे मी दबून व बावरून गेले; परिणामी, त्यांच्या प्रशंसेमागे आणि रसरशीत आलिंगनांमागे जी आनंदी व उत्साही मनोवृत्ती होती, ती निदान तात्काळ आत्मसात करणं मला शक्य झालं नाही.

त्यांनी मला निर्वाळा दिला तो असा, की ज्यावर सहज उपाय करता येईल असा एकच दोष वगळला तर मी त्यांना शंभर टक्के पसंत पडेन अशीच आहे, आणि तो म्हणजे माझा लाजाळूपणा; अधिक लज्जत यावी म्हणून ज्यांना या गुणाची आवश्यकता वाटते अशांना कदाचित त्यात सौंदर्य आढळेलही; पण आमचा सिद्धान्त असा आहे की ह्या दोन्ही गोष्टींचं मिश्रण करण्यात औचित्य नाही, कारण त्यामुळे सुखरसाचं मनसोक्त पान करीत असतानाच पेला फुटून सगळा विचका होतो; म्हणून आम्ही लाजाळूपणाला आमचा कट्टर वैरी समजतो, आणि कुठेही भेटल्यास त्याला मुळीसुद्धा दयामाया

दाखवीत नाही. मनोरंजनाचे जे कार्यक्रम यानंतर झाले, त्यांच्याशी ही प्रस्तावना विसंगत नव्हती.

टिवल्याबावल्या आणि चावटपणा करण्यात हा सारा आनंदमार्गी कंपू अगदी मनापासून रमून गेलेला असतानाच आता काही उंची खाद्यपदार्थ आत आणण्यात आले; आम्ही सारे बसून घेताच माझा विशिष्ट मनसबदार माझ्या शेजारीच येऊन टेकलेला होता, आणि बाकी सगळी जोडपी फार काटेकोर उपचार किंवा क्रम न पाळता कुठे ना कुठेतरी होती. नाजुक चिवचिवाट व उत्तम प्रतीची वाईन यांमुळे सारा संकोच लवकरच हद्दपार झाला; मर्यादा सोडून फारशा वाहवत न जाता गप्पा अगदी छान रंगल्या: कृतीची वेळ येण्यापूर्वी मनातल्या प्रतिमा शिळ्या करू नयेत, किंवा बडबड माजवून कल्पनांची वाफ होऊ देऊ नये, हे या सुखास्वादाच्या अभ्यासकांना पक्कं ठाऊक होतं. पण मध्येमध्ये चटकचुंबनं ढापण्यात आलीच, आणि गळयाभोवतालच्या एखाद्या रुमालाने तकलादू अडथळा पुढे केलाच तर त्याचा अवाजवी मान ठेवला गेला नाही: हालचाल न केल्यास सहसा ज्यांना अस्वस्थ वाटतं, असे पुरुषी हात एव्हाना कामाला लागलेलेच होते; आणि उभयपक्षी डिवचाडिवची आता इतक्या विकोपाला पोहोचली की नाचगाणी सुरू करावीत असा प्रस्ताव माझ्या खाजगीतल्याने मांडताच त्याला सर्वांकडून ताबडतोब दुजोरा मिळाला: तो हसून म्हणाला त्याप्रमाणे हत्यारं आता जुळलेली होती. मिसेस कोलला जीवनाची प्रगल्भ जाण असल्यामुळे, गायब होण्याकरिता हा आपल्याला इशारा असल्याचं तिने समजूतदारपणे ओळखलं; आणि स्वत: लढण्याची उमेद राहिलेली नसल्याकारणाने, युद्धाची तयारी करून देण्यावर समाधान मानून, वार कसे करायचे हे आमच्या बुद्धीवर सोपवून ती रणभूमी सोडून निघून गेली.

ती जाताच मधलं टेबल बाजूला हलवून त्याचा साईड-बोर्ड तयार झाला; त्याच्या जागी एक दिवाण आणण्यात आला, आणि याचं प्रयोजन काय असं मी माझ्या खाजगीतल्याला कुजबुजत विचारताच तो म्हणाला, की विशेषेकरून तुझ्यासाठी हा सोहळा आयोजित करण्यात आलेला आहे, आणि सुखामध्ये वैविध्याची जी आम्हाला हौस आहे ती भागविण्याचा उपस्थितांचा बेत आहे; अर्थात असाही एक हेतू आहेच, की संकोच किंवा बुजरेपणा हा सुखाकरिता विषासमान असतो असं आम्ही समजत असल्यामुळे तुला थोडाही तो शिवला असल्यास मोकळेपणाने सार्वजनिक आनंदसोहळा भरवून तो मोडून काढावा; आता तसं पाहिलं तर आम्ही मधूनमधून सुखसिद्धीचा उपदेश करतो हे खरं, आणि शास्त्रोक्त वचनांचं स्वत: पालन करतो हेही खरं, पण तरीदेखील फार उत्साहाने धर्मप्रसार करावा असा मक्ता आम्ही घेतलेला नाही: अर्थात जी सुंदर मुलगी आम्हाला तितक्या योग्यतेची वाटेल व जिची रीतसर तयारी असेल, तिची शिकवणी घेण्यातला आनंद आम्ही अव्हेरीत नाही; पण ते काही असलं तरी नवख्या

कोवळ्या मुलीसाठी अशा प्रकारची योजना फार जालीम आणि धक्कादायक ठरू शकत असल्यामुळे, जुन्या मुरलेल्या लोकांनी आधी दाखला घालून द्यायचा आहे; आणि यानंतर मात्र, तुझ्या पहिल्या प्रयोगाची जबाबदारी माझ्यावर असल्याकारणाने, त्यांच्या पावलावर पाऊल टाकून चालायला तू कचरणार नाहीस अशी मी आशा करतो; पण तरीदेखील शेवटी हा सोहळा मुळात आनंदाचा असल्यामुळे इथे सक्तीला किंवा जबरदस्तीला वाव नाही, तेव्हा भाग न घेण्याचं तुला पूर्णपणे स्वातंत्र्य आहे.

माझ्या चेहऱ्याने खचितच माझा अचंबा व्यक्त केला असणार, पण माझ्या मौनाने माझी संमती व्यक्त केली. आता मी जहाजात बसलेली होते, आणि सहप्रवासी जिथे नेतील तिथे जायला माझी बिनशर्त तयारी होती.

घोडदळात अग्रणी असणारा एक सैन्याधिकारी व हिरव्या तरुणाईची, अतिशय गोड अशी मृदुलांगी कामिनी लुईसा, हे जोडपं आता नृत्याची सुरुवात करण्याकरिता पुढे सरसावलं. 'नाही कशी म्हणू तुला' अशा आविर्भावात ती त्याच्यामागोमाग दिवाणाकडे गेली, त्याने तिला खाली पाडलं, आणि अभिलाषा आवरेनाशी झाल्याने उतावीळ होऊन काहीशा राकट धसमुसळेपणाने तिचं शरीर लांबलचक आडवं केलं. आपलं डोकं उशीवर ठेवून ती अशी आरामात पडून राहिली, आणि आपल्याला पुढे काय करायचं आहे यातच इतकी गढून गेली, की आम्ही आजूबाजूला असल्याची तिला थोडीसुद्धा जाणीव किंवा पर्वा नव्हती. तिचा पेटिकोट व आतला सदरा वर फेकला जाताच, कल्पनेची परिसीमा गाठतील इतके देखणे घोटीव पाय व मांड्या उपस्थितांना पाहायला मिळाल्या, आणि आता केसांनी आच्छादलेल्या नयनरम्य पर्वताखालील ती सुंदरशी मांसल घळ स्पष्ट दिसू लागून, तिच्या बाजूच्या दोन मऊसर, नाजूक व फुगीर बांधांच्या मधोमध असलेला दरवाजा आम्हाला आग्रहाने आत बोलावू लागला.

भाराभर लेस पांघरलेल्या कपड्यांच्या ओझ्यातून बाहेर पडून आता तिचा मनसबदार तयारीत आला होता; आणि त्याने सदरा उतरवताच, त्याची पलटण अगदी कळीला येऊन पुढेमागे हलते आहे व चढाईकरता सज्ज आहे असं आम्हाला दिसून आलं. पण लांबीरुंदी नीट पाहण्यासाठी आम्हाला सवड न देता तो लगोलग आपल्या मोहक प्रतिस्पर्ध्यावर कोसळला, आणि थेट निशाणावरच लावून धरताच तिने त्याला वीरकन्येच्या धैर्याने न डगमगता आत घेतलं; कारण सुखभोगाची चव जिच्या प्रकृतीमध्येच पक्की मुरलेली आहे, आणि संवेदना जशा जाणवतात तशाच तंतोतंत जिच्या चेहऱ्यावर

उमटतात, अशी दुसरी कुणी अभावानेच मिळाली असती: आपलं महासामर्थ्यशाली अवजार त्याने तिच्यात सरकवल्याचा परिणाम म्हणून तिचे डोळे आनंदाने चमचमताना आम्हाला दिसू लागले; पण यानंतर त्याने ते जाईल तिथपर्यंत अंशाअंशाने आत नेऊन तिला खूष करून टाकताच, त्याच्या उपस्थितीमुळे होऊ लागलेली चाळवाचाळव इतकी खवळून उठली व तिला इतक्या जोरकस टोच्या मारू लागली, की आत्तापर्यंत स्वत:मध्येच मग्न राहून ह्या गोड संवेदनांचा आनंद चाखत राहण्याव्यतिरिक्त कशाचंच भान नसलेली लुईसा, आता मात्र लवचीक अंगाने एकसाथ वरखाली होत त्याने दिलेल्या ढुशांना प्रत्युत्तर करू लागली; अत्यंत कारुण्यमयी सुस्कारे सोडीत तिने असा अचूक ताल पकडला, की तिच्या कुजबुजत्या कण्हण्याच्या एकामागोमाग एक येणाऱ्या उद्गारांची मोजदाद करून किती वार झाले हा आकडा नेमका सांगता आला असता; याचवेळी तिचे अस्वस्थ पाय वळवळ करीत, झटके देत, आडवेतिडवे होत त्याच्या पायांत गुंतून पडत होते, आणि आनंदाच्या कल्लोळामध्ये एकमेकांबरोबर दिली-घेतली जाणारी लाडिक आषुकमाषुक चुंबने, व त्यांबरोबरचे न दुखावणारे लसलसते प्रेमळ चावे, हा साराच प्रकार त्यांना संगनमताने उत्कलनबिंदूकडे घेऊन चालला होता.

आणि लवकरच तो येऊन दाखल होताच, सुखातिरेकाने सैरभैर होऊन, स्वत:वरची वेसण तुटून, लुईसा भ्रमिष्टासारखी किंचाळली: अहो साहेब! ... माझे साहेबहो!... नका हो मला दया दाखवू! आहाहाहा!"... तिच्या तोंडचे शब्द अडखळू लागले, व त्यांची जागा हृदयातून आलेल्या सुस्काऱ्यांनी घेतली, गोड मरण येऊन तिने आपले डोळे मिटले; आणि त्याच क्षणी, आत्तापर्यंत त्वेषाने तिला हाकणारा घोडेस्वार अचानक थांबून क्लान्त झाला, त्याचा श्वास वेगाने होत राहून त्याला धाप लागली, सुखाची रसचेतना त्याला तात्पुरती सोडून गेली; आणि ह्या साऱ्या खुणांवरून आम्हाला सहजच कळून चुकलं, की तिच्या कलेवरामध्ये आता रसायन टोचण्यात आलेलं आहे.

तो खोगीरातून बाजूला होताच लुईसा टुणकन उठून उभी राहिली, तिने आपला पेटिकोट झटकला, आणि माझ्याकडे धावत येऊन मला एक चुंबन देऊन साईड-बोर्डकडे खेचू लागली; आता तिचा मनसबदारच तिच्या दुसऱ्या हाताला धरून तिला तिथे घेऊन आला, त्या दोघांचा मान ठेवण्याकरिता म्हणून त्यांनी मला एक ग्लासभर वाईन आग्रहाने प्यायला लावली, आणि लुईसाने मांडलेला प्रस्ताव अगदी रास्त होता असं चेष्टेत मान्य करायला लावलं. यावेळेपर्यंत दुसरं जोडपं सैन्यभरतीसाठी दाखल झालेलं होतं: एक तरुण बॅरोनेट, आणि कमालीची गोड, नाजुक, व सर्वांना हवीहवीशी वाटणारी अशी ती हॅरिअट. माझा धीरललित नायक ही बातमी सांगण्याकरिता माझ्याजवळ आला, व मला रणभूमीच्या दिशेने परत घेऊन गेला. आणि खरोखर सांगायचं म्हणजे, जी अप्रतिष्ठित भूमिका तिच्या

वाट्याला आलेली होती, त्याकरिता असाव्या लागणाऱ्या मनोवृत्तीला इतक्या गोडव्याची, शालीनतेची व सौम्य नखरेलपणाची जोड देणारी स्त्री तिच्या व्यवसायात दुसरी मिळाली नसती. 'थोडेदेखील आढेवेढे न घेता तुम्ही म्हणाल ते आनंदाने करीन', अशा वृत्तीची स्पंदने तिच्या वागणुकीतून व हावभावांतून दिसून येत होती, पण त्यांत बाजारूपणाचा किंवा निर्लज्जपणाचा लवलेशही नव्हता. आणि याहीपेक्षा आश्चर्याची गोष्ट अशी की उघड्यावर साऱ्या लोकांसमोर हा सुखभोगाचा रंगसोहळा घडत असताना, त्याच्या मधोमध तिचा मनसबदार तिच्याशी लाडाकोडाचं गुटरगू करण्यात पुरता बुडून गेलेला होता; आपल्या प्रेमभावना बोलून दाखवून त्याने तिच्या हृदयात स्थान निर्माण केलेलं होतं, पण निदान काही काळापुरते तरी ह्या घराशी ते दोघे व्यवहाराने बांधले गेल्यामुळे, ही संस्था वसवण्यात मुळात त्याचाच सिंहाचा वाटा जरी असला तरीदेखील तिचे दंडक त्याला थोडेफार पाळावे लागत होते.

रिकाम्या झालेल्या दिवाणाकडे हॅरिअटचा मनसबदार तिला घेऊन जात असताना ती माझ्याकडे पाहून लाजत होती, आणि कशाचंही समर्थन करू शकतील अशा डोळ्यांनी मला हळुवार आर्जवे करीत होती, की नाही म्हणण्याची सोय नाही अशा अवस्थेत तिला ज्या पायरीपर्यंत आणण्यात आलेलं होतं, तिकडे मी शक्य तितक्या क्षमाशील वृत्तीने पाहावं. तिचा प्रियकर असंच ज्याला म्हणायला हवं, त्याने तिला दिवाणाच्या पायाकडच्या बाजूला बसवलं, आणि तिच्या गळ्याभोवती हात घालून ओठांवर एका समरसून घेतलेल्या चुंबनाचा प्रयोग केल्यामुळे ह्या प्रसंगातून जाण्याकरिता तिला चांगलाच हुरूप आलेला दिसला; हे चुंबन घेताना त्याने तिचं डोकं हळूच मागे नेताच मुद्दाम तिथे ठेवलेल्या उशीवर ते विसावलं, आणि तिच्याबरोबरच तोही कलत गेल्यामुळे तिची ही अधोगती तिला सुसह्य झाली व पसंतही पडली.

ह्या स्थितीला पोहोचताच, जणू काही त्याने आमच्या मनांतल्या इच्छा ओळखल्या असाव्यात; किंवा विषयसुख घेत असतानाच, कल्पनेच्याही पलिकडे विलक्षण अशा सौंदर्यस्थळांचा मालकीहक्क तूर्तास स्वत:कडे असल्याबद्दल त्याला मिजास मारायची असावी, याकरिता त्याने तिचे स्तन स्वत:च्या शोधक स्पर्शांना व आमच्या सामायिक दृष्टीला खुले केले; आणि अहाहा! ओवाळून प्रेम करायला शिकवणारी काय ती गोड पुस्तकं! काय तो त्यांचा अप्रतिम घाट! लहानसे, गोल, घट्टसर आणि पांढरेशुभ्र: त्यांच्या त्वचेचा पोत किती मुलायम व स्पर्शाला किती सुखावणारा असेल! आणि त्यांवर मुकुट घालणारी स्तनाग्रं म्हणजे सौंदर्याच्या मिठ्ठास कळ्याच जणू. त्यांना वाचीत राहून त्याने स्वत:च्या डोळ्यांना मेजवानी दिली, त्या चविष्ट अर्धगोलांवर बिंबवलेल्या खमंग चुंबनांनी आपल्या

ओठांना मेजवानी दिली, आणि आता तो खाली चालला. अजून तिचे पाय जमिनीवरच असताना, अचानक ती दचकू किंवा बिथरू नये याची अतिशय काळजी घेत त्याने तिचा पेटिकोट गुंडाळण्याऐवजी अंशाअंशाने वर सरकवला; आता जणू काही हा इशारा देण्यात आलेला आहे असं समजून लुईसा व एमिलीने शुद्ध चावटपणा करायचा म्हणून तिचा एकेक पाय पकडला, आणि तिला आराम वाटण्याकरिता ते दोन्हीं चांगले आ वासून फाकवून धरले. यामुळे स्त्रीदेहाच्या आकर्षणांचा पृथ्वीतलावरील सर्वात मोठा खजिना उघडा झाला, किंवा अधिक योग्य शब्द वापरायचा तर प्रदर्शित झाला. माझ्याखेरीज सर्व उपस्थितांनी तो अनेकदा पाहिलेला होता; पण तरीदेखील जणू तो प्रथमच डोळ्यांसमोर येत असावा इतकेच ते दिपून, भारावून, हरखून गेलेले दिसले. इतक्या अचाट सौंदर्याला चिरंतन नवेपणाचा मान मिळाल्याखेरीज कसा राहील?

तिच्या मांड्या इतक्या विलक्षण कसबी कारागिरीने घडवलेल्या होत्या, की होत्या त्यापेक्षा कमी किंवा अधिक मांसल असत्या, तर परिपूर्णतेच्या सर्वोच्चबिंदूवरून खाली घसरल्या असत्या. तिचं गोल, गुळगुळीत, पांढरंशुभ्र पोट ज्या ठिकाणी संपत होतं, तिथे या दोघींनी एकत्र येऊन मारून ठेवलेल्या गोड फुलीमुळे त्यांच्या सौंदर्याला आभूषण मिळून ते शतपटीने खुललं होतं; आणि त्या फुलीला शेजार म्हणून, पार्श्वभूमीपासून भित्तिशिल्पाप्रमाणे उठून दिसणाऱ्या दोन मऊसर, फुगीर पुलांच्या मधोमध जी घळ निसर्गदेवतेने कोरलेली होती, ती आपल्या छोटेखानी नाजुकपणामुळे व प्रमाणबद्धतेमुळे तिच्या सर्वसाधारण अंगयष्टीला तंतोतंत खुलून दिसत होती. नाही! इतकं सुरेख कोरीव काम निसर्गात इतरत्र कुठे आढळेल हे मान्य करायला मी तयार नाही! आणि वसंतातल्या मऊशार शेवाळाची जी घनदाट पडछाया त्या घळीला कमानीप्रमाणे झाकून होती, तिच्यामुळे ह्या निसर्गदेखाव्याच्या समृद्धतेला जी हळुवार पखरण व भावनेला स्पर्श करणारी उष्णचेतना लाभलेली होती, ती शब्दांनीच काय तर विचारांच्या रंगद्रव्यांनीही चितारण्यापलीकडली होती.

प्रेमात आकंठ बुडालेला हा विलासी मनसबदार ह्या दृश्यसुखाने भान हरपून, मुग्धपणे पाहातच राहिल्यामुळे आमच्याही डोळ्यांना पोटभर खाऊ खायला पुरेसा वेळ मिळाला (अजीर्ण होण्याचा धोका नव्हता!), पण आता मात्र आनंदसिद्धीसाठी आवश्यक त्या सामग्रीकडे त्याचं लक्ष गेलं; आणि जलशाचा प्रमुख सूत्रधार व आम्ही प्रेक्षक यांच्यामधला सुती पडदा बाजूला करताच प्रकट झालेल्या राजबिंड्या आकारावरून अशी ग्वाही मिळाली, की त्यामागचा बोलविता धनी हा स्त्रीचा मर्मभेद करू शकेल असा खराखुरा विजयी वीर आहे. याशिवाय इतर सर्वच अंगांनी तो एक कर्तबगार पुरुष होता, आणि तारुण्यसुलभ चैतन्याने मुसमुसलेला होता. हॅरिअटच्या सख्यांनी कमाल मर्यादेपर्यंत

ताणून फाकवून धरलेल्या दोन पायांमध्ये उभा राहून, एका हाताने त्याने निसर्गाच्या लुसलुशीत तोंडाचे ओठ हळूच विलग केले, आणि वर पोटाकडे निर्देश करीत अवघडून उभं असलेलं आपलं भलंथोरलं उपकरण दुसऱ्या हाताने खाली आणून सापळ्यापाशी लावलं; त्याच्या बोटांनी उघड्या धरून ठेवलेल्या ओठांमधोमध गुलाबी शेंदरी रंगाचं ते रुंद डोकं आत शिरलं: तिथे त्याने घरटं करताच तो किंचित रेंगाळला, तेव्हा तिच्या मांड्यांना आधार देण्याचं आवडतं काम या दोघी मुलींनी त्याच्या ढुंगणाकडे सुपूर्द केलं; आणि आता मात्र, कातल्या जाणाऱ्या सुती धाग्याप्रमाणे आपली सुखभावना लांबवत राहावी, व तिच्या आयुर्मानातला जास्तीतजास्त अवधी कृतिशीलतेसाठी मिळावा, याकरिता तो इतक्या कमालीच्या धीम्या गतीने आपलं उपकरण आत ढकलीत राहिला की आमच्यासमोर ते इंचाइंचाने दिसेनासं होत गेलं; शेवटी एकदाचं ते प्रेमाच्या मऊमुलायम प्रयोगशाळेत पूर्णपणे लुप्त झालं, आणि हिरवळीने आच्छादलेली दोन्ही बाजूंची टेकाडं एकमेकांविरुद्ध भिडली.

ही आनंदमयी उर्जा या गोड मुलीमध्ये कणाकणाने भरली जात असताना तिचा विलक्षण परिणाम कसकसा होत होता, आणि तिच्या अंगातील सुखवेदना अंशाअंशाने वाढत असताना तिचं लावण्यही कसकसं खुलत जात होतं, हे आम्हाला मधल्या कालावधीत स्पष्टपणे निरखून घेता आलं. तिचा तोंडवळा व संपूर्ण अंगयष्टी अधिक चेतनोत्फुल्ल झाली, गालांचा मूळचा फिकट लाजरेपणा आता गौरवर्णाला मागे टाकून फुलासारख्या तजेलदार लालभडक रंगाने चमकू लागला, जात्याच लखलखीत असलेले डोळे दशगुणित तेजाने ठिणग्या उधळू लागले; तिचं मांद्य लोपलं, आणि शरीरात उत्तेजनांचा सळसळाट होऊन ती ओतप्रोत जिवंत दिसू लागली.

त्याने मर्मस्थानी पाचर मारून ह्या बिचाऱ्या प्राण्याला खिळवून ठेवल्यामुळे हालचाल बंद होऊन अगतिक अवस्थेत ती पडलेली होती; पण आता मागेपुढे घर्षण सुरू करून त्या नाजुक तारेवर आपल्या शस्त्राने धून वाजवीत त्याने तिला खडबडून जागी केली, व तिच्या हृदयावरच अशी टिचकी मारली की स्वतःच्या शेलाट्या अंगयष्टीला झेपेल इतपत वेगाने का होईना पण त्याच्या हालचालींना साथ दिल्याखेरीज तिला राहवेना; पण काही वेळाने सुखभावनेचे खवळलेले वृश्चिकदंश उत्कर्षबिंदूपर्यंत वर येऊ लागताच त्या असह्य होणाऱ्या संवेदनांनी ती रानमोकाट झाली, आणि गोड बेभानीमध्ये हरपून जाऊन आपले हातपाय इतस्ततः झाडू लागली; याच बेभानीचा जाहीरनामा म्हणून त्याच्या बाजूने ढुशा अधिक झटाझट व उतावळ्या झाल्या, तो हिंस्र आचके देऊ लागला, त्याचे उच्छ्वास पेट घेऊ लागले, श्वासांची गती वाढून ते कष्टप्रद झाले, भिजलेल्या आगीचे लोळ डोळ्यांतून बाणांप्रमाणे भिरभिरू लागले: सुखाचा प्राणांतिक आचका आता केव्हाही येऊ शकेल, ही बातमी तत्परतेने देणाऱ्या

ह्या साऱ्या खात्रीच्या खुणा होत्या.

उचित वेळी तो आला: सुखस्फोटात बॅरोनेट आघाडीवर होता, आणि तो वितळत असल्याची लक्षणे जाणवताच मोक्याच्या क्षणी तीही त्याला सामील झाली; हा कालबिंदू नेमका गाठून, नव्या आवेगाने स्वत:चे ओठ तिच्या ओठांना चिकटवीत, असह्य झालेल्या सुखाने झपाटलं असल्याची सारी चिन्हे दर्शवीत, त्याने तिला निर्वाणीच्या गुदगुल्या केल्या; यामुळे आतून थरारून जाऊन, ज्या काही जडसूक्ष्म वस्तूंची ती स्वामिनी होती त्यांचा पाऊस पाडून तिने याला प्रत्युत्तर दिल्याचं आम्हाला उघडच कळून आलं; तिच्या साऱ्या अवयवांतून एक हलकी शिरशिरी धावत गेली, आणि अंग ताणून, चलनवलन थांबवून, धापा टाकीत, साखरपेरल्या सुखाचं मरण मरत ती पडून राहिली; तिच्या भावनांचा हा आविष्कार विकोपाला गेलेला असताना, जवळजवळ पूर्ण मिटलेल्या पापण्यांतून बुबुळांची काळी टोकं मात्र दिसत राहून, डोळयांचा उर्वरित भाग आनंदातिरेकाने उर्ध्व लावून वर खेचला गेला होता; मोहक तोंड म्लानपणे उघडं पडलं होतं, जिभेचा शेंडा पांढऱ्याशुभ्र दातांच्या खालच्या रांगेवर निष्काळजीपणे मरगळून रेलला होता, आणि तिच्या ओठांचा निसर्गत:च माणकासारखा लालभडक असलेला रंग नवोन्मेषाने झगमगत होता. खोलात शिरण्यासारखा हा अभ्यासविषय नव्हे का? आणि म्हणूनच तिचा प्रेमिक मन लावून, नेटाने तिच्यावर काम करीतच राहिला; आता शेवटच्या थेंबापर्यंत दाबून, पिळून निघून, अर्क शोषला जाताच त्याने तिला एक आसुसून चुंबन दिलं, आणि कामना शमलेली आहे पण प्रेम विझलेलं नाही अशा अवस्थेत तिची रजा घेतली.

तो उतरताच मी तिच्याकडे धावले व दिवाणाशेजारी बसून तिचं डोकं वर उचलून घेतलं, पण घडलेल्या प्रकारामुळे तिची उडालेली भंबेरी आणि वाटत असलेली लज्जा छपविण्याकरिता सौम्य नकार देत तिने ते पुन्हा माझ्या छातीवर टेकवलं; यानंतर थोडा अवधी घेत ती आपलं मन कलाकलाने शांत करीत राहिली, आणि मला सोडून साईड-बोर्डकडे गेलेल्या माझ्या खाजगीतल्याने तिला हुशारी वाटावी म्हणून हाती दिलेली ग्लासभर वाईन तिने स्वीकारली; दरम्यान तिचा खाजगीतला स्वत:चा कारभार आटोक्यात आणून बटणे लावण्यात गुंतलेला होता, आणि हे एकदाचं आवरताच, ती त्याच्यावर म्लानपणे रेललेली असताना, तिच्यासह तो दिवाणाच्या शेजारी आमच्या बाजूला आला.

आता एमिलीचा साथिदार तिला नृत्यासाठी घेऊन जाण्याकरिता पुढे सरसावला, तशी ही गोरीपान,

गोड स्वभावाची मुलगी पटकन उभी राहिली; गुलाबाच्या व लिलीच्या फुलाला तोंड चोरायला लावील असा वर्ण, अतिशय गोजिरवाणे अवयव, आणि गावाकडच्या मुली ज्यामुळे लोभस वाटतात ते ताज्या रक्ताने सळसळणारं टपोरं आरोग्य, हे सारं तिच्यापाशी असल्याच्या भरवशावर जर तिला सुंदर म्हणता येणार असेल, तर ती खचितच सुंदर होती आणि प्रकर्षाने डोळ्यांत भरावी अशीच होती. ती उभी असताना, काचोळीच्या फारशा जाचक नसलेल्या तुरुंगातून तिच्या मनसबदाराने तिचे स्तन बंधमुक्त करून त्यांना त्यांचं प्राकृतिक स्वातंत्र्य परत दिलं, पण त्यांचा गोरेपणा इतका विलक्षण झगझगीत होता, की ते दृष्टीसमोर येताच खोलीत आणखी एक दिवा लागला आहे असा आम्हाला भास झाला; मोठ्या उत्साहाने फुलून वर येऊन त्यांचा सुडौल व पुष्ट उभार तयार झालेला होता, आणि पाहणाऱ्याच्या डोळ्यांकरिता हा परिणाम, जणू मांस घट्ट होऊन संगमरवर बनावा अशासारखा होत होता; परंतु संगमरवराची गुळगुळीत चमक जरी त्यांनी हुबेहूब उचललेली असली, तरीदेखील रंगांचा रसरसलेपणा व झळाळी यांबाबतीत मात्र गोऱ्या वर्णावर रेखाटलेल्या नीलांनी निव्वळ दगडी पांढरेफट्टपणाचा सपशेल पाडाव केलेला होता. इतका प्रक्षोभ उत्पन्न करणारी प्रलोभने जवळच असताना त्यांचा मोह टाळणं कुणाला शक्य होईल? त्याने तिच्या स्तनांना, सुरवातीला जेव्हा हलकेच हात लावला तेव्हा तेथील त्वचेच्या गुळगुळीत घोटीवपणाने हुलकावणी देऊन तो पृष्ठभागावर घसरवला; यानंतर त्याने ते दाबताच, आतमध्ये भरलेल्या लवचीक मांसावर जोर पडून ते हाताला मागे ढकलीत पुन्हा उफाणत उसळून येऊन दाब क्षणार्धात पुसला गेला: तिच्या साऱ्या अवयवांचा पोत एकसारखा असाच होता, आणि भरगच्च मांसामुळे अंगभर माजलेल्या रगेल घट्टपणाची स्पर्शाला फार तलफ येत असे.

कामचेष्टेच्या ह्या उपशाखेतला आनंद पुष्कळसा घेऊन झाल्यानंतर, त्याने तिच्या पेटिकोटाची व अंतर्वस्त्राची कमरेपाशी खोचून चिंचोळी गुंडाळी करताच, सर्व बाजूंनी स्वच्छ वस्त्रहीन अशा अवस्थेत ती आता उभी राहिली. यामुळे वाटणारी लज्जा तिच्या गोड चेहऱ्यावर विखरून पसरली, आणि विजयवैभवाने प्रदर्शित केलेल्या तारुण्याच्या व सौंदर्याच्या आभूषणांमुळे शेखी मिरवण्याचा वास्तविक तिला पुरेपूर हक्क असूनही असं स्पष्ट झालं की दयेची याचना करण्याकरिता तिने डोळे जमिनीकडे लावलेले आहेत. तिचे पाय अतिशय बांधेसूद होते, आणि एकमेकांना अगदी लगटून ठेवलेल्या मांड्या इतक्या गोल, गोऱ्यागोऱ्या, पुष्ट आणि मांसल होत्या की स्पर्शाचा अत्यानंद घेण्याचं यापेक्षा आवर्जून आमंत्रण इतरत्र कुठून आलं नसतं; तेव्हा तो घेण्यात त्याने मुळीच कसूर केली नाही. सुरवातीला मनामध्ये साहजिकच उद्भवलेल्या शालीनतेपोटी तिने त्या ठिकाणी नेलेला हात त्याने हलकेच बाजूला करताच, आखुडशी लांबी घेऊन खाली चाललेल्या व मांड्यांत आपलं टोक लपवणाऱ्या त्या मऊ

चिंचोळया कपारीचं आम्हाला पुरतं नव्हे तर ओझरतं दर्शन झालं; पण तरीदेखील तीवर छानशी वाढलेली सोनेरी-किरमिजी कुरळया केसांची झालर सहजच दिसून येत होती, आणि त्या केसांची रेशमी झिलई व आजूबाजूचा शुभ्रपणा यांमुळे सुखावणारा दृष्टिविरोध निर्माण झालेला असून, त्यांच्या सौम्य भुऱ्या सावलीमुळे ह्या शुभ्रपणातील आभा विशेषच उठून दिसत होती.

ती उभीच असताना, तिच्या मांड्या उघडून ह्या आकर्षणकेन्द्राचं जास्त व्यापक दृश्य आम्हाला दाखवण्याचा तिच्या मनसबदाराने प्रयत्न केला; पण तिच्या सध्याच्या पवित्र्यात हे नीटसं साधत नसल्यामुळे तो तिला दिवाणाच्या पायाशी घेऊन गेला, आणि तिथे एक उशी आणून तिचं डोकं त्याने हलकेच खाली वळवलं; जेणेकरून घडी घातलेल्या हातांवर रेलून, फाकवलेल्या मांड्या दिवाणाच्या एकेका बाजूला ठेवून, ती स्वार झाली; आणि मागे शरीराचं पोक काढून, कमरेखाली निर्वस्त्र असलेल्या अवस्थेत तिने आपला संपूर्ण पार्श्वभाग आमच्यासमोर आणला. गुबगुबीत, गुळगुळीत व लक्षवेधी अशा तिच्या नितंबांनी, चलनवलन करणाऱ्या बर्फाचं अमाप पीक आल्यामुळे पाहणाऱ्याचे डोळे ओतप्रोत भरून जावेत असं एक शिवारच बनवून ठेवलेलं होतं; पण दोन पांढऱ्याशुभ्र कड्यांमधोमध असलेल्या चिंचोळया दरीने त्याला खाली येण्याची आज्ञा केल्यामुळे, वनराईने झाकोळलेल्या कपारीमध्ये आकर्षित होऊन अखेरीस त्याचा शेवट झाला होता; एमिली वाकलेली असल्याकारणाने ह्या मनोहारी देखाव्याच्या सरहद्दीवरील ती कपार काहीशी आ वासून पाहात होती, जेणेकरून भोवताली झगमगणाऱ्या गोरेपणाच्या पार्श्वभूमीवर विवराच्या आतमधला हा छानदार लालचुटुक भाग दृष्टीसमोर येऊन, झुळझुळीत पांढऱ्या रेशमाला धारदार चाकूने गुलाबी छेद दिल्याचा प्रत्यय येत होता.

तिशीच्या आतबाहेर असलेला तिचा मनसबदार काहीशा स्थूलपणाकडे झुकलेला असला तरीसुद्धा अनाकर्षक मुळीच नव्हता; सुखभोग कोणत्या मार्गाने घ्यावा याकरिता मिळालेली ही इशारत त्याने ओळखली, व आणखी सुधारणा करण्याच्या उद्देशाने त्याच पवित्र्यात तिचं अंग नीट जुळवून, शेवटच्या पल्ल्यापर्यंत तिचा धीर टिकावा म्हणून तिला उत्तेजनार्थ चुंबने व मिठ्या चारून, तरतरीत होऊन तयारच असलेलं आपलं प्रकरण त्याने जेव्हा बाहेर काढलं, तेव्हा रुंदीच्या मानाने अव्वाच्या सव्वा असलेला त्याचा लांबलचकपणा विशेष अचंबा वाटायला लावणारा होता, कारण मेदवृद्धीकडे ज्यांचा कल असतो त्यांच्यात ही मिती इतकी अतिरेकाला गेलेली सहसा आढळत नाही. आणि आता जेव्हा अचूक व नेमकी योजना करून त्याने तलवार मुठीपर्यंत आत सरकवली, तेव्हा तिच्या तुर्कस्तानी घुमटांची गोलाई, आणि त्याचं पोट व मांड्या यांच्या मधोमध तयार झालेला अंतर्वक्र खोलगटपणा ह्या दोहोंचा चपखल मेळ बसून जो एकमेकांचा निकटसंयोग व उष्णस्पर्श झाला, तो सुखावणारा

नसणं शक्य नव्हतं. यानंतर त्याने आपल्या हातांनी तिच्या शरीराभोवती विळखा केला, आणि तिच्या मायावी स्तनांशी खेळण्याचं काम त्यांच्याकडे सोपविलं.

आता तो किल्ल्यात शक्य तितका शिरलेला आहे असं जाणवताच तिने उशीवरून डोकं किंचित उचललं, फार न ताणता मान वळवली; आणि गालांचा दाट गुल्हेरी रंग चमचमतो आहे, व मन खूष झाल्याने मुलायम गोड हसू आलं आहे, अशा आविर्भावात त्याने दिलेलं चुंबन पुढे होऊन स्वीकारलं: इथून पुढे त्याच्या खाजगी सुखाचा माग काढण्याच्या कामी त्याला एकटा सोडून, पुन्हा एकदा आपली लज्जा आणि छबी, हातांच्या आणि उशीच्या आडोशाला लपवून, त्याला अधिकाधिक सोयिस्कर होईल असा पवित्रा सांभाळीत ती निमूट राहिली; आणि यादरम्यान तो मात्र तिच्यावर पुन्हापुन्हा जोरकस ढुशा लावीत राहून, दोन्ही बाजूंच्या परस्परांना भिडणाऱ्या मांसल अवयवांतून घुमणारे आवाज काढीत राहिला; तो मागे होताच, तोंडाला फेस येऊन वेगाने हलत असलेल्या त्याच्या लांबलचक पांढऱ्या दांडूचा काही भाग उभयतांच्या मधोमध आम्हाला दिसून येई, आणि पुन्हा पुढे जाऊन तिला जुळताच मध्ये येणाऱ्या टेकाडांमुळे तो दिसेनासा होई.

अधूनमधून तो तिच्या स्तनांच्या अर्धगोलांवरून आपले हात बाजूला घेऊन, त्यांच्यावरचा दाब ह्या प्रसंगी त्याच्या गुबगुबीत नाकेबंदीचं लक्ष्य झालेल्या अधिक मोठ्या अर्धगोलांवर स्थलांतरित करीत होता; त्याने ते दाबून-कवटाळून धरले, त्यांच्याशी कुस्करी केली; पण इतकी तुफानी दौड करीत राहिल्यामुळे कालांतराने जेव्हा तिरीमिरीने त्याला गाठलं तेव्हा ती सुखाच्या इतक्या प्रचंड लोंढ्यासह आली, की धापा टाकीत, शुद्ध हरपून मरून जात, स्खलित होत असताना आपल्या सुंदर सोबतिणीचा टेकू घेण्याखेरीज त्याला गत्यंतर राहिलं नाही; पण आता हा ठार मारणारा गोडवा तिच्यापर्यंत पोहोचतो न पोहोचतो, तोच पायांतलं त्राण जाऊन, त्या पराकोटीच्या नशेपुढे शरण जात ती धडपडून दिवाणावर पुढे कोसळली, आणि जर ह्या सुखाच्या उबदार सापळ्यात फसूनच राहायचं तर त्यालाही तिच्या अंगावर पुढे कलंडणं भागच पडलं; जेणेकरून त्यांचे देह व सुखप्रवाह एकमेकांशी जोडलेलेच राहून, संगनमताने आनंद लुटण्याचा त्यांचा कट शंभर टक्के फत्ते झाला.

तो विलग होताच एमिलीसुंदरी उठून उभी राहिली, आणि आम्ही सारे तिचं अभिनंदन करण्यासाठी व तिच्याकरिता लगबगीने छोटीमोठी कामं करण्यासाठी भोवताली घोळका करून जमा झालो; कारण एक गोष्ट सांगायला हवी, की सुखांची देवाणघेवाण करीत असताना संकोच व बुजरेपणा यांना जरी हद्दपारी सुनावण्यात आलेली असली, तरीदेखील एकमेकांना सौजन्याने व सभ्यतेने वागवण्यात थोडीही कुचराई होत नसे: गावंढळ थट्टा, उद्धटपणा, चारगटपणा आणि पुरुषांच्या लहरींपुढे व

अभिलाषांपुढे शरण गेल्याबद्दल मुलींना कुत्सितपणे हिणवून बोलणं, यांतलं काहीही इथे नव्हतं. याउलट त्यांना चुचकारून व त्यांच्या मनावर फुंकर घालून, आपल्या परिस्थितीची त्यांना असणारी जाणीव कमी जाचक होईल असं पाहावं, ह्या दृष्टीने कशाचीही कसूर केली जात नसे. स्त्रीला, मग ती पुरुषांना सुख देऊन पोट भरत असली तरीदेखील, सन्मानाने व जपणुकीने वागवायला हवं, हा दंडक जेव्हा पुरुष मोडतात तेव्हा स्वत:च्याच आनंदाची ते किती हानी करून घेतात हे सहसा त्यांच्या लक्षात येत नाही. पण जो कला व शास्त्र दोन्हींही आहे, असा विषयसुख हा विषय कोळून प्यालेल्या ह्या नागरक वृत्तीच्या आनंदयात्रींनी मात्र हा धडा पुरेपूर आत्मसात केलेला होता; आणि त्यांच्या शिष्यसंप्रदायातल्या मुली जेव्हा त्यांच्या मर्जीपुढे मान तुकवून, दडवून ठेवलेल्या सौंदर्यखजिन्यांवरची कुलपे उघडून, कपडेदागिन्यांच्या कृत्रिम आकर्षणांपेक्षा जास्त नेमका वेध घेणाऱ्या आपल्यातल्या निसर्गदत्त आकर्षणांचा देखावा अभिमानाने मांडीत असत, खासकरून तेव्हा त्यांना मार्दवाने व आदबीने वागवण्यावर ह्या पुरुषांचा मोठाच कटाक्ष असे.

आता मौजेचं जातं फिरून माझ्यापर्यंत आलं होतं, आणि नियुक्त करण्यात आलेला माझा खाजगीतला व इतर उपस्थित यांच्या मनाप्रमाणे करण्याची माझी पाळी होती; तेव्हा तो माझ्याजवळ आला, मोठ्या नम्रपणाने व मला ज्यामुळे आपलं कौतुक झाल्यासारखं वाटेल असा उत्साह दाखवीत त्याने माझ्यासमोर वाकून अभिवादन केलं, आणि तो म्हणाला: स्वेच्छेने तू इथे आलेली असल्यामुळे माझी राजीखुषी स्वीकारशील अशी मला वाजवी आशा वाटते; पण ह्या गोष्टीचा मी पुनरुच्चार करू इच्छितो, की इथल्या उपस्थितांच्या इच्छांशी सहकार्य करण्याविषयी तुझ्या मनात जर काही अढी असेल, आणि याआधीचे दाखले ही अढी काढण्यात जर अयशस्वी ठरले असतील; तर हा खेळ जरी खास तुझ्यासाठी मांडलेला असला आणि माझी स्वत:ची निराशा जरी मोठीच होणार असली, तरीसुद्धा तुझ्या नावडीचं काम तुझ्यावर लादायला कारणीभूत होण्याऐवजी मी वाटेल ते दु:ख सोसायला तयार आहे.

यावर थोडीसुद्धा न चाचरता किंवा आढेवेढे घेऊन चेहरा न कुस्करता मी म्हणाले, की माझी सूत्रं बिनशर्त तुमच्या हाती आहेत अशा अर्थाचा एक प्रकारचा करार जरी मी स्वत:वर बंधनकारक मानीत नसते, तरीदेखील अशा गोड स्वभावाच्या मैत्रिणींनी घालून दिलेला दाखला माझा निश्चय व्हायला पुरेसा ठरला असता; आणि इतक्या सरस देखण्या मुलींच्या मागाहून आल्यामुळे माझं रूप डावं ठरेल, ही बाब वगळता इतर कोणत्याच बाबतीत माझी नाराजी नाही. मी जे बोलले तेच माझ्या मनात होतं, हे ध्यानात घ्या. माझ्या उत्तरातून व्यक्त झालेला प्रांजळपणा साऱ्यांना पसंत पडला; अशी

मुलगी मिळाल्याबद्दल माझ्या खाजगीतल्याचं अभिनंदन करण्यात आलं, आणि अप्रत्यक्षरित्या माझी खुशामत म्हणून उघडउघड हेवाही करण्यात आला.

जाताजाता हेही नमूद करायला हवं, की माझ्याविषयी मिसेस कोलला किती आत्मीयता वाटत होती याचा सज्जड पुरावा शोधायचा तर तिने ह्या समारंभासाठी माझा अध्वर्यू म्हणून निवडलेल्या तरुणापलीकडे पाहण्याची गरज नव्हती; कारण त्याचा जन्म मोठ्या घराण्यातला होता व अलोट संपत्तीचा तो वारसदार होता इतकंच नव्हे, तर दिसायला चारचौघांच्या मानाने पुष्कळच उजवा, बांधेसूद आणि उंचापुरा होता; त्याच्या चेहऱ्यावर देवीचे व्रण होते खरे, पण एकूण मार्दवाकडे व नाजुकपणाकडे झुकणाऱ्या अंगयष्टीला थोडासा मर्दानी रुबाब यावा इतपतच ते होते; आणि याखेरीज दोन चमकत्या काळ्याकभिन्न डोळ्यांनी त्याच्या तोंडवळ्याला मन प्रसन्न करणारी झळाळी बहाल केलेली होती; थोडक्यात अशातला तो होता, की कुठलीही बाई पटकन घसट दाखवून म्हणेल की काय चिकणा पोरगा आहे!

सामना जिथे होणार, त्या आखाड्यात तो आता मला घेऊन आला; माझ्या अंगात फक्त एक पांढरा मॉर्निंग-गाउन असल्यामुळे उदार मनाने तो माझ्याकरिता बृहन्नला बनायला तयार झाला, आणि कपडे स्वत: काढण्याची धिटाई करतेवेळी जी लाज वाटली असती ती यामुळे टळली; बघता बघता माझा गाउन सैल करून काढून टाकण्यात आला; माझी बॉडीस अडथळा करू पाहताच लुईसाने लगबग करून लेस कापण्यासाठी कात्री आणली व तिचा लागलीच बीमोड झाला; आता बाहेरचा कोट निघून फक्त आतला कोट व पातळ सदरा राहिला, आणि त्याचा गळा उघडा असल्यामुळे हातांना व डोळ्यांना अगदी मनमुराद स्वातंत्र्य मिळालं. इथे वस्त्रहरण थांबेल अशी माझी अपेक्षा होती, पण माझ्या हिशेबात तूट निघाली: सार्वत्रिक इच्छेला वाचा फोडीत माझ्या मनसबदाराने मला कळकळून विनंती केली, की शिल्लक राहिलेल्या ह्या तुटपुंज्या टरफलाला तुझ्या पूर्ण शरीराचं दर्शन आमच्यापासून चोरून ठेवण्याची मुभा देऊ नकोस; आणि आता यावर माझी बाजू मांडायची, तर वृत्तीने मी इतकी लवचिक व निमूट होते की त्यांच्याशी वाद घालण्याचा प्रश्नच नव्हता, शिवाय जे थोडंसं उरलं होतं ते मी फार नगण्य समजत होते; तेव्हा त्यांच्या पसंतीने करायला मी सहजी कबूल झाले. यानंतर क्षणार्धात माझ्या पेटिकोटाच्या नाड्या सुटून तो माझ्या पायांशी खाली आला, सदरा डोक्यावरून ओढून काढताना हलकेच बांधलेली माझी टोपीही त्याच्याबरोबर निघून आली, आणि येताना तिने माझे सगळे केस सैलसर, अस्ताव्यस्त कुरळांसह खाली आणले (ते किती भरघोस होते हे मागेच नमूद केल्याची इथे मी नम्रपणे आठवण करून देत्ये); मानेवर व खांद्यांवर ते रुळताच, माझ्या

त्वचेशी होणारा त्यांचा रंगविरोध फारसा विद्रूपही दिसत नव्हता.

आयुष्यातल्या ठराविक टप्प्यांवर, प्रत्येक येत्या क्षणाबरोबर, काळपुरुष आपल्या सौंदर्यलक्षणांची चोरी करत जातो हे खरंच आहे; पण मी अठरा वर्षांची व्हायला अजून काही महिने अपुरे असल्यामुळे, तुमच्या आठवणीत असेल त्या माझ्या मागे वर्णिलेल्या रूपात त्याने आत्तापर्यंत मोठी सुधारणा करून माझा बहर मोकळेपणाने व पूर्णतेने फुलवलेला होता; तेव्हा निसर्गाने मला जशी घडवली तशीच मी माझ्या न्यायाधीशांसमोर उभी असताना, त्यांना मी फार असुंदर वाटेन अशी विशेष शक्यता नव्हती. नग्नावस्थेत जे नेहमी दृष्टी आकर्षून घेतात, त्या माझ्या घाटदार पुष्ट स्तनांनी, कोणताही आधार किंवा जोखड नसतानाही आपला ताठा व स्वावलंबी बाणा टिकवून धरलेला होता; आणि हात लावून चाचणी घेण्याचं आव्हान व आमंत्रण ते पाहणाऱ्याला देत होते. माझ्या आरोग्यसंपन्न सहजप्रकृतीमुळे व कोवळ्या वयामुळे, दृष्टीला व स्पर्शाला खात्रीने विसावा देईल असा रसाळ गुबगुबीतपणा माझ्या अंगमांसात मुरलेला होता; आणि त्याने घालून दिलेल्या मर्यादेत का होईना, पण मी उंच व शेलाटी म्हणता येण्यासारखी होते.

ज्या अवस्थेत आपण असल्याचं मला कळून चुकलं, तीमुळे मी अतोनात कावरीबावरी होऊ नये इतकी काही माझी जन्मजात शरम मी वाऱ्यावर सोडलेली नव्हती; पण भोवताली जमलेल्या साऱ्याच पलटणीने, मग त्यांत स्त्रियापुरुष सगळेच आले, आपली पसंती व खुषी भरभरून व्यक्त करताच मला हायसं झालं; जे रूप मी जगासमोर घेऊन आले होते त्याबद्दल मला अभिमान वाटून हुरूप यावा याकरिता सर्व प्रकारांनी त्यांनी माझं कोडकौतुक केलं, आणि स्त्रीला चढवून कसं ठेवायचं हे ठाऊक असणारा माझा मनसबदार म्हणाला, की इतर कुठल्याही चमकढमक दागिन्यांपेक्षा हे तेज अनंतपटींनी श्रेष्ठ आहे; तेव्हा सारांश असा, की या चोखंदळ रसिकांनी ज्या स्तुतिशब्दांचा माझ्याभोवती ढीग रचला, ते सर्व मनापासूनचे आहेत असं समजण्याची परवानगी जर मी स्वत:ला देऊ शकले असते, तर ज्ञानी लोकांची वाहवा मिळवून मी परीक्षेत उतरले अशी स्वत:ची पाठ थोपटून घेतली असती.

पण सद्यस्थितीत माझी मालकी एकट्या माझ्या सोबत्याकडेच असल्यामुळे, इतरांची व कदाचित स्वत:चीही उत्सुकता भागवण्याकरिता तो इतक्या थराला गेला, की मनास येतील तशा वेगवेगळ्या पवित्र्यांत व प्रकाशझोतांत तो माझं शरीर वाकवून-वळवून पाहू लागला, आणि त्यातल्या प्रत्येक दृष्टिकोनातून दिसणारं प्रत्येक सौंदर्यस्थळ त्याने अंगुलीनिर्देश करून उपस्थितांना दाखवून दिलं; पण हे चालू असताना मध्येमध्ये कंसांत चुंबने घेऊन व भटक्या हातांनी शरीर तापवणारे स्वैराचार करून

माझ्यातला सारा लाजरेपणा पळवून लावल्याखेरीज तो राहिला नाही. याचा परिणाम म्हणून लज्जाज्वराची जागा आता अधिक उष्ण अशा अभिलाषाज्वराने घेतली, आणि अशा प्रसंगातही मला थोडीफार लज्जत वाटू लागली. पण ह्या सर्वांगीण पाहणीमध्ये माझ्यातल्या मुद्द्याच्या जागेला काटेकोर तपासणीतून सूट मिळाली असेल असं मात्र तुम्ही मुळीच समजू नका– तेव्हा ह्या विषयावर सार्वत्रिक मत पडलं ते असं, की माझ्या याआधीच्या प्रकल्पांमुळे तिथे उत्पन्न झालेला दोष अगदीच किरकोळ व नगण्य आहे, शिवाय अति ताणल्याने उद्भवलेला तिथला व्रण माझ्या कोवळ्या वयामुळे व निसर्गत:च त्या भागात मी लहानशी असल्यामुळे फार लवकर भरून निघालेला आहे; तेव्हा तसा प्रसंग जर आलाच, तर कुमारिका म्हणून स्वत:ला खपविण्याकरिता मी कचरण्याचं काहीही कारण नाही.

आता माझ्या खाजगीतल्याने स्पर्शाचे व दृष्टीचे कोड पुरवण्याचे सर्व मार्ग संपविले होते, की दंश करण्यासाठी त्याला यापुढे कळ काढवत नव्हती कोणास ठाऊक; पण त्याने आपले कपडे तडकाफडकी उतरवले, आणि बंदिस्त खोली, धगधगती शेकोटी, कितीतरी मेणबत्त्या, व अर्थात आधीच्या देखाव्यांचा अंग तापविणारा उष्मा ह्या साऱ्याचा एकत्रित परिणाम म्हणून अतोनात उकडत असल्यामुळे आतला सदरादेखील काढून टाकला; यानंतर पाटलोण समोरून सैल करताच आतली सामग्री बाहेर पडली, आणि ज्या शत्रूशी मला मुकाबला करायचा होता, तो उघड्या डोक्याने लालेलाल चमकत पुढे आला. आपल्याला कशावर भिस्त ठेवायची आहे हे आता मला स्पष्ट दिसलं: जेणेकरून मालकाला उत्तम नियंत्रण ठेवता येईल, असा आणि एवढाच त्याचा आकार होता; याउलट जर उपकरण बोजड आणि अकटोविकट असेल तर हे तितकंसं चांगलं साधत नाही.

आता तो माझ्याविरुद्ध सामोरा उभा राहिला, आपल्या छातीशी त्याने मला घट्ट कवटाळलं, आणि कोनाड्याला खास त्याच्याकरिता बनवलेली मूर्ती टेकवून ती आत सरकवण्यासाठी नेम धरला; मी धिटाई दाखवून त्याला मदत करताच, माझ्या मांड्या वर उचलून त्याच्या उघड्या ढुंगणावर लावून धरून त्याने आपला हेतू साध्य केला, आणि त्यातला इंचनइंच मला स्वीकारायला लावून घर बंद करून टाकलं; आता सुखाच्या सुईवर टाचले जाताच मी त्याच्या मानेला बिलगले, माझे स्तन त्याच्या छातीवर चिकटवून धरले, आणि शरम व कामज्वर या दोहोंमुळे समप्रमाणात तापून तांबडाभडक झालेला माझा चेहरा त्याच्या मानेत व केसांत लपवून ठेवला; त्याने माझ्यासह दिवाणाभोवती एक प्रदक्षिणा घातली, मधोमध मारलेला विळखा न सोडता किंवा बोगद्यातून बाहेर न येता त्यावर मला झोपवलं, आणि तो सुखाचं कुटणं कुटू लागला.

पण मन अशांत करणाऱ्या त्या रात्रीच्या दृश्यांनी आम्ही आधीच असे डिवचून चिडवलो गेलो होतो, आमची कल्पनासृष्टी अशी ढवळून कढवली गेली होती, की न वितळता आम्हाला फार काळ राहवेना: परिणामी, ते उष्ण तुषार त्याच्यातून माझ्यात बाणाप्रमाणे शिरताना मला जाणवताहेत, तोच त्या क्षणमात्र टिकणाऱ्या सुखस्फोटात सहभागी होण्यासाठी तीच सम गाठून मीही पाघळले; पण आमचे सूर जुळल्याची बढाई मारण्याकरिता माझ्याकडे याहीपेक्षा मोठं कारण होतं ते असं, की माझ्यातील कामनेच्या ज्वाला अजून विझलेल्या तर नाहीतच, पण उलट ह्या शिंपडणुकीमुळे मी भिजलेल्या कोळशांप्रमाणे आणखी धगधगून फुलले आहे हे माझ्या निधड्या मनसबदाराच्या लक्षात येताच त्याला माझ्याबद्दल सहानुभूती वाटू लागली, आणि दुहेरी बार करण्याइतका दारूगोळा भरलेल्या स्थितीत, जोर कमी न करता, त्याने तो गोड भडिमार पुन्हा सुरू केला; यामुळे मी भलतीच खूष होऊन, कृतज्ञतेच्या भावनेने, त्याला अधिकाधिक सुख व्हावं अशा प्रकारे माझ्या साऱ्या हालचाली त्याच्याशी जुळवण्याची पराकाष्ठा करू लागले; चुंबाचुंबी, आवळाआवळी, लाडिक कुजबूज ह्या साऱ्याचाच आता खेळात अंतर्भाव झाला, आणि चढत्या श्रेणीने आमच्या सुखभावना अधिकाधिक बेफाम व दंगेखोर होऊन कशाला काही ताळतंत्र राहू नये अशा अनुरक्त अवस्थेला आम्ही पोहोचलो; पण लवकरच एकमात्र बिंदूकडे वेगाने धावू लागून, आम्हाला स्वत:तून वेगळं काढून अथांग आनंदाच्या समुद्रात त्या वाहवत घेऊन आल्या, आणि रसबेभान होऊन आम्ही दोघेही बुडून गेलो. चेतनेने रसरसणाऱ्या ज्या दृश्यांना मी साक्षीदार राहिले होते, त्यांमुळे माझ्या मनात उद्भवलेल्या जळत्या अभिलाषेच्या प्रतिमा या उष्ण हालचालींमुळे पिकून जाऊन अटीतटीला आल्या, आणि प्रक्षोभ माजवीत माझ्यात अशा ठणकल्या, की अंगभर असह्य रिवरिव होऊ लागली: रात्रीची उदाहरणे डोळयासमोरून गेल्यामुळे जी आगळी आणि विलक्षण उद्दीपने माझ्यावर सत्ता गाजवीत असलेली मला प्रकर्षाने जाणवू लागली होती, त्यांनी आमच्या सुखांची धार अधिकच पाजळली होती; पण अर्थात ह्या परिणामाकडे बाहेरून पाहण्याइतका बुद्धीचा शांतपणा त्या क्षणी माझ्या आवाक्याबाहेर होता: ह्याच सत्तेचा प्रभाव माझ्या जोडीदारावरही तितकाच पडला असल्याचं त्याच्या मज्जातंतूमधून मला समजताच मी हर्षभरित झाले: त्याच्या डोळयांतून आता बोलक्या ज्वाळा लकाकत होत्या व त्यांनी चावे घेतल्यामुळे हालचाली संतप्त झालेल्या होत्या; त्याला सुख होत असल्याची मला ग्वाही देऊन माझं सुख वाढविण्याचं कारस्थान ह्या साऱ्यांनी रचलेलं होतं. कमालमर्यादा ओलांडल्यामुळे मृत्यू ओढवण्याचा धोका न पत्करता मानवी जाणीवेला जिथपर्यंत आनंद सहन करणं शक्य आहे, तिथपर्यंत मी उचलली गेले होते; आता त्या निर्वाणीच्या मधुबिंदूला स्पर्श करताच मी जी विरघळले, त्याला माझ्या सोबत्याने माझ्यात सोडलेल्या चिळकांडीमुळे विशेष प्रतिबंध झाला नाही; एक खोल सुस्कारा माझ्या तोंडून निसटला, आणि तेव्हाच माझ्या संवेदनात्म्याची ज्या बोगद्यात पाठवणी झाली, तो मोठ्या

मजेदारपणे तुंबून बंद झालेला असल्यामुळे तिथून निसटून जाण्याची त्याला मुभा राहिलेली नव्हती. काही सुखसंपृक्त क्षणांपुरते आम्ही म्लान, अचल व गलितगात्र अवस्थेत पडून राहिलो; असाच काही काळ गेल्यानंतर आमचं सुख साकळलं, आणि बेहोशीतून आम्ही जागे झालो; तो माझ्यातून बाहेर पडला खरा, पण आपण बेहद्द खूष झाल्याची पावती म्हणून मला लाडिक चुंबन देऊन मिठीत घेण्याआधी, आणि अतिशय हृद्य शब्दांनी तसं सांगण्याआधी नाही.

सारे उपस्थित आमच्या भोवताली प्रगाढ शांततेत उभे होते, पण आता सारं संपताच त्यांनी मला भराभर कपडे चढवायला मदत केली; आणि ते पुढे म्हणाले, की एका विशिष्ट प्रसंगी दुप्पट नजराणा दिला जाऊन तुझ्या सार्वभौम सौंदर्याचं (हा त्यांचाच शब्दप्रयोग) मांडलिकत्व सपशेल कबूल करण्यात आलं हे आमच्या लक्षात आल्यावाचून राहिलेलं नाही, आणि याबद्दल तुझं अभिनंदन असो. माझ्या सोबत्याने आता कपडे चढवले होते, आणि नुकताच सुखभोग घेऊन झाल्यानंतरही त्याच्या मनातला माझ्याकरिताचा प्रेमळपणा ओसरलेला नाही हे त्याच्या वागण्याबोलण्यातून स्पष्ट झालं; मुलींनीही माझी चुंबने घेऊन मला मिठ्या मारल्या व असा दिलासा दिला, की निदान सध्यातरी, किंवा खरंतर केव्हाही, तुझी इच्छा असल्याखेरीज तुला आणखी सार्वजनिक प्रयोग करावे लागणार नाहीत; आता तुला यथासांग दीक्षा मिळालेली आहे, आणि तू आमच्यातलीच एक झालेली आहेस.

प्रत्येक पुरुष, निदान त्या रात्रीपुरता, आणि वास्तविक त्याने स्वत:चा मालकीहक्क समुदायाकडे पुन्हा विसर्जित करेपर्यंत, त्याच्या सोबतिणीबरोबरच राहायला हवा असा तिथला अनुल्लंघनीय नियम होता (औचित्य सांभाळलं जावं, व एकाने आधी विचारल्यानंतर दुसऱ्याने विचारल्यामुळे संकोचायला लावणारा प्रसंग येऊ नये, हा त्यामागचा उद्देश होता); त्याप्रमाणे रात्री एकच्या सुमारास, बिस्किटं, वाईन, चहा आणि चॉकलेट असा अल्पोपाहार झाल्यानंतर बैठक मोडली, आणि सारेजण जोडीजोडीने बाहेर गेले. मी व माझा मनसबदार यांच्यासाठी मिसेस कोलने प्रासंगिक वापराचा लहानसा बिछाना तयार ठेवला होता तिथे आम्ही गेलो, आणि संपूर्ण रात्र एक सलग आनंदी धून वाजविण्यात घालवली; वीट येणार नाही अशी तिची उडती चाल असल्यामुळे, कधीतरी ती संपावी असं आम्हाला एकदासुद्धा वाटलं नाही.

सकाळ होताच, बिछान्यातच बसून ब्रेकफास्ट खाऊन झीज भरून निघताच तो उठला, आणि तू मला फार आवडू लागली आहेस असं अतिशय प्रेमळपणे आवर्जून सांगितल्यानंतरच त्याने माझी रजा घेतली; यानंतर मी एक छानशी डुलकी काढून शांत व ताजीतवानी झाले; आणि मला जाग आल्यानंतर, मिसेस कोल आत येण्याआधी कपडे चढवीत असताना त्याने माझ्या खिशात सरकवून

दिलेली गिन्न्यांची पिशवी सापडली. मला पूर्ण अनपेक्षित असलेल्या ह्या औदार्यावर मी गढून विचार करीत असतानाच मिसेस कोल आत आली, तेव्हा तिला मी ही बक्षिसी ताबडतोब दाखवली आणि यातला जो काही हिस्सा तुम्हाला हवा तो घ्या, असं मनमोकळेपणाने म्हणाले: पण तिने मला निक्षून सांगितलं की त्याने मला भरपूर दिलेलं आहे; तेव्हा कुठल्याही अटीवर, कितीही विनवणी केलीस तरी, त्याला तू कसलंही स्वरूप दिलंस तरी, मी यातलं काहीही घ्यायची नाही. ती म्हणाली की नाण्याला नाक मुरडण्याचा मी आव आणते आहे असं नाही; आणि मग यापुढे, स्वत:च्या शरीराचा व पैशाचा कसा काटकसरीने उपयोग करावा याबद्दल तिने मला जो वाखाणण्यासारखा सल्ला दिला, तो मी लक्षपूर्वक ऐकला आणि लंडनच्या माझ्या वास्तव्यात सर्वसाधारणपणे पाळला, ही बाब मला अतिशय फायद्याची ठरली. यानंतर विषय दुसरीकडे वळवून ती आदल्या रात्रीच्या करामतींबद्दल बोलू लागली; आणि आता मला तिचा स्वभाव थोडासा समजू लागला असल्याकारणाने, झालेला सगळा प्रकार तिने पाहिला होता हे मला तिच्याकडून कळताच त्याचं फारसं आश्चर्यही वाटलं नाही; फक्त याच हेतूने म्हणून एक सोयिस्कर जागा तयार करण्यात आलेली होती, आणि ती कुठे आहे याचं रहस्य तिने मला लागलीच सांगितलं.

हे तिचं बोलणं संपत नाही तोच ती छोटीशी प्रेमाची पलटण, म्हणजे माझ्या सोबतिणी मुली आत घुसल्या, आणि त्यांनी पुन्हा एकदा मिठ्या व कौतुकांचं वाढप केलं. काल रात्रीचे परिश्रम व व्यायाम यांमुळे त्यांच्या त्वचेच्या तजेल्यावर किंवा अंगाच्या टवटवीतपणावर थोडंही अतिक्रमण झालेलं नाही हे पाहून मला आनंद झाला: पण मुलींनी असं कबूल केलं, की आमच्या दैवदुर्लभ अशा संचालिकेने केलेल्या तरतुदी व सांगितलेल्या युक्त्या, यांना त्याचं श्रेय जातं. त्यानंतर मग दर्शन द्यायला त्या नेहमीप्रमाणे दुकानात गेल्या, मी माझ्या घरी परतले, आणि थोडा वेळ काहीबाही करीत राहून दुपारच्या जेवणासाठी पुन्हा मिसेस कोलकडे गेले. ह्या नाही तर त्या मुलीबरोबर सतत कसलीतरी करमणूक करून घेत तिथे मी संध्याकाळी पाचपर्यंत राहिले; अचानक मला अनावर झोप आली, तेव्हा मला असा आग्रह झाला की तू वर जाऊन हॅरिअटच्या बिछान्यात झोप, आणि तिथे मला विश्रांती घ्यायला सोडून ती निघून गेली. अंगावरचे कपडे तसेच ठेवून मी पडून राहताच मला गाढ झोप लागली, व मला वाटतं एक तासभर विश्रांती मिळाली असेल-नसेल, पण तेव्हाच माझ्या नव्या आणि लाडक्या मनसबदाराने झोपेत गोड व्यत्यय आणला; यामागचं कारण असं, की त्याने माझी चौकशी करताच मी कुठे सापडेन हे त्याला कुणीतरी तत्परतेने सांगितलं होतं.

मग तो माझ्या खोलीत आला, मी एकटीच आहे व माझा चेहरा प्रकाशाच्या विरुद्ध दिशेला

बिछान्याच्या आतल्या बाजूला वळला आहे असं पाहून, नग्नस्पर्श अधिक सोपा व सुखद व्हावा यासाठी त्याने आपली पाटलोण विशेष लांबड न लावता काढून टाकली; आणि मागून माझा पेटिकोट व सदरा हळूच वर सरकवून सुखाच्या प्राकृतिक आसनाकडे जाणारा रस्ता खुला केला; तेव्हा मी एका कुशीवर पडून माझं तोंड काहीसं खाली वळवलेलं असल्यामुळे, आत येण्याकरिता अगदी आमंत्रक पवित्र्यात होते. मग हळूच माझ्या शेजारी पडून राहून त्याने मला मागून विळख्यात घेतलं, आपल्या मांड्या व पोट मला चिकटवून त्याच्या शरीराची उब दिली; आणि तेव्हाच, ज्याच्या स्पर्शामध्ये विलक्षण आणि अद्वितीय असं काही आहे, अशा त्या इंद्रियाची माझ्यात येऊन बसण्याची खटपट मला जाणवली.

सुरवातीला मी चांगलीच दचकले, पण कोण आहे ते पाहताच त्याच्या दिशेला वळू लागले; तेव्हा त्याने मला एक चुंबन दिलं, आणि आहे तशीच राहा असं सांगून, माझी वरची मांडी थोडीशी उचलून, हवं असलेलं दार कुठे आहे ते नीट पाहून, लवकरच तो अगदी आतपर्यंत शिरला: याने समाधान होताच, त्या प्रदेशात इतकी जवळीक झाल्यामुळे मनाला बरं वाटून त्याने हालचाल स्थगित केली; अशा प्रकारे सुखामध्ये भिजवून ठेवलेल्या अवस्थेत तो असताना, माझ्या मांड्यांची मागची नीटस कमान व तिच्यावरचं सगळं अंग, त्याच्या मांड्या व पोटाने वाकून तयार केलेल्या पोकळीत चपखल बसविलेल्या पवित्र्यात, त्याच्या शब्दांत सांगायचं तर चमच्यात चमचा अशा आकृतीबंधात त्याने मला एका कुशीवर ठेवून दिलं; पण काही वेळाने, आतला बेचैन आणि भडक डोक्याचा कैदी, दीर्घकाळ स्वस्थ राहण्याची स्वभावत: सवय नसल्यामुळे हालचाल करण्यासाठी चिथावणी देऊ लागला; तेव्हा आता परस्परांना कुरवाळणं, चुंबने घेणं, इत्यादि नेहमीच्या क्रमाने ही हालचाल मार्गी लागून, काल रात्री रिचवलेल्या सुखाच्या घोटांमुळे आमच्यातला साठा रिता झालेला नाही किंवा निदान पुन्हा भरून निघालेला आहे, याचा उभयपक्षी द्रवरूप पुरावा मिळून एकदाचा हा प्रकार संपला.

ह्या उमद्या व छान स्वभावाच्या तरुणाबरोबर मी अतिशय आनंदाने व निष्ठेने राहिले. निदान पहिल्या माधुरीमासासाठी तरी मला स्वत:करिताच ठेवण्याचा त्याचा पक्का इरादा होता; पण लंडनमधलं त्याचं वास्तव्य इतकं देखील लांबलं नाही, कारण त्याच्या वडिलांना कामाखातर आयर्लंडला जाणं भाग पडल्यानंतर ते त्याला अचानक तिकडे घेऊन गेले. तशाही परिस्थितीत त्याच्यावरची व त्याच्या स्नेहावरची माझी पकड जवळजवळ कायम होती, कारण तो आयर्लंडात स्थिरस्थावर झाल्यानंतर मी त्याच्याकडे यावं असा प्रस्ताव त्याने मांडला होता, आणि मी तो मान्यही केला होता; पण तिथे एक सुस्वभावी व फायद्याची ठरू शकेल अशी मुलगी मिळताच त्याने सुज्ञपणाने वागून माझ्यासाठी

सांगावा धाडण्याचा बेत रहित केला; यानंतर त्याने आठवणीने माझ्यासाठी एक भलीथोरली बिदागी पाठवली हे जरी खरं असलं, तरीदेखील त्याच्या जाण्याने मला जे खूप आतून वाईट वाटलं, त्याची भरपाई यामुळे झाली नाही.

आमच्या छोट्याशा मंडळामध्ये ह्या घटनेमुळे एक पोकळी निर्माण झाली असली, तरीदेखील मिसेस कोलच्या अंगवळणी पडलेल्या सबुरीच्या धोरणानुसार ती भरून काढण्याची तिला घाई नव्हती; पण एकप्रकारे मला जे वैधव्य आलेलं होतं त्याचं थोडंफार सांत्वन म्हणून, बनावट आडपडद्यांच्या बाजारपेठेत मला किफायतशीर सौदा मिळवून द्यावा या कामी ती दुप्पट लक्ष घालू लागली; तिने कधीच त्या योजनेची आशा सोडलेली नव्हती, आणि ती तडीस नेण्यासाठी पाहिजे तसा माणूस मिळण्याचीच फक्त खोटी होती. पण मी पहिल्या खेपेस बाजारात आले होते त्या वेळेप्रमाणेच इथेही माझी विक्रेती मीच असणार हेच माझ्या प्राक्तनात लिहिलेलं असावं.

आता इतर मुलींच्या सोबतीत, तिथल्या खेळीमेळीच्या घरगुती वातावरणाचा आनंद घेत, जवळजवळ एक महिना मी मजेत काढला होता; आणि यादरम्यान त्यांच्या खाजगीतल्यांनी, घरात जो साहचर्याचा रिवाज पडून गेला होता त्याला अनुसरून, रुचिपालट करण्यासाठी माझ्या मिठीत येण्याची इच्छा व्यक्त केलेली होती (याला बॅरोनेट अपवाद होता, कारण त्यानंतर लवकरच तो हॅरिअटला घरी घेऊन गेला); पण अतिशय धोरणीपणा राखून चतुराईचं बोलणं करीत, वेगवेगळ्या सबबी देऊन मी त्यांचा पाठलाग चुकवला होता, आणि तेही त्यांना तक्रार करायला वाव न देता; अशा रीतीने मी अंतर राखून राहिले होते, ते मला हे पुरुष आवडत नसत किंवा त्या प्रकाराची किळस वाटे म्हणून नव्हे; तर यामागचं वास्तविक कारण असं होतं की मला माझ्या जवळच्यांच्या भावना सांभाळायच्या होत्या, आणि मैत्रिणींच्या आपखुशीने चालू असलेल्या प्रकरणांत घुसणं प्रशस्त वाटत नव्हतं; ह्या मुली असूया वाटणाऱ्यांतल्या नाहीत असं जरी वरकरणी दिसत असलं, तरीदेखील हा सद्गुण दाखविण्याची पाळी त्यांच्यावर न आणता तशी शक्यता मी ध्यानात ठेवल्यामुळे, आतून त्यांना मी खचितच जास्त आवडू लागले होते.

अशा रीतीने, निश्चिंत मनाने, साऱ्या कुटुंबाच्या प्रेमळ छायेखाली मी राहात होते; तेव्हा एके दिवशी संध्याकाळी पाचच्या सुमारास, मी आणि इतर मुली यांच्याकरिता काही फळं विकत घ्यायला म्हणून मी कव्हेंट गार्डनमधल्या एका फळविक्रेत्याकडे गेले असताना, एक चमत्कारिक प्रसंग घडला तो असा. मला हव्या असलेल्या फळांवरून मी घासाघीस करीत असताना एक तरुण गृहस्थ माझ्या मागेमागे

येत असल्याची मला जाणीव झाली; त्याच्या उंची कपड्यांमुळे सुरवातीला तो माझ्या लक्षात आला, पण तेवढं वगळता, तो फिकुटलेला व हाडकुळा आहे आणि भलत्याच किडमिडीत पायांनी वावरतो आहे, यापलीकडे विशेष उल्लेखनीय असं काही मला आढळलं नाही. मला दिसतं आहे हे कळू न देता, तो माझ्यामागे आहे हे मला दिसत होतं; आता माझ्यावर डोळे रोखलेले ठेवून, मी ज्या टोपलीपाशी उभी होते तिथे तो आला, फळांची पहिल्यांदा मागितली ती किंमत त्याने देऊन टाकली, आणि माझ्याशी बोलणं काढू लागला.

ह्या प्रसंगी मी एक सोज्वळ मुलगी म्हणून खपून जाऊ नये असं प्रथमदर्शनी माझ्यात काहीसुद्धा नव्हतं. लंडनमधल्या उठवळ पोरींसारखी मी पिसं लावलेली नव्हती किंवा अत्तर चोपडलेलं नव्हतं: वेताची टोपी, पांढरा गाउन, स्वच्छ सुती कपडे, आणि महत्त्वाचं म्हणजे एक प्रकारचा सहजसाधा शालीन भाव, ह्या सगळ्या खुणा अशा होत्या की मी कोणत्या इयत्तेतली आहे हे ताडण्याकरिता त्याला एकही दार उघडं मिळालं नाही. (ही शालीनता माझ्यात दिसली नाही असं कधी झालं नाही; माझ्या वर्तनाने जेव्हा तिचा मी चांगलाच विध्वंस करीत असे, तेव्हाही नाही.) तो माझ्याशी बोलू लागताच, अनोळखी व्यक्तीने बोलणं काढल्यामुळे माझे गाल शरमेने लाल होऊन वास्तवापासून त्याचं तारू आणखी दूर भरकटलं; आणि मी केलेल्या प्रत्युत्तरांमध्ये जो अवघडलेपणा व बावचळलेपणा दिसून येत होता, तो काही अंशी खरा असल्यामुळे त्याला बनविण्याच्या कामी जास्तच उपयोगी पडला. पण आधीचा संकोच मोडल्याचा फायदा घेत जेव्हा तो बोलणं वाढवू लागला, आणि मला खोचून प्रश्न विचारू लागला; तेव्हा मी एवढा निरागसपणा, साधेपणा व बालिशपणासुद्धा माझ्या संभाषणात ओतला, की त्याला मी दिसायला बरी वाटले याशिवाय कसलाच ठोस आधार नसतानाही माझ्या शीलाबद्दल त्याने शपथेवर हमी दिली असती अशी माझी बालंबाल खात्री आहे. निष्कर्ष असा, की पुरुष जेव्हा फशी पडतात, आणि तेही विशेषेकरून त्यांच्या डोळयांनी त्यांचा घात केल्यामुळे, तेव्हा ह्या महाभागांच्या अकलेने स्वप्नातसुद्धा बघितला नसेल एवढा भोटमपणाचा साठा त्यांच्यात दडून बसलेला असतो; आणि म्हणूनच त्यांच्यापैकी जे शहाणेसुरते म्हणावेत, तेसुद्धा कित्येकदा आमच्याकरवी ठकविले जातात.

त्याने मला जे अनेक प्रश्न विचारले त्यांतला एक असा होता, की तुझं लग्न झालंय का? मी म्हणाले, मी अजून फार लहान आहे, तेव्हा पुष्कळ वर्षांनी बघता येईल. माझं वय विचारल्यानंतर मी त्याच्यासाठी म्हणून एका वर्षाची कपात करून अजून सतरा पुरी व्हायची आहेत असं सांगितलं. काम काय करतेस यावर मी म्हणाले की प्रेस्टनमध्ये एका टोप्या विणणारीकडे शिकायला होते, त्यानंतर

माझ्या नात्याच्या एका बाईला शोधत लंडनला आले, पण आल्यावर कळलं की ती वारली, तेव्हा आता इथल्याच एका दुकानात टोप्या विणायचं काम करून राहते. ही शेवटची थाप पचेल अशी मला फार अपेक्षा नव्हती; पण माझ्यामुळे त्याच्या अंत:करणात जी खळबळ माजू लागली होती, तिच्या मदतीने ती पचली. यानंतर माझं नाव, माझ्या मालकिणीचं नाव, आणि राहण्याची जागा ही माहिती त्याने माझ्याकडून त्याच्या मते फार खुबीने काढून घेतली, पण वास्तविक ती लपवण्याचा माझा मुळीच इरादा नव्हता; आणि शेवटी जेव्हा त्याने जास्तीतजास्त दुर्मिळ व महागडी फळं वेचून काढून माझ्यावर लादून मला घरी पाठवलं, तेव्हा आता ह्या प्रसंगातून पुढे कायकाय निष्पन्न होऊ शकेल यावर मी डोकं खाजवून विचार करू लागले.

मिसेस कोलकडे येऊन लागलीच तिला मी सारी हकिकत सांगितली, तेव्हा तिने मोठा तर्कसंगत विचार करून निष्कर्ष काढला, की तो जर तुझ्यामागे आला नाही तर काहीच बिघडलं नाही; पण जर आला, आणि माझा होरा असा आहे की येईल, तर हा कशा विचारांचा व कशा वागणुकीचा इसम आहे याचा रीतसर छडा लावायला हवा, जेणेकरून सापळा लावण्याइतपत शिकार लायकीची आहे की नाही हे कळेल; आणि तोपर्यंत ह्या प्रकरणातली तुझी भूमिका फार सोपी आहे, कारण माझ्या खुणांकडे लक्ष ठेवून अगदी शेवटच्या अंकापर्यंत मी पढवलेले संवाद म्हणत राहणं, यापलीकडे तुझ्यावर कसलाही बोजा नाही.

दुसऱ्या दिवशी सकाळी माझा हा भला गृहस्थ जेव्हा आपल्या घोडागाडीतून दुकानात आला, तेव्हा तो कसल्या कामासाठी आला आहे याची कल्पना फक्त मिसेस कोलला होती; आम्हाला हे नंतर समजलं, की आदली संध्याकाळ त्याने आजूबाजूला तिच्या चारित्र्याची चौकशी करण्यात घालवलेली होती; आणि तिने त्याच्याकरिता जो डाव रचला होता, त्यासाठी दुसरी कुठलीही गोष्ट याइतकी अनुकूल ठरली नसती. तिची भेट मागून, काही टोप्या हव्या आहेत अशी बोली करून, त्याने विनासायास ओळख पुढे दामटली: हे सारं होत असताना मी डोळे वर न उचलता अत्यंत धीम्या आणि सहजसुंदर कामसूपणाने एका लेसपट्टीच्या टाक्यांचा पाठपुरावा करीत होते; आणि यादरम्यान, काल संध्याकाळी पहिल्यांदा मला भेटल्यानंतर त्याचं जे मत बनलेलं होतं, ते माझ्याशेजारीच कामाला बसलेल्या लुईसा व एमिलीकडे पाहून विस्कटण्याचा धोका नाही, ह्याची मिसेस कोलने तिकडे दृष्टिक्षेप टाकून खात्री करून घेतली होती. माझ्याशी नजरानजर करण्याचा निष्फळ प्रयत्न केल्यानंतर (मी माझी मुंडी खालीच ठेवली, जणू काही त्याच्याशी बोलून त्याला इथे येण्याकरिता उत्तेजन आणि संधी दिल्याबद्दल मला ओशाळं वाटतं आहे), मागवलेल्या वस्तू मिसेस कोलने जातीने त्याच्या घरी किती दिवसांत व

कुठल्या वेळेला घेऊन यायच्या याबद्दल त्याने तिला सूचना दिल्या; आणि नव्याने आलेल्या गिऱ्हाईकाची ओळख साजरी व्हावी, याकरिता काही माल सढळ हाताने खरेदी करून तो घेऊन गेला.



## भाग आठवा

ह्या नवीन गिऱ्हाईकाची भानगड काय आहे याचा बाकी पोरींना इतका वेळ काहीसुद्धा वास लागला नव्हता; पण मिसेस कोलला अशा प्रकरणांचा दीर्घ अनुभव असल्यामुळे, सोयिस्करपणे आम्ही दोघीच उरल्यानंतर ती लगेच म्हणाली की ह्या चकमकीत तुझ्या आकर्षणाचा बार सर्दावला नाही असं दिसतं; त्याचा अधिरेपणा व एकूण वागणंबोलणं यावरून तो जखमी झाला आहे हे निश्चित; आता तो कशा प्रकारचा माणूस आहे आणि त्याच्याकडे माया किती आहे असे प्रश्न उरतात, पण लंडनची मला जी माहिती आहे तीमुळे याही गोष्टींबद्दल लवकरच बातमी लागेल, आणि मग पुढे काय करायचं ते ठरवता येईल.

आणि तिचे गुप्तहेर इतके हुशार निघाले की मी जिंकलेला गड म्हणजे दुसरंतिसरं कोणी नसून मिस्टर नॉर्बर्ट हे अगदी काही तासांतच तिला समजलं; ह्या माणसाकडे पूर्वी गडगंज वैभव होतं, पण शरीरप्रकृती मूळची फार दणकट नसतानाही लंडनमध्ये उपलब्ध असलेल्या अनेक प्रकारच्या चैनबाजीत फारच हिरीरीने भाग घेतल्यामुळे त्याने आत्तापर्यंत चांगलाच मार खाल्लेला होता; आणि ह्या कारकीर्दीत रांडबाजीचे नेहमीचे सगळे मार्ग वारंवार चोखाळल्यामुळे झिजून जाऊन, त्यांचा वीट येऊन, त्याला आता कुमारिका हुडकून काढण्याची चटक लागली होती; हे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी तो खर्चाची तमा करीत नसे, आणि एकूण ह्या मोहिमेत त्याने अनेक मुली नासवलेल्या होत्या; एकदा पोरगी मिळाली की तिचा कंटाळा येईपर्यंत, किंवा मजा घेऊन घेऊन थंडावेपर्यंत, किंवा नवा चेहरा मिळेपर्यंत तो तिला बरी वागवत असे, आणि मग जुनीचं लोढणं गळयातून काढून टाकून तिला तिच्या नशीबावर सोडून देणं त्याला सोयीचं जाई; कारण ज्यांच्याशी घासाघीस करून सौदा पटवता येईल, अशांच्याच प्रांतामध्ये त्याची यशोभूमी जी काही असायची ती होती. ह्या आधारभूत घटकांवरून मिसेस कोलने असा निष्कर्ष काढला की अशा प्रकारचं मेषपात्र गटवणं ही कृती नेहमी नीतिमत्तेला धरूनच असते, आणि आपला माल त्याला शक्य तितक्या चढ्या भावात न विकणं हेच गैर ठरेल; नाहीतरी तिच्या मते, गेलाबाजार कुठल्याही किंमतीला आणि कुठल्याही करारावर हा माणूस माझ्यासारख्या मुलीच्या योग्यतेचा नव्हताच नव्हता.

आणि मग, आधी मुक्रर केलेल्या वेळेस आपल्या शहरातील अनेक इन्स ऑफ कोर्टपैकी एकीमध्ये त्याची राहण्याची जागा होती, तिथे ती गेली; त्याच्या यच्चयावत चैनी व सुखसोयी पुरवल्या जाव्यात याचा डोळस विचार करून तिथला पैसेबाज जामानिमा सजवलेला होता. तो तिची वाटच बघत बसलेला

आढळला, तेव्हा मग लुटूपुटूची टोपीविक्री उरकून तिने आपल्या धंदापाण्याबद्दल लांबलचक पाल्हाळाची चर्चा सुरू केली; ती म्हणाली की फार खराब दिवस आले आहेत, आणि मग नोकरचाकर, शिकायला ठेवलेल्या मुली, कामवाल्या बायका ह्या कसकशा चांगल्यावाईट आहेत हे सगळं यापुढे सांगून झाल्यानंतर शेवटी एकदाचा जेव्हा विषय माझ्यावर आला, तेव्हा जीभ सुटली की जिला राहवत नाही अशी म्हातारी गप्पिष्ट बाई असल्याचा उत्तम बहाणा करीत तिने माझ्याबद्दल अशी काही पटण्यासारखी कथा रचली, आणि अघळपघळ भाबडेपणा दाखवीत मध्येमध्ये अशा काही युक्त्याप्रयुक्त्या पेरून माझ्या रूपाची व स्वभावाची वाखाणणी केली, की तिचा हेतू साध्य होण्याच्या दृष्टीने तो अगदी बरोब्बर पकवला गेला; आणि हे सर्व चालू असताना, त्याचा हेतू आपल्याला कळलेला नसल्याचं तिने वठवलेलं सोंग मात्र निव्वळ बिनतोड होतं.

पण आता अगदी काठ्यावर येऊन राहवत नाहीसं होताच, माझ्याविषयी त्याची काय भूमिका आहे व काय बेत आहेत याबद्दल तो आडवळणाने इशारे देऊ लागला, आणि मग पुष्कळसं घाळाघोळाचं बोलणं व अवघडलेपणा पार केल्यानंतर आपला मुद्दा तिच्यापर्यंत पोहोचवण्यात एकदाचा यशस्वी झाला (तिच्या हिशेबाप्रमाणे पुरेसा वेळ जात नाही तोपर्यंत ती अंग राखून राहिली); तेव्हा आता आपण नीतिमत्तेच्या कालिमाता आहोत असं दाखविण्यासाठी आक्रस्ताळेपणाने तोंडाचा पट्टा चालवून समोरच्या माणसामध्ये ह्या अवताराच्या सच्चेपणाबद्दल किंतू निर्माण करण्याऐवजी, मी आपली साधीसुधी, नाकासमोर चालणारी बाई आहे, कुणाच्या अध्यातमध्यात नसते, प्रामाणिकपणे कमावून खाते, पण मी काही अडून बसणाऱ्यांतली नव्हे, तेव्हा तुम्ही मुत्सद्दीपणाने व समजूतदारपणाने बोललात तर त्याची छाप पडून तुमच्या मनासारखं करायला मी तयार होईनही, अशी नक्कल तिने जास्त साजून दिसेलशी वठवली; पण हा सगळा प्रकार तिने इतक्या कसबीपणाने जुळवून आणला की निदान तीनचार भेटी होऊन जाईपर्यंत ही बाई आपल्याला मदत करील अशा आशेची धुगधुगीदेखील त्याच्या मनात उत्पन्न होऊ शकली नाही. हे होण्याआधी त्याने कित्येक निरोप व चिठ्ठ्या पाठवून, आणि माझा कल काय आहे याचा थेट अदमास घेण्याचे निष्फळ प्रयत्न करून, ह्या बाईच्या मदतीखेरीज माझ्यापर्यंत पोहोचण्याचा मार्ग नाही हा धडा आत्मसात केलेला होता; आणि अर्थात असं झाल्यामुळे, माझ्या चारित्र्याविषयीचा त्याचा ग्रह व माझी संभाव्य किंमत, या दोन्हींही गोष्टी त्याच्या लेखी आपोआपच उंचावलेल्या होत्या.

पण तरीदेखील आपल्या बेतात कोलदांडा घालू शकतील असे काही प्रसंग घडायला किंवा बातम्या फुटायला अवधी मिळेल इथपर्यंत ह्या अडचणी न ताणण्याची मिसेस कोलने दक्षता घेतली; आणि सरतेशेवटी, त्याने केलेल्या काकुळतीमुळे, दिलेल्या आश्वासनांमुळे, आणि विशेष म्हणजे त्याच्याकडून

उकळलेल्या घवघवीत रकमेमुळे आपलं मन वळलेलं आहे अशी बतावणी केली; शिवाय अशा तऱ्हेच्या प्रस्तावाला जर हो म्हणायचं, तर मग ते खूप पैसे मिळतील म्हणून म्हटलं तर काय बिघडलं, असा आव आणणं हा त्या अभिनयाचाच पुढचा भाग झाला; आणि तिच्या वागण्यातला एकूण आविर्भाव असा होता, की आपली शुचिर्भूत दशांगुळं ह्यासारख्या प्रकरणात तिने पूर्वी कधीही बुडवलेली नसणार अशी त्याची खात्री व्हावी.

अशा रीतीने, त्याच्या मनातल्या ईप्सित वस्तूचं मोल वाढवण्याकरिता गरजेच्या असलेल्या, अंशाअंशाने बिकट होत जाणाऱ्या, सगळ्या अडथळ्यांतून व अडचणींतून ती त्याला हात धरून घेऊन गेली; परिणामी माझ्या थोड्याफार बऱ्या दिसण्यावर तो इतका भाळला, मला हस्तगत करण्यासाठी इतका उतावळा होऊन गेला, आणि त्याला आमिषाकडे नेणाऱ्या प्रत्येक योजनेमध्ये आपणहून इतक्या उत्साहाने घुसला, की ह्या पात्राला आपण किती पद्धतशीरपणे गळाला लावला अशी फुशारकी मारायला मिसेस कोलला त्याने काहीच वाव ठेवला नाही. इतर बाबतींत हा माणूस डोळसपणे विचार करीत नसे असं नव्हे; किंवा त्याला लंडनच्या खाचाखोचा पुरेशा ठाऊक नव्हत्या, किंवा जो फसवाफसवीचा प्रयोग सध्या त्याच्यावर होत होता तसल्या प्रकारांची त्याला निदान स्वानुभवामुळे कल्पना नव्हती, असंही नव्हे: पण त्याची अभिलाषा आम्हाला इतकी सामिल झालेली होती, आणि तिच्यापायी आंधळा होऊन तो असा घाईने पुढे रेटला जात होता, की त्याचा जर थोडाही भ्रमनिरास झाला असता तर हा आपल्या आनंदाचा दुष्टपणे करण्यात आलेला विचका आहे असंच तो समजला असता.

तेव्हा मिसेस कोलला ज्या ठिकाणी तो आलेला हवा होता, तिथे धापा टाकीतच हजर झाल्यानंतर, माझ्याकडचा कपोलकल्पित मणी आपण किती स्वस्तात खरेदी केलेला आहे ह्या जाणीवेने तो स्वत:वर बेहद्द खूष होऊन जाईल अशी काळजी तिने घेतली: व्यवहार असा होता, की माझ्यासाठी तीनशे गिन्न्या फक्त, आणि सौदा जमवणारीला शंभर (अर्थात जितके परिश्रम तिने घेतलेले होते, आणि त्याच्या आग्रहाखातर आयुष्यात प्रथमच स्वत:च्या सद्विवेकबुद्धीचे आर्त आक्रोश कानाआड केलेले होते, त्यामानाने हा मोबदला तुटपुंजाच होता); ही संपूर्ण रक्कम माझ्या शरीराचा ताबा मिळताच ठोक हजर करणेची होती, आणि याखेरीज, ज्यांची किंमत तितकीशी नगण्य ठरणार नाही अशा कित्येक भेटवस्तू वाटाघाटींच्या दरम्यान मला देण्यात आलेल्या होत्याच: ही सारी बोलणी चालू असताना मध्येमध्ये ज्या काही अतिशय मोजक्या वेळींप्रसंगीं मला त्याच्यासमोर आणण्यात आलं होतं, त्यांवेळी मी निवळशंख कुमारिका आहे असं त्याला वाटावं म्हणून माझ्यातल्या नैसर्गिक शालीनतेला किती कमी ताण देऊन भागलं ही खरोखरीच अचंबा करण्यासारखी गोष्ट आहे: पुरुषांना अगत्याने

हवीहवीशी वाटणारी शुद्ध निरागसता माझ्या दृष्टिक्षेपांतून व हावभावांतून सतत नुसती झिरपत होती, आणि ही त्यांना हवी कशासाठी तर केवळ तिचा विध्वंस करण्याचं सुख मिटक्या मारीत भोगण्यासाठी; अर्थात पुरुषजातीचं सारं नैपुण्य जमेस धरूनही, अशा निरागसतेच्याच बाबतीत स्वत:ची फार दारुण फसगत करून घेण्याची त्यांना सवय असते.

जेव्हा कराराच्या अटींबद्दल पूर्ण एकवाक्यता झाली, ठरवल्याप्रमाणे पैसे रीतसर हाती पडले, व आता मुख्य कार्य सिद्धीस नेण्याव्यतिरिक्त काही उरलं नसून, यादृच्छिक उपभोग आणि उपयोगाकरिता मला त्याच्याकडे सुपूर्द करण्याची वेळ आली; तेव्हा त्याच्या राहण्याच्या जागेबद्दल मिसेस कोलने कमालीचं कौशल्य वापरून आडवळणाने जे सूचक आक्षेप घेतले त्यांचा परिणाम असा झाला की हा लग्नाचा बनाव तिच्या घरी पार पाडला जावा, ही जणू काही त्यालाच सुचलेली कल्पना व त्याचीच आग्रहाची विनंती ठरली: सुरवातीला अर्थात ती म्हणाली की माझ्या घरामध्ये असली थेरं मला नकोत, नोकराचाकरांना किंवा काम करणाऱ्या मुलींना यातलं काही कळलं तर असा अनर्थ घडेल की त्याची भरपाई हजार पाउंड मिळाले तरी व्हायची नाही... माझ्या नावाला कायमचा बट्टा लागेल – ह्या आणि अशासारख्या पुष्कळ सबबी तिने सांगितल्या. पण इतर सगळ्या पर्यायांविरुद्ध याहीपेक्षा हुकमी आक्षेप घेता येण्यासारखे असल्यामुळे (त्यातही असे आक्षेप प्रकर्षाने लागू पडतील असेच पर्याय सुचवण्याची तिने काळजी घेतल्यामुळे), शेवटी मन मोठं करून तेवढ्यापुरती त्याची सोय तिने पाहावी आणि आत्तापर्यंत इतकं केलं तसं आणखी थोडं करावं, हा मुद्दा मान्य झाला.

ह्या गृहस्थाच्या उतावळेपणाचा शक्य तितका मान ठेवून रात्र मुक्रर करण्यात आली. अक्षतकुमारिकेची भूमिका मी गौरवाने निभावून न्यावी यासाठी उपयोगी पडू शकेल अशी एकही सूचना देण्याची अथवा पूर्वतयारी करण्याची मिसेस कोलने दरम्यान बाकी ठेवलेली नव्हती; याला एकच अपवाद असा, की हा बेत तडीस नेताना माझ्या शरीराच्या ज्या अवयवाचा उपयोग होणार होता, तिथे आवश्यक तितका आवळपणा मला प्रकृतीनेच बहाल केलेला असल्यामुळे मुद्दाम तो तात्पुरता तयार करण्यासाठी जी कामचलाऊ साधने वापरली जातात (आणि गरम पाण्याच्या टबात टाकून परीक्षा घेतल्यास लगेच उघडकीस येतात) त्यांची उसनवारी करण्याची गरज नव्हती; शिवाय फूल खुडल्यानंतर पुष्कळदा (पण दरवेळी नव्हे) जी आरक्त लक्षणं त्याच्या जोडीने दिसतात त्यांकरिता मिसेस कोलने स्वत: शोधून काढलेला एक हुकमी उपाय माझ्या स्वाधीन केलेला होता, आणि याबद्दल उचित ठिकाणी कळेलच.

मिस्टर नॉर्बर्टच्या स्वागतासाठी अशा रीतीने सर्व व्यवस्था झाल्यानंतर, रात्री अकराच्या ठोक्याला, शांतता व गोपनीयता यांच्या दुहेरी परिणामाने तयार झालेल्या गूढ वातावरणात मिसेस कोलने स्वत:च त्याच्यासाठी दार उघडलं, आणि तिच्या बेडरूमकडे त्याला ती घेऊन गेली; तिथे एका जुन्या पद्धतीच्या पलंगावर मी बाहेरचे कपडे उतरवलेल्या अवस्थेत पडलेली होते; माझा श्वास वेगाने होत असण्यामागे खऱ्या कुमारिकेला वाटणारी धास्ती हे कारण जरी नसलं तरीदेखील बनावट कुमारिकेला वाटणारी कदाचित आणखी मोठी धास्ती हे मात्र नक्कीच होतं, व परिणामी माझ्यात जो भांबावल्याचा आणि चाचरल्याचा भाव दिसून येत होता त्याचं सारं श्रेय मात्र कुमारिकासुलभ लज्जेच्या खात्यावर जमा झालेलं होतं; पण वास्तविक गोष्ट अशी की माझ्या प्रेमिकापेक्षा अधिक नि:पक्षपाती दृष्टीच्या व्यक्तीलाही या दोहोंतला फरक वेगळा सांगता आला असता असं नाही: त्याला मी इथे प्रेमिक म्हणते ते अशासाठी की स्त्री हे ज्या पुरुषांचं मर्मस्थान असतं, त्यांचा याबाबतीत गैरफायदा घेतला जात असल्यामुळे त्यांना 'भोटम' म्हणून हिणवणं मला नेहमीच फार क्रूरपणाचं वाटत आलेलं आहे.

कोवळ्या मुलींना जेव्हा पहिल्यावहिल्या प्रसंगी पुरुषाच्या इच्छेवर सोडून दिलं जातं, तेव्हा केली जाणारी पारंपरिक बडबड करून मिसेस कोल आम्हा दोघांना तिच्या खोलीमध्ये एकमेकांवर सोपवून निघून गेली; जाताजाता हे सांगायला हवं की मिस्टर नॉर्बर्टने पूर्वी बोलून दाखवलेल्या आवडीनुसार सर्वत्र झगझगीत प्रकाश ठेवलेला होता, आणि यामुळे तो डोळयांत तेल घालून कडक परीक्षा करील असा जो रंग दिसत होता, तसं नंतर काही झालं नाही. अजून पुरते कपडे घातलेल्या अवस्थेत मिस्टर नॉर्बर्ट बिछान्याकडे झेपावताच मी माझं डोकं पांघरुणाखाली लपवलं, आणि त्यानंतर बराच वेळ माझ्या ओठांचा मी बचाव केल्यानंतरच मग केव्हातरी तो चुंबन घेण्यासाठी तिथपर्यंत पोहोचू शकला: अशा प्रसंगी खोटारडं कौमार्य खऱ्यापेक्षा जास्त त्रागा व जास्त प्रतिकार करतं, हे तत्त्व शंभर टक्के खरं आहे. तिथून तो माझ्या स्तनांवर घसरताच त्यांना स्पर्श करू न देण्यासाठी मी दातओठ खाऊन मुकाबला केला; आणि शेवटी माझ्या हातापाईमुळे त्रासून जाऊन, ह्या मुलीबरोबर बिछान्यात आल्यास तिची अधिक चांगली ओळख करून घेता येईल, अशा समजुतीने क्षणार्धात कपडे काढून टाकून तो आत शिरला.

मधल्या काळात मी त्याच्याकडे चोरून फेकलेल्या कटाक्षावरून मला हे सहज उमगलं, की आडपडदे टरकावण्यासाठी जी हिंमतदार कार्यक्षमता सहसा गरजेची असते, तशी अपेक्षा ह्या माणसाकडून बिलकुल ठेवता येण्यासारखी नव्हती; उलट त्याची पेद्रट क्षयरोगी अंगकाठी पाहून असा ग्रह होत होता की आत्ताची अवघड मोहीम त्याने स्वेच्छेने पत्करलेली नसून, ह्या पापाच्या पितराला मारून मुटकून

धाडण्यात आलेलं आहे. जेमतेम तिशी गाठेपर्यंतच त्याने आपली भूक इतकी कमजोर करून ठेवलेली होती की आता डिवचून जागी करावी लागते अशी तिची केविलवाणी अवस्था झाली होती; सदानकदा आणि एकामागून एक असे विषयसुखाचे तुडुंब घोट घेतच राहिल्यामुळे कंटाळलेल्या व हाडापर्यंत झिजून गेलेल्या शरीरात जी प्राकृतिक शक्ती उरली होती, तिच्याकडून फारसं पाठबळही त्याला मिळत नसे; आणि ह्या अतिचाराने त्याच्या जीवनातल्या हिरवळीवर छप्पन्न उन्हाळ्यांची एकत्रित कामगिरी पार पाडलेली होती: परंतु तरीदेखील, तारुण्यातला सारा चेकाळलेला अभिनिवेश त्याच्या स्वत:च्या समजुतीपुरता शाबूत असून, त्याचा छळवाद मांडण्याचं व त्याचवेळी त्याला कड्यावरून खाली घसरवण्यासाठी पराणी लावण्याचं काम तो करीत असे.

हा इसम आता बिछान्यात येताच, माझ्या हातांनी धरून ठेवलेलं पांघरूण मी त्याला हिसकावून घेऊन बाजूला फेकू दिलं, तशी आता माझ्यावर चढाया करायलाच नव्हे तर अंथरुणाची तपासणी करायला देखील त्याला पुरती मोकळीक मिळाली; आणि मी केलेल्या बचावाच्या प्रयत्नांतून माझ्या अंगप्रत्यंगाची जी घुसळण होत होती, तिच्यामुळे मी काहीही पूर्वतयारी केलेली नसल्याची त्याला सहजच खात्री करून घेता आली: पण तरीही इतक्या अनुभवी खेळाडूकडून मी जितक्या कडक तपासणीची धास्ती बाळगून होते तितकी त्याने केली नाही, हा मुद्दा त्याच्या पारड्यात टाकत्ये. माझ्या स्तनांभोवती आणि त्याबरोबरच अधिक मोक्याच्या दरवाज्याभोवती तटबंदी तयार करण्यासाठी माझा आतला सदरा मी वाजवीपेक्षा जास्तच वापरते आहे, असं लक्षात येताच त्याने तो सरळ फाडून काढला; पण तरीदेखील इतर बाबतींत तो अतिशय हळुवारपणे व माझा मान ठेवूनच वागत होता, आणि त्याचा मात्र अजिबात न ठेवणं हे माझं काळजीपूर्वक आखलेलं धोरण होतं.

आता यानंतर, नागडा पुरुष प्रथमच आपल्या बिछान्यात आढळणं इतक्या प्रचंड नवलाईच्या घटनेमुळे एखाद्या संपूर्ण निरागस मुलीला जो काही अवघडलेपणा, बाकबूक आणि धास्ती वाटेल असं समजलं जातं, त्या साऱ्याचा अभिनय मी करून दाखविला. त्याने बळजोरीने घेतल्याखेरीज त्याला चुंबनदेखील मिळालं नाही; माझ्या स्तनांवरचा त्याचा हात मी डझनभर वेळा झिडकारून टाकला; पण तेवढ्या वेळात, ते घट्ट व दाटसर आहेत आणि हा माल अजून हाताळला गेलेला नाही अशी त्याने मनाची निश्चिती करून घेतलेली होती. पण आता मुख्य मुद्द्यासाठी उतावळा होऊन त्याने स्वत:ला माझ्या अंगावर झोकून दिलं, आणि आधी बोटाने माझी परीक्षा करण्याचा प्रयत्न करून स्वत:करिता पुढे रस्ता काढण्याची तयारी दाखविली; तेव्हा त्याच्या ह्या वागण्याबद्दल मी फार कळवळून तक्रार केली: तुम्ही असं करालसं वाटलं नव्हतं... मी नासले आता... हे नशिबी यावं असं मी काय केलं असेन... मी आता उठूनच बसत्ये..., आणि हे चालू असताना सारा वेळ मी मांड्या इतक्या घट्ट खिळवून ठेवलेल्या

होत्या, की त्या वेगळ्या करणं किंवा आणखी प्रगती करणं त्याच्याइतक्या ताकदीच्या माणसाला जमणारं नव्हतं. डाव माझ्या पटांगणात चालू असल्यामुळे, आणि माझ्या व त्याच्याही हालचाली माझ्या ताब्यात असल्यामुळे, त्याला फसवणं हे आंधळ्याबरोबर सारीपाट खेळण्याइतकं सोपं होतं. ह्या कालावधीत, विशेष गैरसोय न होता येजा करू शकेल इतपत आकाराचं त्याचं अवजार, ज्या भागाकडे जाणारा रस्ता मी मांड्या वळवून बंद केलेला होता त्यावर त्याने कडकपणे लावून धरलं होतं; पण केवळ शारीरिक ताकदीने विशेष काही साधत नाही हे उमगताच त्याने विनवण्या व युक्तिवाद करण्याचा मार्ग पत्करला: आणि याला मी शरमून गेलेल्या, घाबरलेल्या आवाजात कशीतरी उत्तरं केली, की तुम्ही मला मारून टाकाल अशी मला धास्ती वाटते... अरे, देवा रे!... नका हो असं करू... मला पूर्वी असं कुणीसुद्धा केलं नव्हतं हो... तुम्हाला लाज कशी वाटत नाही म्हणत्ये मी... मला वाटते आहे गं... सारांश असा, की निरागसता व धाकधूक हे गुणविशेष व्यक्त करण्यासाठी जो किरकिरीचा व आडमुठेपणाचा खुळचट बालिश सूर माझ्या समजुतीप्रमाणे त्यातल्या त्यात उचित वाटला, तो मी लावला.

पण असाच काही वेळ गेल्यानंतर, शब्दाने व कृतीने जो तुंबळ हट्टाग्रह त्याने चालवला होता, त्याच्यापुढे शरण गेल्याची बतावणी करीत मी माझ्या मांड्या कंजूषपणे किंचितशा उघडल्या, जेणेकरून द्विदल प्रवेशद्वारावर त्याला आपल्या साधनाचं टोक कसंबसं टेकवता आलं: पण आत येण्याकरिता तो दमछाक होईपर्यंत काबाडकष्ट करीत असतानाच मी माझं अंग वळवून त्याला तिरकस अंशातून सामोरी गेल्यामुळे त्याचा बेत फसला; इतकंच नव्हे, तर जणू काही त्याने मला हृदयातच भोसकलं असावं अशा प्रकारे किंकाळी फोडून मी त्याला इतक्या थाडकन झिडकारून दिला, की अंगात इतकी शक्ती असूनही खोगीरावर मांड कायम ठेवणं त्याला शक्य झालं नाही: ह्या प्रकाराने तो सटपटला खराच, पण माझ्या बुजरेपणामुळे नाराज झाला असं मात्र बिलकुल नव्हे; याउलट मला तरी अशी पक्की खात्री आहे की त्याला मी अधिकच आवडू लागले; आणि ह्या अडचणी त्याच्या तात्कालिक सुखाच्या आड जरी येत असल्या, तरीदेखील त्या येताहेत याच कारणासाठी तो स्वत:वर बेहद्द खूष होऊन गेला.

पण आता उशीर सहन होणार नाही इतका तो चेकाळला होता; तेव्हा तो पुन्हा स्वार झाला, थोडीशी कळ काढ अशी त्याने माझी विनवणी केली, आणि अतोनात लाडीगोडीच्या शब्दांत मला प्रलोभने दाखवीत, वचने देत, कुरवाळून शांत करू लागला; तेव्हा मात्र, माझी समजूत थोडीफार पटली आहे आणि त्याने मला जी भयंकर इजा केली होती त्याबद्दल माझा झालेला संताप काहीसा निवळला आहे असा आव आणीत, मी त्याला माझ्या मांड्या एकमेकींपासून बाजूला घेऊन नव्या प्रयोगासाठी रस्ता

खुला करू दिला; पण त्याच्या टोकाची हालचाल व दिशा मी इतक्या कुशलतेने सांभाळली की छिद्र अगदी थोडंसं उघडतं ना उघडतं तोच अचूक क्षण साधून मी दिलेला हिसका हा त्याचं आगमन फिसकटल्यामुळे नव्हे तर त्याच्या प्रयत्नांनी मला दुखल्यामुळे बसल्यासारखा वाटावा: शिवाय ह्या प्रसंगाला सोबत म्हणून साजेसे हावभाव; आणि त्यांच्या बरोबरीने, हा कसं करतोय गं मला... मला ठार मारलं गं मेल्यानं... मी मरत्ये आता... हे आणि अशासारखे उद्गार मध्येमध्ये काढून केलेली पिरपीर आणि श्वासांची घरघर, ह्या सगळ्याचा पुरवठा करण्यात मी मागे राहिले नाही.

परंतु एकामागून एक प्रयत्न करूनही, निदान सद्यप्रसंगी तरी आपला हेतू पुढे दामटवण्यात तो थोडादेखील यशस्वी झालेला नव्हता, आणि तेवढ्यातच त्याच्या सुखाचा पारा इतक्या झपाट्याने अंगातून वर चढला की तो आवरून धरणं किंवा खोळंबून ठेवणं त्याला जमेना; उत्कलनबिंदूपर्यंत पोहोचत असतानाच्या गतीमुळे त्याच्या अंगात रासवट जोम चढून अचानक त्याने जी एक जोरदार ढुशी दिली तिने मला जवळजवळ बेसावधच पकडलं, आणि तो इथपर्यंत घुसला की बाहेरच्या छिद्राच्या किंचित आत मला गरम द्रवाची शिंपडणूक जाणवली; पण ती त्याला तिथे पुरी करू न देण्याइतकी मी निर्दयी असल्यामुळे, एक अत्यंत भेसूर किंकाळी फोडून त्याला मी पुन्हा बाहेर फेकून दिला, जणू काही वेदना इतक्या होताहेत की माझा आवाज कोणी ऐकेल याची मला शुद्धही राहिलेली नाही. मग मात्र हे उघडच कळून येत होतं की त्याचा प्रवास शेवटापर्यंत जायचा त्याच्या समजुतीनुसार ज्या कारणांमुळे राहिला, त्यांतून जितकं समाधान व सुख त्याला मिळालं, तितकं तो पुरता यशस्वी झाल्यास मिळालं नसतं. तेव्हा वास्तविक जो अत्यानंद त्याला चाखता येण्याची मुळीच शक्यता नव्हती, तो त्याच्यापर्यंत आणण्यासाठी मी हा सारा खोटेपणा केला, अशा युक्तिवादाने मी माझ्या वागण्याचं स्वत:शी समर्थन करून घेतलं.

पण एका स्खलनामुळे त्याच्यावरचा ताण सैलावून त्याला हायसं वाटू लागताच, आगामी प्रयत्न सहन करण्याकरिता माझी मन:स्थिती अनुकूल व्हावी, म्हणून तो माझी समजूत काढून मला प्रोत्साहन देण्याच्या कामी लागला; आणि ह्या प्रयत्नाची पूर्वतयारी म्हणून शक्ती गोळा करण्यासाठी, स्पर्शातून व दृष्टीतून जे जे काही किडुकमिडुक त्याच्या कल्पनाशक्तीला सापडेल ते सर्व उचलून घेऊ लागला; याकरिता माझ्या अख्ख्या शरीराचा प्रत्येक भाग वेगवेगळा निरखून पाहात आपली पसंती दाखवीत त्याने बेभान होऊन टाळ्या वाजवल्या, सगळीकडे सरसकट चुंबने उमटवली, आणि लालचावलेल्या चावटपणाने हात लावण्यात, न्याहाळण्यात व चाळे करण्यांत, एकाही अवयवाला सूट अशी दिली नाही.

पण त्याची स्फूर्ती इतक्या लवकर परत आली नाही; अनेकदा मला असं जाणवलं की तो दार ढकलतो आहे, आणि ते मोडून काढणं तर सोडाच पण मी सताड उघडून जरी धरलं तरीसुद्धा आत येण्याचं त्राण त्याच्यात आहे का याबद्दल शंकाच आहे; पण अशा गोष्टीबद्दल मला वाईट वाटण्याइतकी किंवा मी शरमून जाण्याइतकी ह्या प्रांताची माहिती मला नाही, असा त्याचा समज होता. यापुढे कितीतरी वेळ तो स्वत:ला व मला दमवीत बसला तेव्हा कुठे हल्ला पुढे चालू ठेवण्यात त्याला यश मिळण्याची थोडीफार शक्यता उत्पन्न झाली, मग मात्र मी त्याला इतका फिरवला आणि चकवला की आत येण्याच्या उद्देशाने त्याची जाणवण्याइतपत प्रगती होईपर्यंत तो चांगलाच घामाघूम होऊन शिणून गेलेला होता: परिणामी त्याचं दुसरं स्खलन झालं तेव्हा पहाट होत आली होती, व तेव्हासुद्धा तो अर्धवटच शिरला होता; आणि ह्या संपूर्ण कालखंडामध्ये, त्याच्या तुफानी जोमदारपणाबद्दल, आणि मला दुभंगून टाकते आहे असं वाटविणाऱ्या त्या वस्तूच्या अतिप्रचंड आकाराबद्दल, मी न थांबता रडतभेकत तक्रार करीत होते.

पण इतका वेळ एकसारखा व्यायाम होत राहिल्यामुळे दमून जाऊन माझा विक्रमादित्य हळूहळू रणांगणातून माघार घेऊ लागला, आणि श्रमपरिहार म्हणून त्याला थोडीफार विश्रांती हवीहवीशी वाटू लागली. तेव्हा मग अतिशय मार्दवाने माझं चुंबन घेऊन व मला आराम करायला सांगून तो घनदाट झोपून गेला: आणि असं झाल्याची माझी पक्की खातरजमा होताच, माझ्या हालचालींनी तो जागा होऊ नये याकरिता शरीरावर कमालीचं नियंत्रण ठेवून, पण त्याचवेळी फारशी अडचण न येता किंवा धोका पत्करावा न लागता, माझ्या अक्षतकौमार्याचा पुरेपूर निर्वाळा देण्यासाठी मिसेस कोलने दाखविलेल्या युक्तीचा मी अवलंब केला.

पलंगाच्या डोक्याच्या बाजूला जिथे चौकटीत लाकडी खांब खुपसलेले असतात, त्याच्या किंचित वर प्रत्येक खांबामध्ये एक लहान खण तयार करण्यात आलेला होता, आणि अतिशय भोचकपणे शोध घेतला तरीसुद्धा उघडकीस येऊ नये अशा प्रकारे लाकूडकामाच्या रेषांमध्ये तो बेमालूम लपवलेला होता; यांतला प्रत्येक खण स्प्रिंगला किंचितसा हात लावून सहज उघडतामिटता येत असे, आत एका काचेच्या पसरट भांड्यामध्ये स्वयंपाकघरात तयार केलेलं पातळ रक्त भरलं होतं, आणि पटकन वापरता येईल असा एक स्पंज त्यात भिजवून ठेवलेला होता; तो हलकेच हातात घेऊन, बाहेर काढून, मांड्यांच्या मधोमध योग्य प्रकारे पिळला की मुलीची अब्रू राखायला जितका पुरेसा होईल त्यापेक्षा बराच जास्त लाल द्रव बाहेर पडत असे; आणि मग तो परत ठेवून स्प्रिंगला हात लावला की पकडले जाण्याचीच नव्हे तर संशय येण्याचीही शक्यता निकालात निघत असे. ह्या सगळ्या कामाला पाव मिनिटसुद्धा लागण्यासारखं नव्हतं, आणि पलंगाच्या दोन्ही खांबांत ही तजवीज असल्यामुळे कुठल्याही

बाजूला झोपलेलं असलं तरीदेखील सारं काही तितकंच सोपं व सोयिस्कर होतं. आता हे खरं की त्याने जर जागं होऊन मला मुद्देमालासकट पकडलं असतं तर निदान मला फार ओशाळं वाटलं असतं; पण मी जितकी काळजी घेतली होती ती हिशेबात धरता, तसं न होण्याची शक्यता हजार विरुद्ध एक इतक्या प्रमाणात मला धार्जिणी होती.

आता मला हायसं वाटत होतं, आणि त्याच्या बाजूने उद्भवू शकणाऱ्या कसल्याही शंकेची किंवा संशयाची मला भीती राहिलेली नव्हती, तेव्हा मी झोप घेण्याच्या दृष्टीने प्रामाणिक प्रयत्न सुरू केले; पण ती मिळाली नाहीच, कारण अर्ध्या तासातच हा सभ्य गृहस्थ पुन्हा उठून माझ्या दिशेला वळला; मी गाढ झोपेत असल्याचं जे सोंग आणलेलं होतं त्याचा त्याने फारसा मुलाहिजा ठेवला नाही, आणि आता नव्याने चढाई करण्याचा निर्धार करून तो माझी चुंबने घेऊन मला कुरवाळू लागताच, मी आत्ताच जागी झाले आहे असं भासवीत, आणि झोपमोड झाल्याबद्दल कुरकुरत, थोडीशी विश्रांती मिळाल्यामुळे अंगभरच्या भयानक वेदनांचा अंमळ विसर पडला होता पण आता त्या साऱ्या पुन्हा परतल्या आहेत, अशी तक्रार केली. पण सुखाकरिता व माझ्या कौमार्यावर संपूर्ण विजय प्रस्थापित करण्याकरिता अधीर झाल्यामुळे, माझ्या सहनशक्तीला आमिष दाखवून चुचकारण्यासाठी व माझ्या मनातली अढी मोडण्यासाठी जे म्हणून उपयोगी पडेल ते सर्व काही त्याने बोलून दाखविलं; आणि त्याच्या विजयध्वजाने केलेल्या विध्वंसाचा रक्तरंजित पुरावा आता माझ्याजवळ असल्यामुळे ते मी सहानुभूतीने ऐकून घेतलं, पण तरीदेखील त्याला इतक्यात आत येऊ न देणं हेच धोरण मला शहाणपणाचं वाटलं. त्याच्या केविलवाण्या आग्रहाला मी सुस्कारे सोडून कण्हत इतकंच उत्तर दिलं, की मला फार दुखतंय, सहन होत नाही, तुम्ही नक्की आत काहीतरी मोडलंय, तुम्ही अगदी दुष्ट आहात! ... हे ऐकताच त्याने पांघरूण उचललं, आणि विझत आलेल्या पलित्याच्या मिणमिणत्या प्रकाशात रणभूमीकडे दृष्टिक्षेप टाकला; तेव्हा माझ्या मांड्या, सुती सदरा व अंथरूण ह्या साऱ्यावर दिसणारे ढळढळीत डाग हे त्याच्या शेवटच्या अर्ध्यामुर्ध्या प्रवेशाचा परिणाम म्हणून बाहेर आलेल्या कौमार्यस्त्रावाचे असले पाहिजेत असा निष्कर्ष त्याने लागलीच काढला: यामुळे अगदी बालंबाल खात्री होऊन त्याचं देहभान हरपलं; आणि त्याच्या हरखून, फुशारून जाण्याला परिसीमा राहिली नाही.

जादूचा प्रयोग पूर्णपणे यशस्वी झाला होता, आणि आपण आत्तापर्यंत बंद असलेल्या खाणीत उतरलो आहोत याखेरीज दुसरी कुठलीही कल्पना त्याच्या डोक्यात शिरली नाही; तेव्हा इतक्या सबळ पुराव्यानिशी हजर झालेल्या त्या तर्कामुळे माझ्याविषयीची त्याची कणव आणि ही खाण पुरती फोडून काढण्यासाठीचा त्याचा उत्साह, अशा दोन्ही गोष्टी दुप्पट झाल्या. अत्यंत हर्षोत्फुल्ल होऊन त्याने माझं चुंबन घेतलं, माझी समजूत काढली, मला दुखावल्याबद्दल माफी मागितली: आणि याबरोबरच तो

म्हणाला की हे असं नेहमीच होतं, पण सगळयात त्रासदायक असा टप्पा आता मागे पडलेला आहे, यापुढे आणखी थोडासा धीर करून कळ काढलीस तर सगळं उरकूनच घेता येईल, आणि त्यानंतर मग नुसती मजाच मजा असेल.

हळूहळू मी त्याचं म्हणणं स्वत:ला पटू दिलं, आणि जणू काही सुकाणू त्याच्या हाती सोपवून, माझ्या मांड्या सावकाश फाकवून त्याला आत यायला मोकळीक दिली; प्रगती होत होत तो थोडासा माझ्यात आला, तेव्हा त्याच्या प्रवेशाचं व्यवस्थापन काटेकोरपणे सांभाळीत मी गोल जिन्याची हालचाल अशी अचूक केली की जेणेकरून समोरच्या प्रशस्त राजमार्गावर त्याला जाता येऊ नये; अंगाची कौशल्यपूर्ण वळवळ करून आणि ते वाकडंतिकडं हलवून मी त्याच्या आगमनात अशा कृत्रिम अडचणी उभ्या केल्या, की अत्यंत दमछाक होईल अशी हातापायी करून इंचाइंचाने प्रदेश काबीज करणं त्याला भाग पडलं; शिवाय माझा आक्रस्ताळी किरकिरेपणा मी पूर्ण वेळ साथीला चालूच ठेवलेला होता: कालांतराने बराच जोर खर्ची घातल्यानंतर तो वळणावळणाने पुरता घरात आला, आणि त्याच्या समजुतीनुसार माझ्या आडपडद्यावर त्याने एक प्राणांतिक आघात करताच, त्याच क्षणी मी भयंकर रडारड सुरू करावी म्हणून जणू काही त्याने खुणेचा बावटाच हलवला. पायदळी तुडवलेल्या जोडीदारिणीवर पंख फडफडवणाऱ्या विजयोन्मत्त कोंबड्याप्रमाणे तो मात्र आपली क्रिया एकसारखा करीत राहिला: परंतु शत्रुपक्षाचा संपूर्ण धुव्वा उडविल्याच्या त्याच्या मनातल्या ह्या कल्पनेने सुखाचा पारा चढत जात अशा पातळीपर्यंत आला, की वितळण्याचा क्षण लवकरच मला जाणवून गेला; आणि त्या वेळेस मी मात्र, खोलवर जखमी झालेल्या, भेदरलेल्या, श्वास कोंडलेल्या, उद्धवस्त झालेल्या, कौमार्यदशा इतिहासजमा झालेल्या मुलीचा अभिनय करीत उताणी पडून होते.

तुम्ही कदाचित मला विचाराल की हे सारं होत असताना मला काही सुख मिळालं का? मी निक्षून सांगत्ये, की फार थोडं किंवा जवळजवळ नाहीच; मात्र अगदी शेवटीशेवटी, झगडा इतका दीर्घकाळ चालू राहिल्यामुळे व नेहमी संवेदनाशील असलेला तो भाग सतत डिवचला गेल्यामुळे सुखाची एक पुसटशी भावना आपसूकच जागी झाली; पण एकतर ज्या माणसाच्या मिठ्या मी केवळ बाजारू हिशेबाखातर सहन करीत होते तो मला आवडला नव्हता; आणि दुसरं असं की जी लबाड भूमिका मी बजावीत होते, त्यात मला गोवलं गेल्याबद्दल माझ्याकडे ज्या काही सबबी असायच्या त्या असल्या तरीदेखील स्वत:च्या मनाची बोच अगदीच नव्हती असं नाही; पण अर्थात सुखभावनेपासून अलिप्त राहिल्यामुळे, माझ्या जाणीवांवर व हालचालींवर मला पुरेपूर ताबा ठेवता आला, आणि ह्या सगळ्या बनवाबनवीच्या प्रसंगातून मी माझं सोंग जास्त चांगलं निभावून नेऊ शकले.

काही वेळ गेल्यानंतर, त्याचे हळुवार सांत्वनशब्द, चुंबने व मिठ्या यांच्या एकत्रित परिणामाने माझ्यात थोडाफार जीव आल्यासारखा वाटू लागला; तेव्हा आता मी त्याच्यावर संतापून उठले, आणि माझं वाटोळं केल्याबद्दल ग्राम्य शब्दांत त्याला अशी घालून पाडून बोलले, की आपण ते करू शकल्याबद्दल त्याला वाटत असलेल्या आत्मसंतुष्टतेत भरच पडली; पण यानंतर लवकरच पुन्हा एक मरतुकडी चढाई करण्यासाठी जेव्हा तो सरसावला, तेव्हा त्याच्यावर दया दाखवणंच त्याच्या हिताचं होईल असं काही विशिष्ट निरीक्षणांती माझ्या लक्षात आलं; आणि म्हणूनच, मला इतकं जबरदस्त लागलेलं आहे आणि ठणकतं आहे की आणखी एक प्रयत्न अंगावर घेणं मुळीच जमायचं नाही, अशी त्याच्या ताकदीची खुशामत करणारी सबब सांगून यापुढील सर्व कारवायांना मी स्पष्ट मज्जाव केला. तेव्हा त्याने उदार मनाने मला सुट्टी दिली, आणि दुसऱ्या दिवशीची सकाळ होऊ लागल्यामुळे यापेक्षा जास्त आग्रह सहन करायला लावला नाही; आता त्याने घंटी वाजवून मिसेस कोलला बोलावून घेतलं, आणि ही मुलगी यापूर्वी अस्पृष्ट होती याबद्दल माझी पूर्ण खात्री झालेली आहे, व रात्री एका दट्ट्यात मी बुरूज उद्ध्वस्त केला असल्याचा चोख पुरावा तुम्हाला ह्या अंथरुणावर रक्ताच्या अक्षरांनी लिहिलेला आढळेल, असा वृत्तांत अत्यंत हर्षभरित आवाजात तिला कळवला.

तिच्याइतक्या अनुभवी व संभाषणचतुर बाईने हा विनोद कसा सांभाळून घेतला, आणि शरम, उद्वेग, व माझ्याबद्दल वाटणारी कणव ह्या साऱ्या भावना व्यक्त करणारे सरमिसळ उद्गार काढून त्याला कसा खेळवला, ह्याचा अंदाज तुम्हाला बांधता येईलच; पण 'एकदाचं सगळं व्यवस्थित पार पडलं ह्यातच मला आनंद आहे' असं जे शेवटास ती म्हणाली, ते मात्र मनापासूनच म्हणाली असा माझा तर्क आहे. आणि मी पहिली रात्र त्याच्या घरात काढण्याला (ह्या घराची रचना अभ्यासांती अशी केलेली होती, की तिथे निरंकुशपणे भानगडी करता याव्यात), तिने जो असा बिनतोड आक्षेप घेतला होता की मी अजून कुमारिका असल्यामुळे पुरुषमाणसाच्या राहत्या जागी जाऊन त्याच्याबरोबर बिछान्यात एकटं असायच्या कल्पनेने फार धास्तावेन; तो आता रद्दबातल झालेला असल्यामुळे तिने आता त्याची बाजू घेऊन मला लटकेच असं पटवून दिलं, की हे गृहस्थ म्हणतील तेव्हातेव्हा तू त्यांच्या घरी जात जा, पण तरीही अजून माझ्याकडेच काम करते आहेस असं वरकरणी दाखवीत राहा; जेणेकरून तुझी अब्रू आणि तिच्याचबरोबर चांगला नवरा मिळण्याची संधी जाणार नाही, शिवाय माझ्याही घराचं नाव बद्दू होणार नाही.

हे सगळं मिस्टर नॉर्बर्टला इतकं शहाणपणाचं व समंजसपणाचं वाटलं, की तिचा अंतस्थ हेतू त्याच्या किंचितही लक्षात आला नाही (हा माणूस जर तिचं घर वापरीत राहिला असता, तर जी प्रतिमा तिने त्याच्यासमोर निर्माण केलेली होती, तिच्याशी न जुळणाऱ्या काही गोष्टी कालांतराने त्याच्या

डोळ्यांसमोर आल्या असत्या); त्याखेरीज तिचा हा बेत त्याच्यासाठी जास्त सोयीचा, आणि स्वच्छंदी असल्याच्या स्वत:विषयीच्या त्याच्या कल्पनांना पोषक असा होता. फार निकडीची असलेली झोप घेण्याकरिता मला मोकळीक देत तो आता खुर्चीवरून उठला, आणि माझ्यासंबंधीच्या सर्व बाबींची पूर्तता झाल्यानंतर मिसेस कोलने गौप्यस्फोट न होऊ देता त्याला घराबाहेर काढला. मी जागीच असल्यामुळे यानंतर ती आत आली, आणि कामगिरी यशस्वी केल्याबद्दल तिने माझी पाठ थोपटली. तिच्या नेहमीच्या अनाग्रहीपणाला व नेमस्तपणाला साजेशी वर्तणूक ठेवून, मी कमावलेल्या पैशातला थोडाही हिस्सा घेण्याचं तिने नाकारलं, आणि आत्तापर्यंत माझ्याकडची बरीच फुगलेली माया सांभाळण्यासाठी अशी एक टापटिपीची व सोपी रीत मला घालून दिली, की दहा वर्षाच्या पोराला देखील नेमका हिशेब ठेवून ती बिनघोरपणे जपता आली असती.

ठेवलेली बाई हे माझं पूर्वीचं स्थान मला आता परत मिळालेलं होतं, आणि जेव्हाजेव्हा मिस्टर नॉर्बर्ट माझ्याकरिता निरोप देऊन माणूस पाठवी, तेव्हा नेहमीच त्याच्या वाटेत येण्याची दक्षता बाळगून, साहेबांच्या घरी मी अगदी घड्याळाच्या ठोक्याला हजर राहात असे; हे सर्वच प्रकरण मी इतक्या सावधगिरीने सांभाळलं, की मिसेस कोलचे व माझे नक्की संबंध काय आहेत ह्याचा त्याला ताकास तूर लागला नाही; पण अर्थात, काहीही कामधाम न करता लंडनच्या चैनींसाठीच स्वत:ला वाहून घ्यावं असा ह्या माणसाचा जीवनक्रम असल्यामुळे, त्यांच्या सततच्या घाईमध्ये त्याला स्वत:च्या व्यवहारांकडे लक्ष द्यायला सवड नसे, मग माझ्या आयुष्यात नाक खुपसण्याची गोष्टच सोडा.

ह्या मधल्या काळातील माझ्या स्वत:च्या अनुभवावरून पाहिलं तर मी असा निष्कर्ष काढीन, की जे पुरुष त्यांच्या प्रकृतीधर्मामुळे, किंवा वय झाल्यामुळे, किंवा अतिचाराचा परिणाम म्हणून मंद शक्तीचे असतात, आणि म्हणूनच त्यांना स्त्रीजातीचा उपयोग सर्वांत कमी असतो; अशांच्या अंगवस्त्रांना त्या गादीवर असेपर्यंत जितकी सढळ हाताने बिदागी मिळते, आणि जितकी लाडाकोडाची वागणूक मिळते, तितकी दुसऱ्या कुणालाही मिळत नाही: याचं कारण असं की स्त्रीला काहीतरी करून समाधानात ठेवलं पाहिजे याची त्यांना जाणीव असते, त्यामुळे ते हजार वेळा तिच्याकडे गोडगोड बारीकसारीक लक्ष देऊन, भेटवस्तू आणून, मिठ्या मारून, गुपिते सांगून चारा घालीत बसतात, आणि त्यांच्यातल्या मुख्य कमतरतेची भरपाई करण्याचे मार्ग व साधने शोधण्यात आपली कल्पनाशक्ती खर्च करीत राहतात; पण इतकंच नव्हे, तर ही कमतरता भरून काढण्यासाठी, स्वत:मधल्या झोपाळू शक्तींना जागं करण्यासाठी, आणि आपल्या विषयवासनेकरिता निसर्गाकडून उसनं बळ आणण्यासाठी हे लोक कामी आणत नाहीत, अशा कुठल्यातरी युक्त्याप्रयुक्त्या, उपाययोजना किंवा सुखाच्या प्रांतातल्या आडवाटा दाखवता येतील का?! पण त्यांचं दुर्भाग्य हेच की डिवचाडिवची, हाताळाहाताळी,

अवयवांच्या चावट रचना, वासना चाळवणारे हावभाव, ह्या सगळ्या औषधी मात्रा वापरून जेव्हा त्यांना एकदाचा कसाबसा पातळ पचपचीत देहभोग मिळतो, तेव्हा अगदी त्याच वेळी त्यांच्या सुखाच्या जोडीदारिणीमध्ये जी वासनेची ज्योत त्यांनी पेटवलेली असते, ती विझवण्याचं सामर्थ्य त्यांच्यात नसतं; आणि म्हणूनच मग स्वतःची शांती करून घेण्याच्या उद्देशाने, आजूबाजूचा जो पुरुष हे अपुरं राहिलेलं काम पुरं करील त्याच्या बाहुपाशात ती अगतिकपणे लोटली जाते; ज्याला अधिक जोरकस आणि समाधान देणारी कृती जमते असा एखादा पडताळा पाहून पसंत केलेला यार अशा रीतीने त्यांच्या पाठीमागे त्यांना फसवीत राहतो; कारण मुख्यत्वेकरून माझ्यासारख्या वृत्तीच्या स्त्रियांची घडणच अशी असते की आमचं हृदय जरी सरळमार्गी असलं, तरीदेखील पट्टराणीच्या मिजाशीत वागून स्वतःच्या वेगळ्या राजनीतीनुसार कारभार चालवणारं एक इंद्रिय आमच्यामध्ये वसलेलं असतं; आणि तिचा एक कडक व्यावहारिक नियम असा आहे की सिंहासनासमोर रुजू असणाऱ्या सेवेचा जिथे प्रश्न येतो, तिथे कामगिरीच्या बदल्यात नुसता मुजरा कधीही खपवून घ्यायचा नाही.

मिस्टर नॉर्बर्टची व्यथा याच कमनशिबी जातकुळीतील असल्यामुळे, मी त्याला अतोनात आवडते असं जरी तो बोलून दाखवीत असला, तरीसुद्धा माझ्याबरोबर मुख्य उपभोग साजरा करता यावा म्हणून कित्येकदा त्याला जी वैविध्यपूर्ण व लांबलचक सव्यापसव्ये करावी लागत, ती एकसमयावच्छेदेकरून वैताग आणणारी आणि शरीर चाळवणारी होती. काहीवेळा शेकोटीमध्ये धगधगता विस्तव पेटवून तो मला संपूर्ण नग्नावस्थेत गालिचावर खाली झोपवी, आणि तासभर माझ्याकडे पाहात विचारमग्न होऊन बसे; शरीराला धारण करणं शक्य आहे त्या सर्व प्रकारच्या चित्राकृतींत माझ्या अवयवांची रचना आलटून पालटून बदलत राही, प्रत्येक ठिकाणी चुंबने घेई; आणि त्यातही, सर्वांत गुप्त आणि मोक्याच्या अशा त्या भागाचा अपवाद मुळीच न केला जाता, उलट हा विशिष्ट पद्धतीचा नजराणा पुष्कळसा त्यालाच मिळत असे.

पण त्याचे स्पर्श इतके हुळहुळते आणि चावट असत, मखमली वैभवाने साऱ्या अंगभर विखुरलेले आणि प्रसंगी खोलवर शिरणारे असत, की चेतवणाऱ्या ज्वाला माझ्यामध्ये थैमान घालू लागून मी वेडावून जाई; आणि एवढं सगळं होऊन पुष्कळ आटापिटा केल्यानंतर थोडाच वेळ तग धरू शकणारं उत्तेजन त्याला साधलेलं असताना, एकतर ते पाणचट घामात वितळून तरी जाई, किंवा माझ्या उत्सुक वासनेला चिडवून तिची खिल्ली उडविण्याकरिता मुहूर्त येण्याआधीच धडपडतं स्खलन होऊन जाई; आणि प्रकरण शेवटापर्यंत जर गेलंच, तर त्यातली कार्यसिद्धी किती अडखळती आणि मेंघळट असे! त्याने पेटवलेल्या ज्योती विझवण्यासाठी ही दोनचार कोमट थेंबांची शिंपडणूक किती अपुरी पडे!

अशा एका संध्याकाळची आठवण अजूनही मनात ताजी आहे: त्याला भेट देऊन घराकडे येत असताना, त्याने जागं केलेलं पण नंतर ज्याची शांत करण्याच्या कामी त्याची जादुई कांडी अपुरी पडलेली होती, असं एक पिशाच्च माझ्या अंगात घोटाळत होतं; मी एका रस्त्याच्या वळणावर होते, तसा एक तरुण खलाशी माझ्या बाजूने पुढे गेला. नेहमी जशा साध्यासुध्या, नीटस कपड्यांत आपण लोकांना दिसावं असा माझा कटाक्ष असे, तशीच मी तेव्हाही होते; आणि होतं त्यापेक्षा माझं डोकं जर अधिक ताळ्यावर असतं तर उद्भवली नसती, अशी एक प्रकारची अस्वस्थता कदाचित माझ्या चालीमध्ये पाहता येत होती. ते काही असो, पण त्याने मला बाजारातली समजून एकदम धरलं, आणि विशेष उपचार न पाळता हात माझ्या गळ्याभोवती टाकून मोठ्या उत्स्फूर्तपणे माझं एक गोड चुंबन घेतलं. त्याच्या ह्या उद्धटपणामुळे माझ्या रागाचा पारा चढू लागून मी त्याच्याकडे दृष्टिक्षेप टाकला, पण त्याची उंचीपुरी मर्दानी अंगयष्टी, देखणा चेहरा व देखणं शरीर पाहताच माझ्या पूर्वग्रहाला मऊपणा येऊन तो वेगळ्या तऱ्हेच्या भावनांमध्ये पालटून गेला; मी त्याच्याकडे जे एकटक डोळे लावले होते, ते 'याचा अर्थ काय समजायचा?' असं मधाळ पडलेल्या आवाजात विचारून मगच काढून घेतले, आणि ज्या मनमोकळेपणाने व उत्साहाने त्याने माझ्याशी ह्या प्रकरणाची सुरुवात केली होती, त्याच आविर्भावात तो पुढे म्हणाला की माझ्याबरोबर एक ग्लास वाईन प्यायला येशील का?

आता एक गोष्ट निर्विवाद आहे, की जर त्या क्षणी माझ्या रक्तात खळबळ कमी असती, न भागलेल्या वासना आणि न शमलेले कंड जर माझ्यावर सत्ता गाजवीत नसते, तर अनमान न करता मी त्याला सरळ नाही म्हटलं असतं; तेव्हा काय कारण हे मलाही नीट सांगता येणार नाही, पण माझ्यात अनावर झालेली उबळ, त्याचं दिसणं, तो प्रसंग, तुम्ही म्हणाल तर कदाचित हे सगळं एकवटून आल्याचा दाट प्रभाव; शिवाय त्याच्या सोबतीला, ह्या साहसाचं शेवटापर्यंत काय होतं ते पाहण्याची वाटू लागलेली उत्सुकता आणि रस्त्यावरच्या रांडेप्रमाणं वागवलं गेल्यामुळे वाटलेली नवलाई, अशा साऱ्यामुळे माझ्याकडून नि:शब्द संमती दिली गेली; थोडक्यात आता मी माझ्या बुद्धीचं काहीएक न ऐकता, हा लढवय्या जणू काही मला फरफटत घेऊन चालला असावा तशी निमूटपणे त्याच्या मागोमाग जात राहिले; मला लहानपणापासून ओळखतो आहे अशा आविर्भावात तो मला बगलेत मारून रस्त्यात जो पहिला सोयिस्कर दिसला त्या गुत्त्यात घेऊन गेला, आणि तिथे बोळकांडीतल्या एका बाजूच्या लहानशा खोलीत आम्हाला नेण्यात आलं.

इथे पोहोचताच, मागवलेली वाईन वेटरने आणेपर्यंत कशीबशी कळ काढून, तो थेट माझ्यावर कोसळला: माझ्या गळ्याभोवतीचा रुमाल ओढून काढीत मला एक चटकदार चुंबन देऊन त्याने माझे स्तन एकदम मोकळे केले; आणि अशा घायकुतीच्या प्रसंगी, ज्या षोडशोपचारांमुळे सुखानुभव कमी

आणि चेंगटपणाच जास्त झाला असता, त्या साऱ्यांना फाटा देऊन ते धारदार वासनेने हाताळले: आता मुख्य मुद्द्याकडे जाण्याची घाई झालेली असताना आमची सोय होईल असं तिथे काही दिसेना, कारण दोनतीन मोडक्या खुर्च्या आणि एक मुडदूस झालेलं टेबल एवढाच काय तो तिथला जामानिमा होता. जास्त अवडंबर न माजवता त्याने मला पाठ भिंतीला लावून उभं केलं, पेटिकोट वर नेला, आणि भाला बाहेर काढून माझ्या डोळ्यांसमोर पाजळताच त्याचा लखलखाट झाला; समुद्रावर बहुतेक दीर्घकाळ उपास घडल्यामुळे जो उतावीळ धसमुसळेपणा अंगी बळावला होता, त्याच्या प्रभावाखाली कामाला लागून, मला इंगा दाखवण्याची तो आता तयारी करू लागला.

मी पाय दोन्ही बाजूंना फाकवून पाहिले, अंगाचा पवित्रा बदलून पाहिला, थोडक्यात सांगायचं म्हणजे नीट शिरावं म्हणून सुचेल ते करून पाहिलं; त्याचा काही हिस्सा मी आत घेतलादेखील, पण अजूनही गोष्टी पूर्णपणे त्याच्या मनासारख्या झाल्या नव्हत्या: तेव्हा मारा करण्याची पद्धती लागलीच बदलून तो मला टेबलापाशी घेऊन गेला, एका सराईत हाताने त्याने माझं डोकं त्याच्या कडेवरून खाली नेलं, आणि दुसऱ्या हाताने माझा पेटिकोट व आतला सदरा वर उचलीत, माझे नागडे पार्श्वगोल त्याच्या चवताळलेल्या आंधळ्या म्होरक्यासमोर दाखल केले; रस्ता काढून तो दोहोंच्या मधोमध जोराने घुसला, आणि नेमून दिल्यानुसार आत न जाता, चुकीच्या दरवाज्यावर आकांताने ठोठावतो आहे असं मला स्पष्ट जाणवताच मी त्याला तसं सांगितलं, तेव्हा तो म्हणाला, "हॅं! अगं, वादळात कुठलंही बंदर सारखंच!" पण तरीही, आपली दिशा ताबडतोब बदलून, नेम खाली घेऊन तो त्याने अचूक लावला आणि मोठ्या खुमासदार टणटणीतपणे आत घुसवीत सगळा फेनकल्लोळ उडवून दिला; त्याने आता मला इतक्या जोषाने व हिरीरीने संगीन लावली, की त्याचा प्रस्ताव मान्य करण्याआधीच मी काठ्यावर आलेली असल्यामुळे, अशा हिंस्र त्वेषाने माझं शरीर आतून ढवळलं जाताच शर्यतीत त्याच्या पुढे पळत जाऊन वितळत्या बेहोशीत मी वाहवत गेले; आणि प्राणांतिक आचके देत असताना त्याला पीळ देऊन इतका भरभरून झरा बाहेर काढला की माझ्यातून पाझरलेल्या द्रवणाशी त्याचा संगम होताच तेथील अवयव जणू काही तरंगू लागले, आणि धगधगून पेटलेला माझ्या अभिलाषेचा आगडोंब या महापुरात बुडून गेला.

हे सारं संपताच आता परत कसं फिरायचं ह्याची मला काळजी पडली; कारण चिळकांड्या सोडीत त्याने माझ्यात ओतलेला हा गरम तोफखाना, आणि मला ही वाट चोखाळायला भाग पाडणाऱ्या विझायच्या राहिलेल्या ज्वाला मुळात ज्यांच्यामुळे पेटल्या ते उबग आणणारे पोरखेळ, या दोहोंतल्या फरकामुळे जरी मी निहायत खूष झालेली असले, तरीदेखील आता मी काहीशी थंडावताच, हा आगंतुक माणूस कितीही हवाहवासा वाटला तरी त्याच्याशी जवळीक करण्यात धोका असू शकतो हे

मला जाणवू लागलं; आणि तो मात्र, आपण संध्याकाळ एकत्र घालवू आणि एकमेकांची आणखी ओळख करून घेऊ असं जेव्हा म्हणू लागला, तेव्हा त्याचा सूर इतका ठामपणाचा होता की ह्या माणसाचा पिच्छा सोडवणं हे नुसत्या इच्छेने होण्याइतकं सोपं नसणार अशी मला धास्ती वाटू लागली. पण मला वाटणारी बेचैनी मध्यंतरीच्या काळात मी काळजीपूर्वक लपवली, त्याच्याबरोबर वेळ घालवायला माझी तयारी असल्याचं खोटं आश्वासन लागलीच दिलं; आणि त्याला म्हणाले की एक तातडीचा निरोप द्यायला मी पटकन घरी जाऊन लगेच परत येत्ये. ही सबब त्याने लागलीच गिळली, कारण त्याची समजूत अशी झाली होती की रस्त्यावर हिंडून धंदा शोधणाऱ्या आणि त्यांच्या दिशेने पाहण्याची मेहेरबानी जो टग्या पहिल्यांदा करील त्याची खातिरदारी करणाऱ्यांपैकी मी एक गरीब बिचारी मुलगी आहे; आणि अर्थात, जमेल तितका पैसा काढण्यासाठी परत न येऊन मी स्वत:चा मोबदला वाया कसा घालवीन? तेव्हा त्याने मला जाऊ दिलं, पण माझ्या ऐकण्यातच संध्याकाळच्या जेवणाची फर्माईश सोडली, आणि त्याला सोबत न करून त्याची निराशा करण्याचा असंस्कृतपणा मी केला.

पण जेव्हा मी घरी येऊन मिसेस कोलसमोर माझ्या साहसाचं वर्णन केलं, तेव्हा इतक्या मोकळेपणाने पाय फाकवून केलेल्या आततायीपणामुळे कोणकोणते धोके उद्भवू शकतात आणि विशेषकरून आरोग्याला काय अपाय होऊ शकतो हे तिने इतक्या तिखट शब्दांत मला सुनावलं, की असलं अविचारी धाडस पुन्हा न करण्याचा मी निर्णय घेतला; आणि तो इमाने इतबारे पाळला इतकंच नव्हे, तर त्यानंतर कित्येक दिवस, ह्या प्रसंगातून मिळालेल्या आनंदाव्यतिरिक्त तो लक्षात राहायला आणखी काही कारण उपटतं की काय याबद्दल मी सतत अस्वस्थ होते; पण तशी धास्ती बाळगल्यामुळे माझ्या ह्या खलाशीमित्रावर अन्याय झाला हे मला कबूल आहे, आणि या ओळी लिहून मी आता त्याची राजीखुषीने भरपाई करत्ये.

एव्हाना मी मिस्टर नॉर्बर्टबरोबर असल्याला जे तीनेक महिने होत आले होते, त्या कालावधीत मिसेस कोलच्या घरचे मनोरंजनाचे कार्यक्रम आणि ह्या गृहस्थाच्या रीतसर भेटीगाठी यांमध्ये विभागलेला माझा वेळ फार आनंदाने गेला; पराकोटीची सहनशीलता अंगी बाणवून त्याच्या विषयसुखाची प्रत्येक लहर मी निमूटपणे गोंजारीत राहिल्याबद्दल त्याने मला गडगंज पैसा दिला, आणि माझ्या ह्या वर्तणुकीने तो इतका प्रभावित झाला, की जे वैविध्य तो अनेक स्त्रियांमध्ये धुंडाळत होता, ते त्याने दिलेल्या निर्वाळ्याप्रमाणे केवळ माझ्यातच त्याला आढळल्यामुळे, उठवळपणा करीत नवे चेहरे शोधत हिंडण्याची त्याची चूष कमी होत चालली. पण निदान इतक्याच आनंदाची व याहीपेक्षा मला कौतुकास्पद गोष्ट अशी की माझ्याबद्दल त्याला जे प्रेम वाटू लागलं होतं त्यामुळे माझं म्हणणं तो ऐकू

लागला, आणि त्याचं आरोग्य सुधारण्याकरिता याचा फार उपयोग झाला: कारण अतिशय कळकळीने त्याची आर्जवे करून, स्वत:ची थोडीफार काळजी घेण्यासाठी, सुखे जास्त दिवस उपभोगता यावीत म्हणून त्यांचा वापर बेताने करण्यासाठी, आणि ज्या अतिरेकांना चटावल्यामुळे त्याच्या प्रकृतीचा विध्वंस झालेला होता व जगण्यात त्याला रस निर्माण करणाऱ्या कारणांवरच घाव पडला होता ते कह्यात आणण्यासाठी, अंशाअंशाने त्याला उद्युक्त केल्यानंतर तो आता अधिक सतेज, अधिक संयमी व हळूहळू अधिक निरोगी बनत चालला होता; आणि यामुळे माझ्याबद्दल त्याला वाटणाऱ्या कृतज्ञतेचा माझ्या सांपत्तिक स्थितीवर विधायक प्रभाव पडू लागला होता, पण त्याचवेळी त्याच्या लहरीपणाने हा पेला माझ्या ओठांपासून हिसकून घेऊन फोडून टाकला.

त्याची बहिण, लेडी एल– स्वत:च्या प्रकृतीकरिता लंडनहून बाथला जाण्याचा बेत करीत होती, आणि मिस्टर नॉर्बर्टला तिच्याबद्दल फार जिव्हाळा असल्यामुळे त्याने आपल्याबरोबर चलावं ही तिची इच्छा त्याला मोडता येईना; तेव्हा त्यानुसार, माझ्यापासून आठवडाभरापेक्षा जास्त वेळ दूर राहण्याचा जरी त्याचा बेत नसला, तरीसुद्धा जणू काही अशुभाची पूर्वसूचना मिळाल्याप्रमाणे अतिशय जड मनाने त्याने माझा निरोप घेतला; आणि त्याच्या तात्कालिक सांपत्तिक स्थितीला पेलवणार तर नाहीच, पण प्रवास जितक्या लहान मुदतीचा असणार होता त्याच्याशी फार विसंगत होईल, इतकी रक्कम मला दिली; परंतु हा प्रवास सर्वांत लांबचा व एकदाच जो केला जातो तशातला ठरला: कारण बाथमध्ये पोहोचल्यानंतर दोनेक दिवसांतच तो काही मद्यपी माणसांच्या बैठकीत अडकला, आणि परिणामी त्याला फणफणून ताप येऊन एकदाही शुद्धीवर न येता चार दिवसांत तो निवर्तला. जर मृत्युपत्र करून ठेवण्याइतकं त्याला भान आलं असतं, तर त्याने कदाचित माझ्यासाठी काही तरतूद केली असती. अशा प्रकारे मी त्याला गमावून बसले; पण दुसऱ्या कुणाहीपेक्षा वारांगनेच्या आयुष्याला अनपेक्षित कलाटण्या मिळत राहण्याची शक्यता जास्त असल्यामुळे माझी मूळची आनंदी मन:स्थिती काही दिवसांतच पुन्हा सांधली गेली, ठेवलेल्या बायकांच्या यादीतून माझं नाव वगळलेलं पाहण्याचा प्रसंग पुन्हा माझ्यावर आला, आणि ज्या आप्तांमधून एका अर्थी मला उचलून बाजूला काढण्यात आलेलं होतं, त्यांच्या मिठीत मी परत गेले.

मिसेस कोलने आपला स्नेह पूर्वीप्रमाणेच ठेवला, आणि दुसरी निवड करण्याकरिता सल्ला व मदतीचा हात देऊ केला; पण आता इकडेतिकडे सावकाशीने पाहता येईल इतकी मी वैभवात व आरामात होते, आणि जर सुख मिळवण्याकरिता नैसर्गिक क्षुधा हाक देऊ लागल्या, तर मिसेस कोलच्या घरी त्या किती सहज भागतील याची मला जाणीव असल्यामुळे त्यांची तीव्रता आणि अरेरावी खूपच कमी झालेली होती. लुईसा व एमिली तिथे अजूनही जुन्याच रस्त्यावरून चालत होत्या, आणि माझी फार

लाडकी मैत्रिण हॅरिअट मला अनेकदा भेटायला येत असे; तिच्या लाडक्या बॅरोनेटबरोबर अतिशय आनंदात ती जे दिवस घालवीत होती त्यांखेरीज तिच्या मनात दुसरा विषय नव्हता, आणि त्याने जरी तिला ठेवलेली असली तरीदेखील त्याच्यावर ती कमालीच्या एकनिष्ठतेने व हळवेपणाने प्रेम करीत असे; पण इतकंच नव्हे, तर ती आणि तिचे नातेवाईक यांच्यासाठी सढळ हाताने तरतूद करून, ती स्वतंत्रपणे राहू शकेल अशी व्यवस्था त्याने पाहिलेली होती.

एकूण पाहता त्या वेळेस माझ्या व्यवसायामध्ये माझ्या शरीराला नियमित काम असं नव्हतं; आणि मिसेस कोलशी जो माझा सततचा संपर्क चालू होता, त्यादरम्यान ती एकदा मला म्हणाली की माझ्या घरी येणंजाणं असणारा मिस्टर बारव्हील नावाचा एक आश्रयदाता नुकताच लंडनमध्ये आलेला आहे, व त्याला सोबतीण कशी आणून द्यावी अशा मोठ्या विवंचनेत मी आहे; एका क्रूर अशा प्राकृतिक रुचीच्या गुलामीखाली तो सापडलेला असल्यामुळे ह्या मुद्द्यावरून खरोखरीच अडचण होती: कारण त्याच्या अंगी, दयामाया न दाखवता स्वत:ला झोडपून घेण्याची, पण इतकंच नव्हे तर इतरांनाही झोडपण्याची मोठी प्रबळ वासना होती; आणि त्याची ही लहर सांभाळण्याइतकी धमक व सहनशक्ती ज्यांच्यापाशी असेल त्यांना तो वारेमाप पैसे जरी देत असला, तरीसुद्धा सोबतिणींची निवड करण्यात तो चोखंदळ असल्यामुळे, इतक्या भयंकर खेळामध्ये स्वत:च्या त्वचेची किंमत देऊन त्याच्याबरोबर आळीपाळीने राज्य घ्यायला कबूल होणाऱ्या फारच थोड्या होत्या. पण या जगावेगळ्या अभिरुचीच्या चमत्कारिकपणात भर टाकणारी गोष्ट म्हणजे हा गृहस्थ तारुण्यात होता; याउलट सहसा असं आढळतं की अशी भावना ज्यांना होते त्यांचं वय झालेलं असतं, आणि शरीरातील मेंघळटलेले रस अधिक चपळाईने वाहू लागावेत, व सुरकुतून मरगळलेल्या अवयवांकडे सुखवेदना नीट पोहोचाव्यात यासाठी त्यांना अशा प्रयोगाचा अवलंब करण्याची निकड भासते; त्यामागचं कारण असं की ह्या अवयवांत जिवंतपणा यावा म्हणून त्यांच्या विरुद्ध बाजूस असलेल्यांना शिक्षा करून तिथे झणझण निर्माण करण्याची गरज पडावी, असं काहीतरी अचंबा वाटायला लावणारं संगनमत या दोहोंमध्ये असतं.

हा प्रकार मिसेस कोलने माझ्या कानी घालण्यामागे, मी स्वत: त्याचा पत्कर घ्यावा अशी तिची अपेक्षा असणं अर्थात शक्य नव्हतं: कारण तशी मी बऱ्यापैकी सुबत्तेत असल्यामुळे अशा प्रकारचं काम स्वीकारायला मला तयार करण्यासाठी खरोखरीच फार मोठ्या रकमेचं आमिष दाखवावं लागलं असतं; आणि ज्यांना स्वत:ला इतक्या अणकुचीदार पराणीची गरज नसते, त्यांच्यासाठी जिच्यामध्ये सुखापेक्षा वेदनाच जास्त आहेत अशा ह्या लहरीबद्दल अधिक जाणून घेण्याची थोडीदेखील उत्सुकता मी कधी बोलून दाखवली नव्हती, किंवा मला वाटली देखील नव्हती: तेव्हा मग ज्या कामी त्रास

होणार हे मला आधी ठाऊक होतं, ते जाणूनबुजून अंगावर घेण्यासाठी मी का उद्युक्त व्हावं? प्रांजळपणे सांगायचं तर अचानक तसा डोक्यात किडा आला, स्वत:वर नवीन प्रयोग करून पाहण्याची उबळ आली, शिवाय माझ्या अंगचं धैर्य केवढं आहे ते मिसेस कोलला पटवून द्यावं असा अहंभाव देखील यात मिसळलेला होताच; आणि ह्या साऱ्याचा एकत्रित परिणाम म्हणून, काय होईल ते होवो अशा वृत्तीने स्वत:ला पुढे करण्याचा आणि तिचं शोधाशोधीचं काम वाचवण्याचा माझा निर्णय झाला. तेव्हा मी अशा रीतीने माझं शरीर तिला व तिच्या मित्राला यादृच्छिक वापराकरिता काहीही राखून न ठेवता खुलेपणाने देऊ करताच तिला आश्चर्य वाटलं व ती खूषही झाली. अर्थात तरीदेखील माझी गुरुमाता तशी प्रेमळ असल्यामुळे मला परावृत्त करण्याकरिता तिला जे जे युक्तिवाद सुचले ते ते तिने खर्ची घातले: पण त्यांच्यामागे केवळ माझ्याबद्दल वाटणारी कणवच आहे असं लक्षात येताच मी माझा हेका चालूच ठेवला; आणि त्यायोगे, मी हा प्रस्ताव निखळ प्रामाणिकपणे नव्हे तर निव्वळ कौतुक उकळण्यासाठी पुढे केलेला आहे अशी शंका घ्यायला वाव दिला नाही.

मिसेस कोलने आता तो कृतज्ञतेने स्वीकारला आणि ती म्हणाली, की ह्या प्रकारात तुला वेदना होणार आहेत हा भाग सोडला तर त्यात तुला सहभागी करून घेण्याविषयी माझ्या मनात काही किंतू नाही; यातून तुला भरपूर पैसे मिळतील हे निश्चित, आणि सारं काही गुप्तपणे होणार असल्यामुळे अडाणी लोकांची हेटाळणीही ऐकावी लागणार नाही; माझं स्वत:चं मत असं की सुख, मग ते कुठल्याही प्रकारचं असो, हे सर्वांसाठी सामायिक बंदर आहे, आणि त्या दिशेने वाहणारा कुठलाही वारा हा इतर कुणाला त्रास देत नाही तोपर्यंत अनुकूलच समजावा; काही कमनशिबी लोकांची गत अशी असते, की ज्यांच्यामागची कारणमीमांसा देता येत नाही अशा काही अनवट अभिरुचींच्या प्रभावाखाली ते असून त्यांचं आधिपत्य झुगारून देणं त्यांना शक्य नसतं; अशांना मी दोष तर देणार नाहीच पण उलट मला त्यांच्याबद्दल सहानुभूती वाटते: मानवजातीत खाण्यापिण्याच्या बाबतीत जितकी रुचिभिन्नता असते आणि जितके स्वभावधर्म असतात, तितक्यात याही बाबतीतल्या आवडीनिवडी वैविध्यपूर्ण आणि अतर्क्य असतात; आता तुझ्या असं लक्षात आलं असेल की काही नखरेल खवय्यांना साध्या चवीच्या मटणाचा तिटकारा असतो, आणि मसाल्यांची रेलचेल असलेल्या, सतराशेसाठ जिन्नस टाकलेल्या अवडंबरी पाककृतीच तेवढ्या त्यांच्या जिभेला बऱ्या लागतात; तर उलट असल्या प्रकारांकडे हेटाळणीने पाहण्यातच काहीजणांना आपली रसिकता सिद्ध झाल्यासारखी वाटते.

ह्या प्रोत्साहनपर व समर्थनपर चर्पटपंजरीची मला आता गरज राहिलेली नव्हती: माझा शब्द गेला होता आणि दिलेलं वचन पुरं करण्याचा निर्धार झालेला होता. त्याप्रमाणे रात्र मुक्रर करण्यात आली, आणि कसं वागायचं व काय करायचं याविषयी जरूरीच्या त्या सगळ्या सूचना मला देण्यात आल्या.

डायनिंग रूममध्ये दिवे लावून सर्व व्यवस्था करण्यात आली, आणि तिथे हा तरुण मी आत येण्याची व त्याच्याशी माझी ओळख करून दिली जाण्याची वाट पाहात बसून राहिला.

मिसेस कोल मला त्याच्यासमोर आत घेऊन गेली; तेव्हा ज्या प्रयोगातून मी जाणार होते त्याकरिता तिच्या सूचनेनुसार मुद्दाम शिवलेला एक उत्तम सुती कापडाचा ढगळसा तोकडा झगा मला घालण्यात आला होता, आणि त्याच्याच जोडीला गाऊन, पेटिकोट, पायमोजे व सॅटिनच्या स्लिपर्स असा पूर्ण पांढराशुभ्र युनिफॉर्म चढवला असल्यामुळे, बळी देण्यासाठी नेल्या जाणाऱ्या कुमारिकेसारखी मी दिसत होते: कुरळे होऊन मानेवर पडलेले माझे दाट किरमिजी रंगाचे केस, आणि माझा हा पेहराव, या दोहोंमध्ये डोळ्यांना सुखावणारा रंगविरोध उत्पन्न झाला होता.

मला पाहताच मिस्टर बारव्हील उठून उभा राहिला, आणि त्याला आनंद व आश्चर्य वाटल्याचं चेहऱ्यावर स्पष्ट दिसून आलं; मला नमस्कार करून मिसेस कोलला तो म्हणाला, की जे खडतर क्लेश व कष्ट सोसावे लागणं हा या मुलाखतीचा प्रमुख विषय आहे, त्यांच्यासाठी इतकी देखणी व नाजूक मुलगी आपण होऊन तयार व्हावी हे मला खरं वाटत नाही. तिने त्याला समर्पक उत्तर दिलं, आणि आता आम्हाला एकटं सोडाल तर बरं असा काकुळतीचा भाव त्याच्या डोळ्यांत वाचून, मुलगी कोवळी आणि नवशिकी आहे तेव्हा जपून वागा, असं सांगून ती बाहेर निघून गेली. पण त्याचं सारं लक्ष जेव्हा मिसेस कोलकडे होतं; तेव्हा माझं मात्र, शाळकरी मुलांच्यात जशी विद्या छडी मारून बसवावी लागते, तसं काही अगम्य कारणाने ज्याच्यात सुख छडी मारून बसवावं लागतं, अशा ह्या दुर्दैवी तरुणाकडे लागलेलं होतं.

वर्णाने तो पांढराशुभ्र गोरा व नितळ होता, आणि वयाने जास्तीतजास्त वीसपर्यंत असावा असं जरी त्याच्या दिसण्यावरून वाटत असलं, तरी माझ्या अंदाजापेक्षा तीनेक वर्षांनी मोठा निघाला; पण त्याला धार्जिणी ठरणारी ही गल्लत, त्याच्या बुटक्या व बसक्या अंगकाठीत सर्वत्र शिरलेल्या स्थूलपणामुळे होत असे; चेहरा गुबगुबीत, गोल, आणि ताजातवाना असल्यामुळे बॅक्कस ह्या रोमन देवासारखा तो हुबेहूब दिसू शकला असता, पण एकूण तोंडवळ्याला बिलकुल न शोभणारा नुसता निर्विकारच नव्हे तर काहीसा निष्ठुरतेचा भाव त्याच्या चेहऱ्यावर उमटलेला असल्यामुळे, हे साम्य पूर्ण करण्यासाठी जो हसरा मुखडा असावा लागतो तो मात्र अजिबात बेपत्ता झालेला होता. त्याचे कपडे अतिशय नीटनेटके जरी असले, तरीसुद्धा त्याच्याकडील वारेमाप संपत्तीच्या मानाने फार साधे होते; पण यामागचं कारण देखील कंजूषपणा हे नसून त्याची तशी विवक्षित आवड हेच होतं. मिसेस कोल खोलीबाहेर जाताच त्याने मला शेजारी बसवलं, आणि निमिषार्धात जेव्हा त्याच्या चर्येवर

माझ्याकरिता अतिशय गोड व लाघवी भाव उमटले, तेव्हा विरुद्ध टोकापासून इथपर्यंत हा झपाट्याने झालेला बदल पाहून मला विशेषच आश्चर्य वाटलं; पण नंतर जेव्हा मला त्याच्या स्वभावाची अधिक माहिती झाली तेव्हा यामागचं कारण कळलं ते असं, की सुख घ्यावंसं वाटलं तर वेदनेच्या हातून ते घेण्याचा विक्षिप्त मार्ग चोखाळल्याखेरीज ते मिळूच नये अशी अगतिक अवस्था त्याच्या शारीरिक प्रवृत्तीने त्याच्यावर लादलेली होती, आणि असल्या विचित्र अभिरुचीचं दास्यत्व नशिबी आल्यामुळे स्वत:बद्दल घृणा वाटणं व मनाची सतत दुभंगलेली अवस्था असणं हा त्याचा स्थायीभावच झाला होता; परंतु तरीदेखील, सदोदित पश्चात्ताप करीत राहणाऱ्या त्याच्या विवेकबुद्धीमुळे, नाराजीचा व खडूसपणाचा जो एक रंग त्याच्या बाह्यरूपावर कायमचा फासटला गेलेला होता, तो वास्तविक त्याच्या स्वभावातल्या नैसर्गिक गोडव्याशी पूर्णपणे विसंगत होता.

माझी क्षमा मागून, आणि काम उत्साहाने व नेटाने करण्यासाठी मला प्रोत्साहन देऊन त्याने पूर्वतयारी तरी चांगली केली; आता तो शेकोटीपाशी उभा राहिला, आणि तिथे जवळच असलेल्या एका कपाटातून मी शिक्षा करण्याची साधने बाहेर काढली: बर्चच्या झाडाच्या प्रत्येकी दोनतीन मजबूत फांद्या एकत्र बांधून केलेल्या अशा त्या कित्येक मोळ्या होत्या, आणि ह्या चीजा हातात घेऊन खेळवीत न्याहाळून पाहताना त्याला जितका आनंद झाला, तितकीच माझ्या मनात बाकबूक झाली. यानंतर खोलीत एका बाजूला असलेला रुंद बाक आम्ही समोर आणला; आडवं पडून असताना बोचू नये यासाठी त्यावर कालिकतच्या सुती कापडाचा अभ्रा असलेली मऊ उशी टाकलेली होती; आवश्यक तो जामानिमा आता पुरा झाल्यामुळे त्याने त्याचा कोट व आतलं जाकिट उतरवलं; खूण करून तसं सुचवताच मी त्याच्या पाटलोणीची बटणं काढली, आणि सदरा कमरेच्या बराच वरपर्यंत गुंडाळून तिथे व्यवस्थित खोचून ठेवला: इतकं झाल्यानंतर, ज्या तऱ्हेवाईक राजेंद्रियाकरिता ही सगळी तजवीज चाललेली होती, तिकडे साहजिकच माझी दृष्टी जाताच, गवतातून टिटवीने डोकं वर काढावं तसा तो तिथे उगवलेल्या गोल गोल केसांतून कसंबसं टोक काढून त्याच्या शरीरात आक्रसून, दडून बसलेला मला दिसला.

आपल्या पायमोज्यांच्या गाठी सोडवण्यासाठी मग तो खाली वाकला, आणि मी त्याला बाकाच्या पायांना बांधून टाकावं म्हणून त्याने ते माझ्याकडे सुपूर्द केले; ह्या एकूण प्रकाराच्या चक्रमपणाला शोभून दिसेल असा तो एक त्यातला भाग होता, यापलीकडे असं करण्याची काही खास गरज माझ्या मते नव्हती; कारण बाकीचा सोहळा जसा त्यानेच स्वत:साठी नेमून घेतलेला होता, तसाच हाही होता. मी त्याला बाकाकडे नेला, आणि मला आधीच पढवल्याप्रमाणे त्याला सक्तीने आडवं व्हायला

लावते आहे असा अभिनय केला: आडमुठेपणा केल्याचा उपचारापुरता जुजबी आव आणून झाल्यानंतर, चेहऱ्याखाली एक उशी घेऊन तो निमूटपणे सरळसोट पोटावर आडवा झाला; आणि मग असा निपचित पडलेला असताना मी त्याचे हातपाय बाकाच्या पायांना सैलसर बांधले; सदरा अजून पाठीवर खोचलेला आहे अशा अवस्थेत पाटलोण त्याच्या गुडघ्यांपर्यंत खाली खेचताच, दोन लठ्ठ मांसल मांड्यांमधून, गुबगुबीत व गुळगुळीत पांढऱ्या गोलांची एक जोडी उशांसारखी वर आल्याचा रमणीय व विशाल देखावा दिसू लागला; आणि त्यांच्यामधली चीर किंवा फारकत जिथे संपत होती, तिथला पाठीच्या खालच्या भागावरचा मोठा व्रण, जणू काही माझ्या प्रहाराला भेटण्यासाठी म्हणून तरारून मोठा झाला.

आता मी एक मोळी हातात धरून त्याच्यावर ओणवी उभी राहिले; आणि त्याने सूचना देताच, माझ्या सदिच्छा पणाला लावून, मनातलं सगळं धाडस व खांद्यातली सगळी ताकद एकवटून, मध्ये न थांबता त्याला दहा फटके मारले; तसे ते मांसल गोल पुन्हापुन्हा थरथरले, पण खेकड्याला पिसू चावल्यानंतर जितपत गैरसोय किंवा उपद्रव होईल, तितपतच त्याला झाल्याचं दिसलं. मध्यंतरीच्या काळात या फटक्यांचे काय परिणाम होताहेत, हे मी डोळ्यांत जीव ओतून पाहिलं आणि निदान मला तरी ते फार क्रूर वाटले; प्रत्येक फटक्यामुळे त्या पांढऱ्या डोंगरकड्यांचा पृष्ठभाग खरवडला जाऊन गडद लालभडक झाला होता, व माझ्यापासून दूर असलेल्या बाजूला जी खळी होती तिच्यात कोरल्या गेलेल्या जांभळट वळांमधून एकतर रक्त पाझरत होतं किंवा त्याचे टपोरे थेंब उभे राहिलेले होते; काही ठिकाणच्या कापलेल्या जखमांमधून, त्वचेत घुसून बसलेली त्या दांडक्यातली कुसळंदेखील मी वेचून बाहेर काढली. त्याच्या त्वचेचा संपूर्ण पृष्ठभाग, आतमध्ये दाटलेल्या घट्ट आणि टणटणीत मांसावर असा गुळगुळीत ताणून बसवलेला होता, की त्यात कुठे सैलावलेपणा नसल्यामुळे किंवा मार बसल्यानंतर त्यातला जोर शोषून घ्यायला वाव नसल्यामुळे तो थेट खोलवर कापत जात असे; त्याशिवाय ढलप्या किती हिरव्याकंच होत्या आणि मी किती जोरात मारलं होतं याचा विचार करता ही इतकी राडेराड व्हावी यात अनपेक्षित असं काहीच नव्हतं.

हे केविलवाणं दृश्य पाहून मला आत्ताच इतकं गलबलून आलं की असल्या फंदात पडल्याचा मनापासून पश्चात्ताप होऊ लागला होता, आणि ह्या माणसाने पुरेसं सहन केलेलं आहे असं वाटून मी आनंदाने हा प्रकार थांबवला असता; पण मला प्रोत्साहन देत, काम असंच पुढे चालू ठेवण्याची त्याने कळवळून विनवणी केली; तसे मी त्याला आणखी दहा फटके दिले, आणि थोडा दम खाऊन, हा रक्तलांछित देखावा कितपत पसरलेला आहे याची पाहणी केली. आणि अशा तऱ्हेने, दु:ख सहन करतानाचा त्याचा धीरोदात्तपणा पाहून या दृश्याविषयी माझं मन हळूहळू मुर्दाड बनत चाललं; मध्येमध्ये थांबत जसं मी

हे शासनपर्व पुढे चालू ठेवलं, तसा तो स्वत:चं शरीर घुसळताना आणि त्याला पीळ देताना दिसला, तेव्हा यामागे क्लेश नसून दुसरीच काही नवी आणि शक्तिशाली संवेदना असल्याचं मला स्पष्ट कळून चुकलं. याचा अर्थ काय असावा हे शोधून काढण्याची उत्सुकता वाटून, अशाच एका मध्यंतरात, तो अजूनही खालच्या उशीवर पोट घुसळत असताना मी त्याच्याजवळ आले; आणि माझ्या नजिक असलेल्या मांसमेरूची अजून जखम न झालेली बाजू कुरवाळून, मग त्याच्या मांडीखाली अलगद हात सरकवून, तिथे काय परिस्थिती आहे याची चाचपणी केली; तेव्हा आश्चर्य असं की त्याचं इंद्रिय जे मला प्रथमदर्शनी अगदीच क्षुल्लक किंवा निदान फार छोटेखानी वाटलं होतं, ते आता त्याच्या मागच्या भागातल्या त्वचेवर झालेल्या रणकंदनामुळे व भगभगीमुळे अगदी टणटणीत ताठ झालं होतं इतकंच नव्हे, तर मलासुद्धा भीती वाटेल इतकं विस्ताराने वाढलेलं होतं: 'परंतु यासम हा' असा जाडजूडपणा त्याने धारण केलेला होता, आणि त्याचं नुसतं डोकंदेखील माझ्या मुठीत मावता मावत नव्हतं.

ह्या विचित्र आनंदाच्या तिरीमिरीत असताना धापा टाकीत जसजसा मिस्टर बारव्हील इतस्तत: वळवळ करू लागला, तसतसं ते डोळ्यांसमोर येऊ लागलं; त्याला पाहून वासराच्या पांढऱ्याशुभ्र मांसाच्या गोलसर भरीव तुकड्याची आठवण होत होती, आणि मालकाप्रमाणेच ते रुंदीच्या मानाने लांबीला आखूड व बसकट होतं; पण माझा हात तिथे जाणवताच तो काकुळतीने म्हणाला की फटके द्यायचं काम जोरात चालू ठेव, कारण नाहीतर मला विषयसुखाच्या शेवटच्या टप्प्यापर्यंत कधीच पोहोचता येणार नाही.

मी दांडक्याचा वापर पुन्हा चालू केला; अशा तीन मोळ्या झिजवून निकालात काढल्यानंतर आता त्याची धडपड व झटापट अधिक वेगाने होऊ लागली, आणि मग मात्र एकदोन खोल सुस्कारे सोडून तो निश्चल पडून राहिला; त्याने मला थांबायला सांगताच तत्क्षणी मी थांबले, आणि बांधलेला होता तो मोकळा करताना त्याच्या पार्श्वभागावरची मूळची गुळगुळीत, गोरी, तुकतुकीत त्वचा आता कत्तल होऊन छिन्नविच्छिन्न झालेली पाहताच, त्याच्या ढिम्म सोशिकपणाबद्दल मला कमालीचा अचंबा वाटल्याखेरीज राहिला नाही: गोलार्धांच्या एका बाजूला निळंजांभळं पडलेलं मांस, वळ, कापलेल्या जखमा आणि सांडलेलं रक्त यांचं गिचमिड कोरीव कामच तयार झालं होतं; इतकं की उठून उभं राहिल्यानंतर त्याला धड चालतासुद्धा येत नव्हतं, जणू तो काटेरी झुडपात अडकला असावा. उशीकडे पाहताच मला सढळपणे वीर्यपतन झाल्याच्या स्पष्ट खुणा दिसल्या, आणि आता डोकं वर काढायला लाज वाटत असावी अशा आविर्भावात त्याचा आळशी मेंग्या स्वत:च्या जुन्या घरट्यात परत जाऊन गुरफटून बसलेला होता; त्याच्या समोरच्या घरात राहणाऱ्या शेजाऱ्यांना छड्या मारल्याखेरीज तो

उभा राहात नाही अशी एकूण चिन्हे दिसत होती, आणि अशा रीतीने त्याच्या लहरीखातर त्यांना मात्र सदोदित त्रास सोसावा लागत असे.



# भाग नववा

माझ्या रावबहादुराने आता कपडे चढविले होते, आणि त्याच्या मनातला क्षोभ निवळू लागला होता; यानंतर मला एक चुंबन देऊन व स्वत:जवळ बसवून घेऊन, थोडंदेखील वजन जिला पेलवलं नसतं इतकी भगभगणारी त्याची एक बाजू उशीबाहेर येईल, अशा बेताने तो शक्य तितक्या धिमेपणाने खाली टेकला. आपल्याला अतिशय सुख मिळवून दिल्याबद्दल त्याने माझे आभार मानले, पण त्याला वेदना व्हायला मी कारणीभूत झाले असल्याचा सूड माझ्या त्वचेवर तो घेईल की काय, अशी दरदरून भीती वाटत असल्याच्या थोड्याफार खुणा माझ्या चर्येवर बहुधा त्याला दिसल्या असाव्यात; तेव्हा त्याने मला असं आश्वासन दिलं, की मी तुझ्या हातून जे सहन केलं तेच तू माझ्या हातून करायला हवंस अशा काही कराराला तू स्वत:ला बांधील समजत असशील, तर त्यातून मी तुला मोकळं करायला तयार आहे; पण जर तुझ्या संमतीने हा प्रकार पुढे चालू राहू द्यायचा असेल, तर स्त्री जास्त नाजुक असते आणि वेदना सहन करण्याची तिची क्षमता कमी असते, हा फरक मी ध्यानात ठेवीन.

या बोलण्यामुळे मला धीर आला, आणि माझा ताठा डिवचला जाऊन (त्यातसुद्धा मिसेस कोल तिच्या मचाणावरून हे सगळं प्रकरण चोरून बघते आहे हे मला पक्कं ठाऊक असल्यामुळे) कसोटीचा क्षण इतका निकट असताना आपण कचरता कामा नये असं माझ्या मनाने घेतलं; आणि हा गृहस्थ कदाचित माझ्या अंगच्या खंबीरपणाचं प्रदर्शन करण्याची संधी मला देणार नाही, याची माझ्या त्वचेपेक्षा मला जास्त काळजी वाटू लागली. ह्या मनस्थितीशी सुसंगत असंच उत्तर मी त्याला दिलं; पण अजूनही माझं धाडस माझ्या काळजापेक्षा मेंदूतच जास्त होतं, आणि भेदरट माणूस एखाद्या संकटाला घाबरलं तर मनातल्या भीतीचा लवकर निचरा व्हावा म्हणून त्यात उतावळेपणाने उडी घेतं, त्याचप्रमाणे हा प्रकार लवकर आटपण्याची लगबग त्याने सुरू केल्याचं पाहून मला फार हायसं वाटलं.

त्याला करण्यासारखं फारसं नव्हतंच; तेव्हा त्याने माझ्या पेटिकोटाच्या नाड्या सोडून तो आतल्या काष्टीसह बेंबीपर्यंत वर सरकवून तिथे सैलसर खोचून ठेवला, जेणेकरून नंतर वाटल्यास आणखी वर सरकवता येईल. यानंतर सर्व बाजूंनी गोल प्रदक्षिणा घालून मला न्याहाळून पाहताच तो फार खूष झाला; आणि आता मला त्याने पालथी पाडून बाकावर लावताच, मी त्याचे हात बांधले होते तसे तो माझे बांधणार असं वाटून ते मी किंचित घाबरत व थोडेसे थरथरत पुढे धरताच तो मला म्हणाला, की अशा प्रकारे विनाकारण जखडून ठेवून मी तुला मुळीच घाबरवणार नाही; तुझ्या सोशिकपणाची

मी चाचणी जरी घेणार असलो, तरीदेखील ती द्यायची की नाही हे पूर्णपणे तुझ्या इच्छेवर अवलंबून आहे; आणि म्हणूनच, वेदना जर सहन होईनाशा झाल्या तर केव्हाही उठून बसण्याचं तुला पुरेपूर स्वातंत्र्य आहे. मला असं मोकळं सोडल्यामुळे किती बांधल्यासारखं झालं याची तुम्हाला कल्पना यायची नाही; माझ्यावर दाखवलेल्या ह्या विश्वासातून मला इतका हुरूप आला, की त्याचा मान राखण्याकरिता माझ्या शरीराला कितीही हाल सहन करावे लागले तरी त्याची मला बिलकुल पर्वा राहिली नाही.

माझी मागची बाजू आता खालून अर्धी विवस्त्र होती, आणि तिथले यच्चयावत अवयव पूर्णपणे त्याच्या दयेवर विसंबून होते: सुरवातीला सोयिस्कर अंतरावर उभं राहून, मी ज्या पवित्र्यात आडवी पडले होते व परिणामी ज्या ज्या गुप्त सामग्रीचं त्याच्याकरिता राजरोस प्रदर्शन करीत होते, तो सारा देखावा त्याने मोठ्या मिजाशीने मिटक्या मारीत न्याहाळला. मग तो उतावीळ होऊन उडी मारून माझ्यापाशी आला, आणि त्याने ह्या सगळ्या नग्नावयवांच्या लडिवाळपणे पाप्याच पाप्या घेतल्या; आता एक मोळी उचलून घेऊन माझ्या मागच्या थरथरणाऱ्या मांसल भागांवर हलकेच ती थापटीतथोपटीत मला फारसं न दुखवता तो चाळा करू लागला; आणि यानंतर अंशाअंशाने तो जास्त जास्त जोरात मारीत राहात झिणझिण्या काढू लागताच, त्यांच्यात लाल रंग जागा होत असल्याचं मला समजलं ते एकतर तिथे जाणवणाऱ्या तिखट भगभगीमुळे, आणि त्याशिवाय माझ्या दुसऱ्या गालांतल्या गुलाबांची ते नक्कल करताहेत असं त्यानेच मला सांगितल्यामुळे.

त्यांच्याशी खेळून व त्यांचं कोडकौतुक करून स्वत:ची रिझवणूक करून घेतल्यानंतर तो अधिकाधिक ताकदीने वार करू लागला; आणि आता त्याने जोर इतका वाढवला, की मी मोठ्याने ओरडू नये किंवा तक्रारसुद्धा करू नये याकरिता मला अंगातली सारी सहनशक्ती एकवटावी लागली. शेवटी त्याने असा रपकन रट्टा ओढला, की तिथल्या दोनचार वळांमधून एकाच वेळी रक्त बाहेर आलं: ते पाहताच हातातली मोळी फेकून देऊन तो लगबगीने माझ्यावर पडला, तिथे जमा होऊ पाहणारे थेंब त्याने ओठाने टिपून घेतले, आणि जखमा चोखून माझ्या वेदना पुष्कळच कमी केल्या. पण मला आता त्याने टेकलेल्या गुडघ्यांवर शरीर उचलायला लावून ते एकमेकांपासून लांब फाकवलेल्या अवस्थेत ओणवी करताच, ज्या माझ्या नाजुक अवयवामध्ये सहसा वेदनेचा नव्हे तर सुखाचा संसार चालत असे, त्यावर आपल्या वाट्याचं दु:ख सोसण्याची पाळी आली: कारण त्या दिशेने आशाळभूतपणे पाहात त्याने मोळी अशी चालवली की काटक्यांची अणकुचीदार टोकं तिथे आपटू लागली; यामुळे उद्भवणाऱ्या संवेदना अशा तीक्ष्ण होत्या, की नकळत मी अंग आक्रसून घेऊन माझे हातपाय अद्वातद्वा हलवू लागले,

आणि ह्या वेड्यावाकड्या अळंग्याविळंग्यांमुळे साहजिकच माझं शरीर वेगवेगळ्या पवित्र्यांत व दृष्टिकोनांत रचलं जाऊन त्याच्या डोळ्यांना मिष्टान्नांची मेजवानी मिळू लागली. पण तरीही मी न किंचाळता सारं सोसत राहिले: आणि मग मला पुन्हा थोडासा विराम देऊन, ज्या भागातल्या ओठांवर व भोवतालच्या परिसरावर ह्या क्रौर्याचा प्रयोग झाला होता तिकडे त्याने झडप घातली, आणि परतफेड म्हणून स्वत:चे ओठ तिथे डकवले; त्यांची उघडझाप करून त्याने ते कुस्करले, आणि तिथे उगवलेलं लव्हाळं अलगद हातांच्या चिमटीत पकडलं; हे सारं तो इतक्या रानटी बेहोशीने व उन्मादाने करीत होता, की त्याचा आनंद बांध फोडून वाहून चालल्याचं स्पष्ट होत होतं; पण यानंतर मात्र, माझ्या सोशिकपणामुळे त्याला स्फुरण चढून, आणि सुख घेण्याच्या त्या जगावेगळ्या उर्मीने चेकाळून जाऊन, तिच्या अनावरपणाबद्दल माझ्या गरीब बिचाऱ्या नितंबांना त्याने पुन्हा एकदा मोळी हातात घेऊन शिक्षा केली; त्यांच्यावर आता कसलीही दया न दाखवता ह्या हरामखोराने मला असं कापलं की मी बेशुद्ध पडण्याच्याच दारात होते, तेव्हा कुठे तो थांबला. आणि तरीदेखील मी एकदाही कण्हले नाही की संतापून उलटून बोलले नाही; पण मनोमन मात्र मी असा अतिशय गंभीर निश्चय केला की असलं खडतर दिव्य पुन्हा करायचं नाही.

माझ्या मुलायम मांसल उशांची काय पाहण्यासारखी दशा झाली असेल याचा तुम्हीच अंदाज करा: तिथे सगळं काही दुखरं, भगभगतं आणि पिसाळून ओचकारल्यासारखं झालं होतं; ह्या सगळ्यातून मला काही सुख होणं दूरच राहो, पण वेदना ताज्या असल्यामुळे उलट मी काहीशी हिरमुसलेच; आणि माझ्या हालअपेष्टांना कारणीभूत झालेल्याने मला नंतर ज्या मिठ्या मारल्या व शाबासक्या दिल्या, त्या स्वीकारताना मी तितकीशी खूष दिसत नव्हते.

आता मी लाजेकाजेपुरते अंगावर कपडे अडकवले; तेव्हा ही घटका साधून, आयुष्यभर मन मारून जगलेल्या कॅथोलिक धर्माधिकाऱ्याचीही जीभ चाळवतील असे काही खाद्यपदार्थ, आणि त्यांच्या जोडीला चोखंदळपणे निवडलेल्या उत्तमोत्तम वाईन्स, इतका सरंजाम गुप्ततेविषयी मोठ्या धोरणी असणाऱ्या मिसेस कोलने स्वत:च आत आणला: आम्हा दोघांसाठी हे क्षण खाजगी आहेत आणि तिथे तिसऱ्याचं अस्तित्व मान्य करायला आम्ही अजून तयार नाही हे ओळखून, एका शब्दाने किंवा स्मितहास्यानेसुद्धा किंचितही व्यत्यय न आणता किंवा ओशाळं वाटायला न लावता, हे सारं आमच्यासमोर मांडून ती पुन्हा बाहेर निघून गेली.

मी टेबलापाशी बसले, तेव्हा माझ्या या कसायाबद्दल मला अजूनही विशेष जिव्हाळा वाटत नव्हता;

एकतर त्याच्याविषयी असं मत होण्याला माझा इलाज नव्हता, आणि दुसरं असं की प्रफुल्लित झालेला त्याचा आत्मसंतुष्ट चेहरा मला खिजवतो आहे असं वाटून मी बऱ्यापैकी चिडलेली होते. पण आता फार गरजेचा भासू लागलेला वाईनचा एक प्याला आणि चार घास पोटात गेल्यानंतर (हे सारं प्रगाढ शांततेत चाललं होतं), जेव्हा मला थोडी तरतरी येऊन बरं वाटू लागलं आणि भगभग तितकी जाणवेनाशी होताच माझी मूळची आनंदी मनोवृत्ती परत आली, तेव्हा माझ्यातला हा बदल त्याच्या नजरेतून सुटलेला नसल्यामुळे, ती टिकून राहावी इतकंच नव्हे तर आणखी खुलावी याकरिता त्याने त्याला शक्य होतं ते म्हटलं आणि शक्य होतं ते केलं.

पण जेवण कसंबसं पुरं होतं आहे, तोच माझ्यामध्ये असा एक अत्यंत आश्चर्यकारक बदल घडून आला, कमालीच्या प्रबळ पण ज्यांतून सुख वाटावं अशा रवरवत्या संवेदनांनी माझ्या अंगभर असा उच्छाद मांडला की स्वत:ला कशी आवरू ते मला कळेना; फटके मारल्यामुळे होणारी फुणफुण निघून जाऊन तिच्या जागी अशी एक उष्ण खाज, एक बेचैनी आणणारी विरविर माजली, की माझ्या नकळत मी निश्वास टाकू लागले, मांड्या एकमेकींविरुद्ध घट्ट आवळून धरल्या, अतोनात अस्वस्थ होत खुर्चीतल्या खुर्चीत इकडेतिकडे हालचाल करीत वळवळू लागले; शिक्षेचा दणका मुख्यत्वेकरून ज्या अवयवांवर बसलेला होता तिथेच उद्भवलेल्या ह्या खाजरट झिणझिण्यांनी, पेट घेतलेल्या व हाहाकार माजवणाऱ्या सूक्ष्मदेही प्रेरणांच्या पलटणीच जाग्या करून त्यांच्या समोरच्या मोर्चावर पाठवल्या; तिथे त्या एकत्र आल्या, आणि त्यांचा प्रक्षोभ इतका विकोपाला गेला की चावचाव होऊन मी वेड लागण्याच्या अवस्थेला आले. अशा परिस्थितीत मी सापडले असताना, आणि माझ्यातली सारी मर्यादाशीलता व शालीनता चाटून पुसून खाणाऱ्या ज्वालांनी वेढली गेलेले असताना, अत्यंत तीव्र अभिलाषेने आकंठ भरलेले माझे डोळे माझ्या सोबत्याकडे पाहून संकटात असल्याचे ढळढळीत इशारे देऊ लागावेत यात आश्चर्य मुळीच नाही: मागे जाणाऱ्या प्रत्येक क्षणाबरोबर हा सोबती आता मला अधिकाधिक देखणा, आणि माझ्या इच्छापूर्तीसाठी व सुटकेसाठी अत्यंत निकडीचा वाटू लागला.

अशा तऱ्हेच्या प्रसंगांचा मिस्टर बारव्हीलला पूर्वानुभव असल्यामुळे तो या बाबतींत नवखा नव्हता, तेव्हा माझी उडालेली दैना व मला ग्रासून असणारी कमालीची बेचैनी त्याच्या ताबडतोब लक्षात आली; आणि त्याबद्दल विधायक काही करण्याच्या हेतूने त्याने टेबल बाजूला काढताच, ह्या पूर्वरंगामुळे आता मला लवकरच आराम मिळणार अशी आशा वाटू लागली; मात्र मला आधी वाटला तितका तो जवळ नव्हता: त्याने आता माझ्यासमोर पाटलोणीची बटणे काढलेली होती, पण त्याचं कुचकामी मेंघळट अवजार डिवचून कार्यप्रवृत्त करण्याचा अयशस्वी प्रयत्न केल्यानंतर तो मला शरमून

म्हणाला, की तूच आता सूत्रं हाती घेऊन याच्यातल्या आळसट, झोपाळू शक्तीला पुन्हा जागं केल्याखेरीज काही खरं नाही; आणि हे करायचा मार्ग म्हणजे मला आत्ताच झालेल्या कापून रक्ताळलेल्या जखमांची भगभग थोडी आणखी ताजी करायला हवी, कारण खेळातल्या भोवऱ्याप्रमाणेच ह्यालाही झटका दिल्याखेरीज उभं राहता येत नाही. आणि अशा रीतीने, त्याच्याइतक्याच माझ्याही हितासाठी मला झटलं पाहिजे याची जाणीव होताच, त्याची मागणी पुरी करण्याकरिता मी लगबगीने पुढे सरसावले; त्याने एका खुर्चीच्या पाठीवर डोकं टेकवल्यानंतर, पूजेअर्चेत काटछाट करून मी त्याला एक हलकासा फटका दिला असेल नसेल तोच माझ्या ईप्सित वस्तूमध्ये नवजीवन आलेलं दिसू लागलं, आणि जणू जादुई स्पर्श व्हावा त्याप्रमाणे लागलीच ती मोठ्या राजेशाही दिमाखात डौलाने वर पाहू लागली! मला लगोलग तिचा लाभ मिळावा यासाठी घाई करून त्याने मला बाकावर उताणं केलं; पण त्याच्या अवजाराचं महाप्रचंड डोकं आत घ्यायचं तर मला माझ्या पार्श्वगोलांवर रेलावं लागणार होतं, आणि तसं करताच तिथे पुन्हा जागी झालेली वेदना इतकी ओली होती, की मला ते अजिबात सहन होईना. मग मी उठले; आणि पुढे वाकून, ढुंगण माझ्या हल्लेखोराकडे वळवून त्याला मागील दाराशी येऊ देण्याचा प्रयत्न केला: पण त्याच्या आत येण्याच्या अस्वस्थ धडपडीमुळे त्याचं पोट तिथल्या ताज्या जखमेला सरळ धडका देत असताना तो मला इतका खेटून असलेला सहन करणंही शक्य होईना. आता काय बरं करावं?!

राहवणार नाही इतके आम्ही दोघेही तापून चेकाळलो होतो; पण लटपटी करून स्वत:ची सोय कशी बघायची हे कामनेला ठाऊक असतंच: मला त्याने क्षणार्धात पूर्ण नागडं केलं, आणि विस्तवासमोर गालिचावर एक मोठी रुंदट उशी ठेवून, तिच्यावर मला हळूच उलटं उभं केलं; मला फक्त कमरेपाशी धरून माझ्या तंगड्या त्याच्या मानेभोवती लावल्या, आणि मीही अंग लवचिक करून त्याला शक्य तितकी मदत केली हे इथे नमूद करत्ये; आता फक्त माझे हात व ती मखमली उशी यांनीच माझं डोकं जमिनीवर आपटायचं राहिलेलं होतं, आणि उशीवर माझे केस ओघळून पसरलेले होते: अशा अवस्थेत मी हातांच्या आधारे शीर्षासनात उभी होते; आणि अशा पवित्र्यात त्याच्यावर रेललेली होते की मांड्यांनी त्याला वेटोळं घातलेलं असून, माझी सगळी पाठ व त्याच्यासाठी रक्तरंजित आनंदसोहळा भरवणारी रंगभूमी त्याच्या दृष्टीला खुली झालेली होती; बेमुर्वतखोरपणे टक लावून पाहणाऱ्या माझ्या गुप्तांगाला त्याचं चवताळलेलं अवजार सामोरं आलं होतं, आणि त्याच्या शेजाऱ्यांवर घडलेल्या अन्यायाचा सूड माझ्यावर घेण्यासाठी त्याची जय्यत तयारी दिसत होती.

पण अर्थात हे आसन खूप आरामशीर म्हणता येण्यासारखं नसल्यामुळे, आणि जबरदस्त पिळल्या

गेलेल्या आमच्या वासनांना आता थोडाही उशीर सहन होण्यासारखा नसल्यामुळे, त्याने घायकुतीला येऊन भयंकर खटाटोप करीत ओकच्या झाडाच्या बियाणाएवढं असलेलं त्याच्या इंद्रियाचं डोकं ओठांमध्ये किंचितसं सरकवलं; आणि ज्या त्वेषाने तिथे मुसलप्रवेश केला होता, त्याच्याच बळावर उरलेलंही लवकरच कोंबून आत घातलं; माझ्या खवळत्या प्रोत्साहनांखाली तो आता एकामागून एक धक्के देत राहिला, आणि माझ्या मागल्या बाजूच्या जखमा, शरीराची अतिशय अवघडलेली परिस्थिती, व त्याच्या अवजाराचा अवडंबरी आकार, ह्या सगळ्यामुळे उद्भवलेली त्रासाची व बेचैनीची जाणीव, तिच्यापेक्षा अनंतपटींनी वरचढ असणाऱ्या हर्षभावनेत त्याने पुरती गुदमरून-बुडवून टाकली; पण आता मात्र, सुखाच्या करंडकासाठी जिथे अहमहमिकेने झगडा चालू होता आणि निर्णायक क्षण जवळ येऊ लागला होता, त्या आखाड्याकडे माझ्यातल्या साऱ्या चेतनांच्या व संवेदनांच्या आदिशक्ती धावत सुटल्या; मला सोसाव्या लागलेल्या अनावर ताणतणावांतून व विक्षुब्ध जाणीवांतून फार हवीहवीशी वाटणारी मोकळीक यानंतर लवकरच जेव्हा निसर्गदेवतेने मला दिली; तेव्हा तोच सूर पकडून, त्याच क्षणी, पौष्टिक मधुद्रवाचा असा दुथडी भरून नळ माझ्या पुरुषाने माझ्यात सोडला, की यापूर्वी जी एक नव्या नमुन्याची कंड सुटून मी सहन होईनाशी सैरभैर झाले होते, तिच्या तवतवणाऱ्या चाव्यांवर फुंकर घातली जाऊन त्यांची कड बोथटली आणि माझ्या संवेदनांचा कोलाहल काहीसा शांत झाला.

ह्या जगावेगळ्या साहसात पडण्याआधी, त्यातून काय निष्पन्न होईल याविषयी माझ्या मनात जो एक ठोकताळा होता त्यामानाने खूपच जास्त सुख शेवटी माझ्या पदरी पडलं; शिवाय माझ्या मनसबदाराने नंतर माझ्या सोशिकपणाची व समजुतदारपणाची जी तोंड फाटेपर्यंत स्तुती केली, तिच्यामुळे ते कमी होण्याचा अर्थात काहीच धोका नव्हता; आणि ह्याच्याच जोडीला त्याने मिसेस कोलला दिलेल्या मोबदल्याव्यतिरिक्त, माझी अपेक्षा ज्याच्या जवळपासही पोहोचली नव्हती इतकी भरघोस बक्षिसी मला देऊन ह्या स्तुतीवर वजन टाकलं. पण तरीदेखील त्याच्याबरोबर पुन्हा संधान बांधावं किंवा प्रकृतीच्या वारूला साहजिक गतीने दौडत नेण्याऐवजी अधिरेपणाने झोडपून दामटून न्यावं, असा मोह यानंतर मला कधी झाला नाही; माझ्या मते हा सगळा प्रकार, लैंगिक उत्तेजना वाढवण्यासाठी स्पॅनिश माशा चिरडून बनवलेली एक दवा बाजारात मिळते तसा काहीसा काम करतो (कदाचित त्यापेक्षा यात धोका कमी, पण वेदना जास्त असतील), आणि कदाचित मिस्टर बारव्हीलला ह्याचा उपयोग असेल; पण जिच्या भुकेला पराणीपेक्षा लगामाची जास्त गरज आहे, अशा माझ्यासारखीला अजिबात नव्हता.

ह्या धाडसानंतर मिसेस कोलला मी आणखीनच आवडू लागले; आणि ही पोरगी माझ्याच जातकुळीची आहे, कशालाही घाबरत नाही, सुखाच्या यच्चयावत खडतरहत्यारांना सामोरी जाऊन शेवटापर्यंत लढण्याइतकी खंदी आहे, अशा भावनेने ती माझ्याकडे बघू लागली. माझ्यावर तिची आता खास मर्जी बसलेली असल्यामुळे, माझ्या फायद्याची तरी किंवा सुखभोगाची तरी काही तरतूद करावी असं तिच्या मनाने घेतलं; आणि यातली पहिली गोष्ट विशेष महत्त्वाची आहे अशा भूमिकेतून, एक अत्यंत विक्षिप्त कल असलेलं नवं गिऱ्हाईक माझ्यासाठी शोधून काढून तिने समोर हजर केलं. हा एक पोक्त, गंभीर व भारदस्त व्यक्तिमत्वाचा उतारवयातला गृहस्थ होता, आणि त्याची एक खोड अशी होती की मुलायम केसांच्या बटा विंचरण्यातून त्याला आनंद मिळत असे; ह्या त्याच्या अभिरुचीसाठी माझं डोकं अत्यंत अनुरूप असल्यामुळे माझ्या नट्टापट्टा करण्याच्या वेळेस तो नेहमी येत असे, आणि माझे केस मी अनलंकृत अवस्थेत सैल मोकळे सोडून देऊन त्याला त्यांचं काहीही करू देत असे; मग तो किमान तासभर तरी मला बसवून ठेवून त्यांच्याशी चाळा करीत राही, त्यांच्यातून कंगवा फिरवी, स्वत:च्या बोटांभोवती त्यांचा गुंडाळा करी, ते सारखे करताना त्यांचं चुंबनसुद्धा घेई; आणि याच्या पुढची पायरी म्हणून त्याने माझ्या शरीराचा इतर काही वापर केला आहे असं होत नसे, किंवा इतर कोणतीही मर्यादा तो ओलांडत नसे; जणू काही आम्हा दोघांमध्ये लिंगभेद नव्हताच. त्याची आणखी एक विचित्र आवड म्हणजे, तो मला कोकराच्या नाजूक कातड्याचे बनवलेले डझनभर पांढरेशुभ्र हातमोजे एकेका वेळी भेट देई: आणि मग माझ्या हातांवर ते चढवून, त्यांच्या बोटांची टोकं दातांनी तोडून काढून, स्वत:ची करमणूक करून घेई; आजारलेल्या वासनेतून उद्भवलेल्या ह्या असल्या वेडगळपणाखातर तो जितके पैसे देत असे, तितके इतर बहुतेकजण यापेक्षा जास्त गरजेच्या सेवांसाठीही देत नसत. पण त्याला एका जबरदस्त खोकल्याने गाठून अंथरूण धरायला लावलं तेव्हा कुठे हा प्रकार थांबला; एकदा त्याची पीछेहाट झाल्यानंतर मग पुन्हा माझा त्याच्याशी संपर्क आला नाही, आणि एका अत्यंत निरागस व निरस अशा फालतू माणसापासून माझी मुक्तता झाली.

असल्या फावल्या वेळात पत्करलेल्या कामामुळे माझ्या आयुष्यातल्या इतर कुठल्याही नित्यक्रमामध्ये किंवा योजनेमध्ये लुडबुड झाली नाही, हे मात्र नक्की; आता प्रांजळपणे सांगायचं तर त्या कालखंडात माझं आयुष्य मी सर्वसाधारणपणे संयम व मर्यादा पाळूनच घालवलं, पण यामागे माझ्या गुणी स्वभावाचं श्रेय कमी असून, सुखभोगांचं अजीर्ण, अनुभवांची उतरलेली नवलाई व पैशाची रेलचेल याच परिस्थितीचं अधिक होतं. आलेल्या आमंत्रणामध्ये जर आर्थिक लभ्यांश व कामनापूर्ती यांचा समसमासंयोग झालेला नसेल तर त्यात मी रस घेत नसे; आणि ह्या दोन्हींही गोष्टी एकत्र मिळवून देणाऱ्या संधी नशिबाने केव्हा ना केव्हा येतच राहतील अशी मी फार उतावळी न होता वाट पाहू

शकत होते; अर्थात यामागचं कारण असं, की एकतर पहिल्या प्रतीचा माल म्हणून आत्तापर्यंत मी बाजारात वावरलेले असल्यामुळे आणि नखरेल चीजांची कुमक मिळत राहून माझे लाड झालेले असल्यामुळे चवलीपावली व्यवहारांत आता मला मुळीच गम्य राहिलेलं नव्हतं: शिवाय दुसरं असं, की थोड्याफार क्षणिक मोहांचा त्याग करीत असताना, त्यातून आपण स्वत:चाच मान ठेवू लागल्याचं आणि याचबरोबर त्वचेचा जिवंतपणा व तजेला टिकवून धरल्याचं एक अंतस्थ समाधान मला मिळू लागलं होतं.

हे अंग राखून वागण्याचं धोरण लुईसा आणि एमिली ह्या दोघींनी माझ्याइतक्या वरच्या थराला नेलेलं नसलं, तरीदेखील त्या स्वस्त किंवा उधळलेल्या म्हणता येतील अशांतल्या मुळीच नव्हत्या; पण त्यांच्या ह्या प्रतिष्ठेशी विसंगत वाटतील अशा दोन घटना घडल्या, आणि त्या काहीशा अनवट असल्यामुळे जाताजाता इथे नमूद करत्ये; त्यांत पहिल्यांदा एमिलीची गोष्ट सांगत्ये:

एके रात्री ती आणि लुईसा बॉलडान्सला गेल्या, त्याप्रीत्यर्थ लुईसाने धनगराच्या पोरीचा आणि एमिलीने धनगराच्या पोराचा वेष घेतलेला होता: जायला निघण्यापूर्वी त्यांच्या पोषाखांत मी जेव्हा त्यांना पाहिलं, तेव्हा एमिली गोरीपान व बांधेसूद असल्यामुळे मला असं वाटून गेलं की इतका छानदार पोरगा खराखुरा कुठेच पाहायला मिळायचा नाही. थोडा वेळ दोघी एकमेकींबरोबर होत्या, पण तेवढ्यात लुईसाला तिच्या जुन्या ओळखीचं कुणीतरी दिसल्यामुळे तिने मोठ्या दिलखुलासपणे आपल्या सोबतिणीला टांग मारली. पुरुषवेष आणि स्वत:ची अक्कल इतक्या भरवशावर जरी तिने एमिलीला सोडून दिलेलं असलं, तरीदेखील यातल्या पहिल्या घटकाकडून मिळू शकणारं संरक्षण बेताचंच होतं आणि दुसऱ्याकडून मिळू शकणारं त्याहीपेक्षा कमी होतं. आपला परित्याग केलेला आहे असं लक्षात येताच एमिली काही वेळ इकडेतिकडे निरुद्देश भटकत राहिली, आणि शेवटी काहीतरी आपलं करायचं ह्या भावनेतून, गार वाटावं व मोकळी हवा लागावी म्हणून तिने स्वत:चा मुखवटा उचकटून काढला व साईड-बोर्डकडे गेली; तेव्हा अतिशय पैसेबाज टोपदार डगला घातलेला आणि डोळ्यांवर काळा मुखवटा लावलेला जो एक तरुण तिच्यावर पाळत ठेवून होता, तो तिला गाठून तिच्याशी गप्पा मारू लागला.

ह्या संभाषणामध्ये एमिलीचा साधा मनमोकळा स्वभाव तिच्या बुद्धिमत्तेपेक्षा जास्त उठून दिसला असणार यात शंका नाही; पण यानंतर मात्र हा डगला बराच वाहवत जाऊन अधिरेपणाने तिच्या अंगचटीला येऊ लागला, मास्करेड रूमच्या मुख्य दारापासून लांबवर दुसऱ्या टोकाला जिथे काही बाकं ठेवलेली होती, तिथे नकळत घेऊन जाऊन त्याने तिला आपल्याजवळ बसवलं, तिचे हात चुरले,

गालांचे चिमटे घेतले, मऊ केसांचं कौतुक करून ते कुरवाळले, गोऱ्यापान रंगाची वाखाणणी केली – ह्या सगळ्या प्रणयाराधनात जो एक चिमूटभर विचित्रपणा होता, त्याचं रहस्य न कळून बिचाऱ्या एमिलीची अशी समजूत झाली की त्याला आपला पोषाख खासच आवडला आहे; आणि तिने पत्करलेल्या व्यवसायातल्या सर्वाधिक पाषाणहृदयी मुलींमध्ये तिची गणना होत नसल्यामुळे, मुद्द्याच्या बाबींविषयी संधान बांधण्याकडे तिच्या मनाचा कल होऊ लागला. यातल्या विनोदाची मेख अशी की वरकरणी ती एक स्त्रैण चेहरा असलेला पोरगा वाटत होती, तशीच ती प्रत्यक्षात आहे असं तो समजून चालला होता; पण स्वत:च्या पालटलेल्या वेषाबद्दल ती विसरून गेलेली असल्यामुळे, आणि अर्थात त्याच्या डोक्यात ज्या प्रकारच्या कल्पना होत्या त्यांची तिला गंधवार्ताही नसल्यामुळे, आपण मुलगी असल्यामुळे आपल्याकडे इतकं लक्ष दिलं जातं आहे असं तिला वाटलं; पण वास्तविक त्याच्या गृहीतकाप्रमाणे ती तशी नसल्यामुळेच ते दिलं जात होतं. ही दुहेरी चूक दोन्हींही पक्षांकडून इतकी पुढे दामटली गेली की ह्या माणसाच्या पेहरावातले जे घटक वेषांतराचा भाग नव्हते त्यांवरून हे एक वजनदार प्रस्थ असावं इतपत अंदाज एमिलीने बांधला असला, तरी त्यापलीकडे विचार केला नाही; शिवाय त्याने पाजलेल्या वाईनमुळे व भरपूर कुरवाळून लाड केल्यामुळे तिचं डोकं हल्लक झालेलंच होतं; तेव्हा परिणाम असा झाला, की त्याने केलेल्या आग्रहाला बळी पडून ती त्याच्याबरोबर हमामखान्यात जायला तयार झाली; आणि अशा प्रकारे, मिसेस कोलने दिलेला सबुरीचा सल्ला नजरेआड करून, आंधळा भरवसा ठेवून, या माणसाच्या लहरीनुसार वाटेल तिथे घेऊन जाण्यासाठी स्वत:ला तिने त्याच्या हाती सोपवून दिलं.

त्याची बाजू मांडायची तर कामनांनी त्यालाही तितकंच अंध बनवलेलं होतं; आणि फार कौशल्याने रचलेल्या कारस्थानामुळे त्याची फसवणूक जितकी सोपी झाली नसती, तितकी तिच्या अतोनात बावळटपणामुळे झाली; तो खचितच असं समजला की आपल्या कामासाठी झकास असलेला हा एक भोळा बाळकोबा हाती लागलेला आहे, किंवा तसं नसेल तर कुणीतरी पदरी ठेवलेला, मोडून सरावलेला पोरगा आहे, आणि आपल्याला काय हवं हे त्याला अचूक कळलं असून स्वखुषीने यात सामील झाला आहे. ते काही असो, तो तिला घोडागाडीपाशी घेऊन गेला, आपणही तिच्याबरोबर आत शिरला, आणि एका अतिशय ऐषारामी खोलीत तिला घेऊन आला; तिथे पलंगही होताच, पण त्याच्याव्यतिरिक्त कुणाशीच ती काही बोलली नसल्यामुळे आपण हमामखान्यात आहोत की नाही हे तिला समजलं नाही. परंतु आता ते एकांतात असताना, लिंगभेद ज्यांमुळे ताबडतोब कळून येईल अशा टोकाच्या कारवायांपर्यंत जेव्हा तिचा आषुक जाऊन पोहोचला, तेव्हा अचंबा, गोंधळ व निराशा यांचं जे मिश्रण त्याच्या चेहऱ्यावर दिसू लागलं त्याचं यथाचित्र वर्णन शक्य नाही असं ती नंतर म्हणाली; याच्याच जोडीला कारुण्यमय आवाज काढून तो उद्गारला: "अरेच्या! ही तर मुलगी आहे!"

धडधडीत मूर्खपणामुळे आत्तापर्यंत बंद असलेले तिचे डोळे यामुळे खाडकन उघडले. पण जे गमावलं होतं ते जणू परत आणण्यासाठी अजूनही तो तिला कुरवाळत-गोंजारत राहिला; परंतु हे करीत असताना, क्षणभरापूर्वीची प्रचंड उत्तेजना व आत्ताचं थंड, कोरडं सौजन्य हा त्याच्यामधला बदल इतका ढोबळ होता की एमिलीच्यादेखील तो लक्षात आल्याशिवाय राहिला नाही; आणि अनोळखी माणसाशी संधान करू नये असं जे मिसेस कोलने बजावलेलं होतं, ते ऐकायला हवं होतं असं तिला वाटू लागलं. यानंतर मात्र, कडेलोट श्रद्धाळूपणाच्या मागोमाग कडेलोट भितरेपणा तिच्या अंगात शिरला; आणि आपण पूर्णपणे ह्या माणसाच्या कह्यात आहोत, तेव्हा तो काय करणार ते करो अशी तिची मनोभूमिका होऊन, त्याची प्रस्तावना चालू असताना सारा वेळ ती अगदी निमूट राहिली: तेव्हा आता यापुढे, एकतर तिच्या विलक्षण सौंदर्यावर भाळल्यामुळे तिच्या लिंगात असलेली गफलत तो माफ करायला तयार झाला, किंवा त्या पोषाखात ती जशी दिसत होती त्यामुळे त्याचा सुरवातीचा भास अजूनही रेंगाळू पाहात होता; पण यातलं काहीही जरी कारण असलं, तरीदेखील त्याची उडून गेलेली अभिलाषा अंशाअंशाने पुष्कळच परत आली; आता एमिलीच्या पाटलोणीची बटणं सोडलेलीच असताना त्याने ती गुडघ्यापर्यंत खेचून खाली घेतली, आणि हळूच तिला वाकायला लावून, तिचा चेहरा पलंगाच्या कडेवर ठेवून, मागच्या दुहेरी उंचवट्यामधले दोन मार्ग निवड करण्याकरिता व्यवस्थित सामोरे राहतील अशा पवित्र्यात तिला उभं केलं; यानंतर आता त्यांतल्या चुकीच्या मार्गाने जाण्यासाठी तो सरसावलेला पाहून ह्या मुलीला अशी धास्ती वाटली की जो आडपडदा आपल्याला स्वप्नातदेखील गमवायचा नव्हता तोच जातो की काय!

परंतु तिने तक्रार केल्यामुळे व सौम्य पण स्पष्ट विरोध केल्यामुळे तो थबकला, आणि त्याला पुन्हा वस्तुस्थितीचं भान आलं; तेव्हा आता आपल्या तुरगाचं तोंड वळवून त्याने तो शेवटी सन्मार्गाला नेला. माझा तर्क असा की दोहोंतल्या ज्या साम्यामुळे त्याची रुची आकृष्ट झालेली होती, त्यातून स्वतःच्या कल्पनाशक्तीच्या साहाय्याने जमेल तितकी स्फूर्ती घेऊन, विशेष अट्टाहास न करता त्याने प्रवास पुरा केला: यानंतर तो तिला खोलीबाहेर घेऊन आला, दोनतीन गल्लीबोळ तिच्यासोबत चालत जाऊन तिच्यासाठी एक मेणा ठरवला, तिची निराशा होणार नाही इतकी बिदागी तिला दिली, मेणेवाल्यांनाही खूष करण्यात आलं, आणि शेवटी तिने सांगितलेल्या रस्त्यारस्त्यांनी त्यांनी तिला घरी परत आणलं.

हा सगळा प्रकार जेव्हा तिने दुसऱ्या दिवशी सकाळी मला व मिसेस कोलला सांगितला, तेव्हा आदल्या रात्रीच्या घबराटीचा व शरमलेपणाचा शिक्का तिच्या चेहऱ्यावरून अजूनही पुसला गेलेला

नव्हता. मिसेस कोलचं म्हणणं असं पडलं, की स्वभावतः समज कमी असणं हे कारण तिच्या अविचारामागे असल्यामुळे एकामागून एक खडतर अनुभव येत राहिल्याखेरीज ती यातून बरी होण्याची फारशी आशा नाही. माझं म्हणणं असं पडलं, की इतकी सरसकट घाणेरडी, काहीच्याबाही, व जिचं समाधान करणं अशक्य, अशी अभिरुची कुणाची कशी असू शकते हेच मला कळत नाही; कारण आकारात इतकी प्रचंड तफावत असलेल्या गोष्टींची निसर्ग कधी बळेच सांगड घालीत नाही, हे माझं सर्वसाधारण अनुभवसिद्ध मत आहे. माझ्या ह्या अज्ञानावर मिसेस कोल फक्त मंद हसली, आणि माझा भ्रमनिरास ज्यामुळे जवळ येईल असं काही बोलली नाही; पण यानंतर काही महिन्यांनी मला चक्षुर्वैसत्य दाखविणारा एक अतिशय चमत्कारिक प्रसंग घडून येऊन शेवटी तो झाला, तेव्हा इतक्या अप्रिय विषयाकडे पुन्हा वळावं लागू नये म्हणून हा वृत्तान्त मी इथे नमूद करत्ये.

माझी मैत्रिण हॅरिअट आता हॅम्प्टन कोर्टमध्ये राहायला गेली होती, आणि तिच्या भेटीला जायचं ठरवून मी भाड्याची घोडागाडी सांगितलेली होती; मीही तुझ्याबरोबर येईन असं मिसेस कोलने कबूल केलं होतं, परंतु ऐनवेळी काही अडचण उपटल्यामुळे तिला मागे थांबणं भाग पडून मला एकटीलाच जावं लागलं; मात्र प्रवासाचा तिसरा हिस्सा पार पडला असेल नसेल तोच चाकाची आरी मोडली, पण तशातही सुदैवाने काहीसुद्धा दुखापत न होता मी गाडीतून सहीसलामत बाहेर निघाले आणि हमरस्त्यावर एक पब्लिक हाऊस त्यातल्या त्यात बरं दिसलं, तिथे जाऊन पोहोचले. त्या ठिकाणचे लोक मला म्हणाले की जास्तीतजास्त दोनेक तासांत स्टेजकोच येईल; आता इतकं अंतर सहलीवर आलेलीच असल्यामुळे त्यावर पाणी सोडण्याऐवजी कोचची वाट पाहावी असं मी ठरवलं, तेव्हा एक जिना चढून वरच्या मजल्यावर असलेल्या एका स्वच्छ नीटनेटक्या खोलीत मला नेण्यात आलं, आणि घराची कदर करायची म्हणून काहीतरी मागवीन असा निर्वाळा देऊन तेवढ्यापुरता मी खोलीचा ताबा घेतला.

इथे मी खिडकीबाहेर बघत मनोरंजन करून घेत असतानाच एक लहानशी घोडागाडी दारापाशी थांबली, आणि बऱ्या घरचे वाटावेत असे दोन पुरुष तिच्यातून हलकेच उड्या मारून बाहेर आले; घटकाभर आराम करायला व काहीतरी तोंडात टाकायला म्हणून ते आले असावेत असं वाटत होतं; कारण आम्ही लगेच परत येऊ, तेव्हा घोडा तयार असू दे, असं ते आत जाताना सांगून गेले. यानंतर त्यांना माझ्या शेजारची खोली उघडून दिल्याचं दाराच्या आवाजावरून मला कळलं; मग लागलीच त्यांनी काहीतरी आणायला नोकराला सांगितलं, आणि हवं ते मिळताच, दार बंद करून आतून लावून घेतल्याचा आवाज मला पुसटसा ऐकू आला.

मला काही विशिष्ट संशय आला म्हणून नव्हे किंवा इतर काही हेतू होता म्हणूनही नव्हे, तर औत्सुक्य दाटून आल्यामुळे (पण अचानक मुळीच नाही, कारण माझ्यात ते नव्हतं असं कधीच नव्हतं), ही माणसं कोण आहेत, कशी दिसतात व काय करताहेत हे मला पाहावंसं वाटू लागलं. दोन खोल्यांतलं पार्टिशन हलवता येण्याजोगं होतं, जेणेकरून गटाने अनेकजण आल्यास त्यांची सोय होण्यासाठी ते बाजूला करून एकच मोठी खोली करता येत असे; आणि आता काकदृष्टीने शोध घेऊनही मला त्यात कुठेच हेरगिरी करायला भोकच काय तर भोकाची सावलीदेखील मिळेना; अर्थात ही वस्तुस्थिती पलिकडच्या माणसांच्या नजरेतून सुटली नसावी, कारण याबाबतीत हेळसांड न होणं त्यांच्या दृष्टीने फार महत्त्वाचं होतं; मात्र थोडा शोध घेताच, लाकडी तावदानाच्याच रंगाचा, बहुतेक काहीतरी खोट लपवण्यासाठी डकवलेला एक कागद मला दिसला: पण तो इतक्या उंचावर होता की तिथपर्यंत पोहोचण्यासाठी मला खुर्चीवर उभं राहावं लागलं; शक्य तितका कमी आवाज करून हे मी जमवलं, आणि सुईच्या टोकाने लगेच त्याला भोक पाडलं.

आता डोळा जवळ लावून पलिकडची अख्खी खोली उत्तम पाहता येत होती; आणि मला दिसलं ते असं की हे दोन तरणेबांड पोरगे, इकडेतिकडे बागडत व एकमेकांच्या अंगचटीला येत, माझ्या समजुतीप्रमाणे शुद्ध निरागस भावनेने, खेळण्यात आणि व्रात्यपणा करण्यात मग्न होते. माझ्या ढोबळ अंदाजाप्रमाणे त्यांतला थोरला एकोणीस वर्षांच्या आसपास होता; पांढरा सुती झगा, हिरवा मखमली डगला व आखूड केसांचा टोप, अशा वेषातला हा एक उंच देखणा मुलगा होता. धाकट्याचं वय सतरापेक्षा जास्त नसावंच; हा एक गोरा, ताज्या रक्ताचा, बांधेसूद व खरोखरीच फार गोड पोरगा होता: जाड भरजरी कापडाचा हिरवा फ्रॉक व त्याला मिळतीजुळती पाटलोण, पांढरा डगला, पांढरे पायमोजे, आणि घोडेस्वारांची असते तशी टोपी, ह्या त्याच्या वेषावरून तो खेड्यातला असावा असं मला वाटलं; त्याच्या ह्या टोपीखालचे पिवळट रंगाचे लांब केस मोकळे सुटून गोलगोल बटा झालेल्या दिसत होत्या.

थोरल्याने आता डोळयांत सावधगिरीचे भाव आणून खोलीभर सगळीकडे पाहून घेतलं, पण ज्या लहानशा छिद्रावर मी पहारा देत उभी होते ते बहुतेक घाईमुळे व उतावळेपणामुळे त्याच्या लक्षात आलं नाही – अर्थात एकतर ते खूप उंचावर होतं, आणि तिथे माझा डोळा चिकटलेला असल्यामुळे प्रकाश झिरपून ते उघडकीस येण्याची शक्यता निकालात निघालेली होती – तेव्हा आता तो आपल्या सोबत्याला काहीतरी म्हणाला, आणि यामुळे परिस्थितीने अचानक पलटी खाल्ली.

थोरला धाकट्याला मिठ्या मारू लागला, आणि आवळून धरून त्याची चुंबने घेऊ लागला; त्याने

कपड्यांतून त्याच्या छातीत हात घातला, आणि त्याच्याशी प्रेमचाळे करण्याची आपली इच्छा असल्याच्या इतक्या उघड खुणा दर्शविल्या, की हा दुसरा म्हणजे वेषांतर केलेली मुलगीच आहे असा माझा समज झाला: पण ह्या चुकीबद्दल मला कमी ओशाळं वाटण्यामागचं कारण असं की निसर्गानेही त्याच्यावर पुरुषत्वाचा शिक्का मारून आपल्या वाट्याची चूक केलेलीच होती. कोवळ्या वयाची प्रवृत्ती वाहवत जाण्याची असते, आणि हे विदूषकी सुख घेण्याचा प्रकल्प तडीस नेण्याकरिता दोघेही घायकुतीला आलेले होते; तेही अशा ठिकाणी, की गौप्यस्फोट होण्याची शक्यता तिथे मुळीच कमी नसल्यामुळे याचे अतिशय वाईट परिणाम होण्याचा धोका फार होता; तेव्हा अशा परिस्थितीत ते ज्या थराला गेले, त्यावरून ते काय आहेत हे मला लवकरच कळून चुकलं.

कारण आता थोरल्याने धाकट्याच्या पाटलोणीची बटणं काढली, आणि कपड्यांचा अडथळा दूर करून, एक मध्यम आकाराची, फारसा भराव नसलेली पांढरी कांडी बाहेर आणली; तिला हातात घेऊन तो तिच्याशी थोडाफार खेळला, आणि जोडीला इतरही चावटपणा त्याने केला; काही नखरेल आढेवेढे सोडल्यास ह्या सगळ्या प्रकाराला धाकट्याने विरोध असा केला नाही, आणि जो केला त्यातही आवाहनाचा वाटा प्रतिकाराच्या दसपट होता; थोरल्याने त्याला आता चेहरा उलट दिशेला वळवून, तिथे एक खुर्ची मदतीला उभीच होती तिला टेकून उभं राहायला लावलं; तेव्हा, माझ्या तर्कानुसार, आपलं कर्तव्य काय आहे हे त्या गंधर्वपुत्राला ठाऊक असल्यामुळे त्याने मोठ्या लीनपणे आपलं डोकं खुर्चीच्या पाठीला टेकवलं; आणि बाकी शरीराचं मागे पोक काढून, अजूनही सदऱ्याने झाकलेला तो प्रदेश, लक्ष्य म्हणून आपल्या जोडीदारासमोर आणला.

तो मला एका बाजूने दिसत होता, आणि आपल्या सोबत्याच्या नेमका समोर होता; यानंतर थोरल्याने आपला जो खलबत्ता बाहेर काढला, त्याचा यापेक्षा जास्त चांगला उपयोग व्हावा अशी वास्तविक त्याची योग्यता होती; आणि ह्या टापूतल्या दोन संबंधित अवयवांचं परस्परपरिमाण एकमेकांशी विसंगत असल्यामुळे इतक्या ओंगळ थराला वाटाघाटी पोहोचणं शक्य नाही असा जो माझा आधी समज होता, तो त्याला पाहून अधिकच पक्का झाला: पण माझा हा भ्रामक समज जसा दूर झाला तसा सर्व निष्पाप युवकांचाही होवो, आणि धोक्याची यथार्थ कल्पना नसल्यामुळे अशा प्रकारच्या सापळ्यांत अडकण्याची वेळ त्यांच्यावर न येवो, अशी इच्छा मी प्रकट करत्ये; कारण मोहाविषयी अज्ञान म्हणजे मोहापासून संरक्षण नव्हे.

यानंतर आता थोरल्याने धाकट्याचा सदरा बाजूला करून, मागच्या बाजूच्या कपड्यांमागे त्याला वर खोचून ठेवून, रोममधल्या टेकड्यांप्रमाणे रमणीय असे देखणे मांसल राजगोलक मोकळ्या हवेत

आणले; आणि त्या दोघांमधल्या चिंचोळ्या दरीसकट हल्ल्याला तोंड देण्याकरिता ते थाटाने उभे राहताच, थोरल्याने चालविलेली पूर्वतयारी पाहून मला धसका बसल्याखेरीज राहिला नाही. त्याने आपलं अवजार, अर्थात जास्त सुळसुळीत करण्यासाठी, थुंकी लावून भरपूर ओलं केलं; आणि नेम धरून आतमध्ये सरकवल्याची वार्ता मला समजली, ती केवळ त्याच्या दिशेवरून आणि मला ते दिसेनासं झाल्यावरूनच नव्हे, तर त्याला स्वीकारणारा अभागी तरुण, शरीर पिळवटून टाकीत, वळसे देत, कुजबुजत्या आवाजात कण्हत असल्यामुळे; पण सुरवातीची आडगल्ली एकदा मागे पडल्यानंतर, विशेष अडथळा किंवा घर्षण न होता, सारं काही गालिचा घातलेल्या रस्त्यावर चालल्याप्रमाणे सुरळीत असावं असं दिसू लागलं; आणि आता आपल्या चेल्याच्या कमरेभोवती विळखा देऊन, त्याने त्याच्या जबरदस्त ताठरलेल्या, तांबडं टोक असलेल्या हस्तिदंती खेळण्याला हात घातला; यातून निष्कर्ष असा निघत होता की हा धाकटा तरुण मागून आपल्या आईसारखा असला तरी पुढून वडिलांसारखा होता; मन रिझवण्याकरिता ह्या वस्तूचा उपयोग करीत, थोरला त्याचवेळी दुसऱ्या हाताने धाकट्याच्या केसांशी चाळा करीत राहिला; आणि आता धाकट्याच्या पाठीवर पुढे वाकून त्याचा चेहरा आपल्याकडे ओढून घेताच, त्याने आपल्या चेहऱ्यावरील केसांच्या सैलसर बटा बाजूला झाडून टाकून, जवळ येऊन एक प्रदीर्घ श्वासाचं चुंबन दिलं; यानंतर थोरल्याने दौड पुन्हा सुरू करून धाकट्याच्या पार्श्वभागाचा छळवाद चालूच ठेवला; आणि सरतेशेवटी, नेहमीच्या लक्षणांसहित परमोच्चबिंदू येऊन ह्या कार्यक्रमाची सांगता झाली.

त्यांनी सादर केलेला हा गुन्हेगारी नाट्यप्रवेश मी शेवटपर्यंत संयमाने पाहात राहिले ते निव्वळ याच हेतूने, की कायद्याचा बडगा त्यांच्यावर हाणून त्यांना तडकाफडकी अद्दल घडविण्याचा जो माझा बेत होता त्यादृष्टीने अधिक पुरावा मिळावा, व संशयाला जागा राहू नये; आणि म्हणूनच, कपड्यांची सारवासारव करून ते जाण्याची तयारी करू लागताच, सात्विक संतापाने माझं अंग जळत असताना, सगळं घर त्यांच्याभोवती गोळा करण्यासाठी म्हणून मी खुर्चीवरून उडी टाकली; पण दुर्दैवाने यात माझा धडपडेपणा मला असा भोवला की जमिनीवरच्या कसल्यातरी खिळयाला किंवा फाटक्याला माझा पाय अडकून जोरात तोंडघशी पडून माझी शुद्ध हरपली; मला मदत करायला कुणीतरी येईपर्यंत काहीतरी वेळ गेलाच असणार: तेव्हा माझ्या अंदाजाप्रमाणे, मी पडल्याच्या आवाजाने बिथरून जाऊन सहीसलामत पळ काढायला त्यांना जरुरीपेक्षा बरीच जास्त सवड मिळाली. आणि तो त्यांनी इतक्या घाईने काढला की आजूबाजूचे सगळेच दुग्ध्यात पडले; हे अर्थात मला नंतर कळलं, पण शुद्धीवर येऊन बोलता येण्याइतपत जेव्हा मी शांत झाले, तेव्हा ज्या प्रकरणाला मी साक्षीदार राहिले होते त्याची इत्यंभूत बातमी तिथल्या माणसांना दिली.

मी परत आल्यानंतर जेव्हा मिसेस कोलला ह्या लचांडाबद्दल सांगितलं, तेव्हा ती अतिशय सुज्ञपणाने म्हणाली की आत्तापुरते जरी हे दोघे भामटे निसटले असले तरीदेखील त्यांच्यावर पुढेमागे केव्हातरी अगदी समर्पक असं अरिष्ट कोसळणार यात शंका नाही; आणि असं होण्याचं जर तू तात्कालिक कारण ठरली असतीस, तर तुला वाटतोय त्यापेक्षा कितीतरी जास्त त्रास आणि शरमिंदेपणा सोसावा लागला असता; आता खुद्द त्या गोष्टीबद्दल जितकं कमी बोलावं लागेल तितकं चांगलंच; असल्या प्रकारातून नुसता बायकांच्या तोंडचा घासच नव्हे तर इतरही काही हिरावून घेतलं जात असल्यामुळे अख्ख्या स्त्रीजातीनेच त्याला एकजुटीने विरोध करायला हवा हे खरंच आहे, आणि म्हणून मी पक्षपात करत्येय असाही कुणी आळ घेईल; पण तसं अगदी नाही, मी भावनेच्या आहारी जाऊन मुळीच बोलत नाही, तर केवळ सत्यनिष्ठा माझ्याकडून हे वदवून घेते आहे; तर मला म्हणायचं असं, की इतिहासातल्या इतर युगांत व इतर देशांत ह्या बदनाम वासनेमुळे जो काही परिणाम झाला असेल तो असो, पण आपल्या इंग्लंडातल्या हवामानाला आणि पाण्याला हे एक विशिष्ट वरदानच मिळालेलं आहे, की तिने कलुषित झालेल्या यच्चयावत पुरुषांवर एक रोगट डाग स्पष्ट उमटलेला निदान आपल्या देशात तरी दिसून येतो; माझ्या माहितीचे जे कुणी असल्या जातकुळीतले आहेत किंवा निदान त्यांच्याबद्दल असा सार्वत्रिक लोकापवाद आहे, त्यांच्यापैकी जवळजवळ झाडून सगळ्यांबद्दल असं म्हणता येईल की इतर बाबतींतही त्यांचं चारित्र्य सरसकट कमालीचं टाकाऊ व घाणेरडंच असतं, लिंगसुलभ असे सगळे पुरुषी गुणविशेष त्यांच्यातून गळून गेलेले असतात, पण त्याउलट बायकी स्वभावातल्या यच्चयावत निर्बुद्ध व तामसी प्रवृत्ती त्यांच्यात गर्दी करून राहिल्या असतात; हे लोक बायकांचा तिरस्कार करतात व त्यांच्याबद्दल तुच्छपणाने बोलतात, आणि त्याचवेळी बायकी हावभाव, वागणंबोलणं, नटणंमुरडणं ह्या सगळ्याची वांदरांसारखी नक्कल करतात – बायकांना निदान त्यांचे नखरे ह्या लिंगविरहित मर्दकुमारींच्या मानाने थोडेबहुत शोभतात तरी; पण एकूण ही असली अगडबंब विसंगती हसण्यावारी नेण्यासारखी आहे म्हणून तिची छीथू करू नये असं अजिबात नाही.

पण इथे त्यांच्या नावाने हात धुवून मी पुन्हा माझ्या इतिहासात बुडी घेत्ये; आणि ह्या ठिकाणी लुईसाने केलेल्या एका हिडीस अगोचरपणाचं वर्णन डकवून देणं अत्यंत सयुक्तिक ठरेल, कारण एकतर त्यात माझा थोडासा वाटा होता, आणि शिवाय बिचाऱ्या एमिलीची लाज अगदीच जाऊ नये म्हणून ही कथा सांगण्याचं मी मागेच कबूल केलेलं आहे. बाई एकदा का तिच्या कक्षेबाहेर पडली की तिचा लंपटपणा कुठपर्यंत जाईल याला सुमार नाही, असं जे एक बोधवाक्य आहे; त्याला पुष्टी देणाऱ्या हजारो उदाहरणांमध्ये याचीही एक भर पडेल.

एके सकाळी, मिसेस कोल आणि एमिली अख्ख्या दिवसासाठी म्हणून बाहेर गेलेल्या असल्यामुळे फक्त लुईसा आणि माझ्याकडेच घराचा ताबा होता (अर्थात मोलकरीण होतीच); तेव्हा आम्ही दोघी भटकायला म्हणून समोरच्या गल्लीत उतरून दुकानांच्या काचांमधून आत डोकावत वेळ काढीत असताना, तिथल्याच एका खोपटात पायमोज्यांतल्या भोकांना रफू करून कसंबसं पोट जाळणारा एका गरीब बाईचा पोरगा आम्हाला दिसला. त्याने एका लहानशा गोल टोपलीच्या कडेभोवती लावलेले काही पुष्पगुच्छ आम्हाला विकत देऊ केले; त्याची आई ह्या दोघांच्या चरितार्थासाठी जे काही कमवीत असे, त्यात तो अशी किरकोळ भर घाली: नाहीतरी इतर कसला धंदा करायला तो लायकही नव्हता याचं कारण असं, की एकतर तो पुरता रेम्याडोक्या किंवा बैलबुद्धी म्हणण्यातला होता; आणि शिवाय तोतरा असल्यामुळे, ज्या काही गोळाबेरीज पाचसहा प्राणिविश्वातल्या संकल्पना त्याच्या मनात होत्या, त्या व्यक्त करण्यासाठी त्याच्या तोंडून निघणाऱ्या आवाजांचा देखील काहीसुद्धा अर्थ लागत नसे.

हा मवाळ व गयाळ माणूस त्याला जे सांगाल ते ताबडतोब करीत असल्यामुळे, आणि त्याचा स्वभाव उपद्रवी नसल्यामुळे, गल्लीतल्या पोरानोकरांनी त्याला 'गुड नेचर्ड डिक' असं नाव दिलेलं होतं; जाता जाता नमूद करायचं म्हणजे तो अतिशय बांधेसूद व धष्टपुष्ट होता, वयाच्या मानाने उंचापुरा होता, अंगात घोड्याची रग होती, नाकडोळे नीटस होते: तेव्हा अशा मुद्द्याच्या वस्तू असताना, मळकट चेहरा, विंचरण्याची वानवा असल्यामुळे गुंता झालेले केस, आणि ख्रिस्तपूर्व काळातल्या ग्रीक तत्त्ववेत्त्याशी दिसण्याच्या स्पर्धेत कमी पडणार नाही इतका फाटका दीनवाणेपणा, ह्या त्रुटी जर तुमच्या चोखंदळ दृष्टीला खपवून घेता आल्या, तर एकूण त्याचं ध्यान अगदी नाक मुरडूनच पाहिलं पाहिजे अशातलं नव्हतं.

हा पोरगा आम्हाला नेहमी दिसत असे, आणि शुद्ध दयेखेरीज काहीही भाव मनात न आणता आम्ही त्याची फुलं विकत घेत असू; पण यावेळी मात्र त्याची टोपली पुढे करून तो उभा असताना लुईसाला अचानक एक भन्नाट लहर आली; मला काही न सांगता तिने त्याला घरात बोलावलं, आणि पुष्पगुच्छ निरखून पाहात स्वत:साठी एक व माझ्यासाठी एक असे दोन निवडले; इतकं झाल्यानंतर अत्यंत साळसूदपणे त्याला एक क्राउनचं नाणं काढून दिलं, जणू काही इतकी मोड त्याच्याकडे मिळेल अशी तिची खरोखरीच अपेक्षा होती: पण ह्या पोराने डोकं खाजवलं, आणि ही अडचण पुष्कळ आटापिटा करूनही त्याला उच्चारून दाखवता येण्यातली नसल्यामुळे, स्वत:ची तऱ्हा वापरून खाणाखुणा केल्या. हे बघून लुईसा म्हणाली, "पोरा, तू माझ्याबरोबर वर चल, तुझे पैसे मी देते";

आणि त्याचवेळी तिने मला डोळा घालून तिच्याबरोबर यायची खूण केली; तशी मी आले, पण त्याआधी रस्त्यावर उघडणारं दार बंद केलं, जेणेकरून ते दार आणि दुकान यांची सगळी भिस्त आता आमच्या विश्वासू मोलकरणीवर पडली.

वर येताना लुईसा मला कुजबुजत म्हणाली, की अधिक सरस असं बुद्धीचं वरदान निसर्गदेवतेने जर कुणाला नाकारलं असेल तर त्याची भरपाई ती भरभरून शारीरिक वरदान देऊन करते, असा सर्वसाधारण नियम आहे; तो या बैलोबाच्या बाबतीत लागू पडतो का, हे पडताळून पाहण्याची मला काहीशी चाकोरीबाहेरची उत्सुकता वाटू लागली आहे; तेव्हा ती पुरी करण्याच्या कामी तुझी मदत झाली तर फार बरं होईल. इतरांनी सांगितलेलं न ऐकणं हा दुर्गुण माझ्या अंगी कधीच नव्हता; तेव्हा ही अचाटअभंड मस्करी थोपवून धरणं तर बाजूलाच राहो, पण मलाही आता तोच किडा चावला, तिची उत्सुकता व माझी उत्सुकता या दोघींनी संगनमत केलं, आणि तिच्या योजनेत मी स्वत:च्याच मजेखातर हिरीरीने सहभागी झाले. ह्या बेताला अनुसरून आम्ही लुईसाच्या बेडरूममध्ये येताच, ती त्याच्याकडच्या फुलांचे झुबके चिवडून त्याला हसवत असताना मी पुढाकार घेऊन हल्ल्याला सुरुवात केली. एका ढङ्खोबाखातर फार आदरसत्कार करीत बसण्याची विशेष गरज नसल्यामुळे, वेळ न दवडता मी त्याच्याशी जोशात लगट करू लागले; पण तरीही पहिल्याप्रथम मी त्याला हात लावू पाहताच तो आश्चर्यचकित होऊन बावचळून जाऊन त्याने माझ्या पुढाकाराचं स्वागत काहीसं अवघडूनच केलं: किंवा खरंतर तो लाजून मागेमागे जाऊ लागला; पण माझ्या डोळयांनी त्याला बोलावीत, खेळकरपणे त्याचे केस ओढीत, गाल घासत, आणि असा पुष्कळसा बारीकसारीक चावटपणा करीत राहून माझा हेतू पुढे दामटत मी त्याची भीड चेपवली, आणि त्याच्यातल्या निसर्गदत्त प्रेरणांना सुश्राव्य गजर करून जाग आणली; तेव्हा मात्र तो उत्तेजित येऊन स्वत:च्या शरीरातल्या नव्या जाणीवा ऐकू लागला, आणि मी गुदगुल्या करून बाहेर काढलेलं त्याचं निरागस हसणंखिदळणं चालूच असताना, त्याच्या डोळयांत पेटलेली आग गालांवर ओघळून तिथल्या लज्जासुलभ रक्तिम्यात तिची धग मिसळून गेलेली आम्हाला दिसू लागली. पाशवी सुखाची भावना आता ह्या अर्धवटाच्या चेहऱ्यावर स्पष्टपणे लकाकू लागली; पण तरीही प्रसंग फार नवा असल्यामुळे कुठे बघावं आणि कुठे वळावं हे त्याला कळेना; तेव्हा पाळीव लाचारपणे, बावळं हसू पांघरून घेऊन, तंद्री लागलेल्या अवस्थेत खुळचट तोंड अर्धवट उघडं टाकून तो निमूटपणे उभा राहिला, आणि मनाला येईल ते त्याच्याशी करायला मी मोकळी झाले. त्याची टोपली हातातून खाली पडली, तशी लुईसाने ती बाजूला उचलून ठेवली.

आत्तापर्यंत एकापेक्षा जास्त फाटक्यातून हात घालून मी त्याच्या मांड्या शोधून काढून हाताळल्या होत्या, आणि त्याचे कपडे भरडच नव्हे तर धुळकटदेखील असल्यामुळे त्यामानाने तिथली त्वचा मला

जास्त गुळगुळीत व गोरी वाटली (आजूबाजूच्या काळ्या रंगामुळे निग्रोंचे दात जास्त शुभ्र दिसतात तसंच काहीसं); पोषाखाने व समजुतीने तो गरीब असला, तरीदेखील घट्ट, धष्टपुष्ट व तारुण्यरसाने सळसळणारं शरीरमांस, आणि खणखणीत उत्तम बांधणीचे हातपाय, अशा वैयक्तिक साधनसंपत्तीच्या बाबतीत भरपूर श्रीमंत होता. जे संवेदनाशील रोपटं हात लावताच अंग चोरून न घेता उत्साहाने भेटायला पुढे झेपावतं, आणि स्पर्शाखाली वाढून फुलून येतं, तिथपर्यंत माझी बोटं आता पोहोचलेली होती: त्यांनी मला अशी आनंदाची बातमी दिली, की आम्हा दोघींच्या मनात जो शोध लावायचा होता त्याकरिता परिस्थिती परिपक्व आहे, आणि बंधनात मावणार नाही इतकी व्यापक झाल्यामुळे तोडून बाहेर येण्याच्या बेतात आहे. मी त्याच्या कमरेचा पट्टा सोडून काढला, आणि एक चतुर्थांश देखील झाकू न शकणारी सदऱ्याची चिंधोटी बाजूला केली, तेव्हा ह्या खुळ्याचा मानदंड पूर्ण डौलाने दिमाखात ताठ उभा असलेला दिसला: आणि तो तरी कसा! त्याचा वेलविस्तार असा गगनभेदी होता की जगावेगळं काहीतरी पाहण्याची जरी आमची पूर्वतयारी होतीच, तरीदेखील आम्हाला अपेक्षित असलेल्या परिमाणापलीकडे त्याने कुठल्याकुठे सीमोल्लंघन केलेलं होतं; जेणेकरून, चिल्लर माल हाताळण्याची सवय नसलेल्या माझ्यासारखीलाही आश्चर्याचा प्रचंड धक्का बसला.

एकूण निष्कर्ष असा की जत्रेतल्या फिरत्या प्रदर्शनात ठेवण्यासाठी त्याचा फार चांगला उपयोग झाला असता; रंगछटा व आकार पाहता त्याचं अवाढव्य डोकं मेंढीच्या हृदयासारखं दिसत होतं, फासे टाकून खेळायला अडचण होऊ नये इतकी त्याची पाठ रुंदट होती, आणि लांबीदेखील असामान्य कोटीतली होती; चीजवस्तू ठेवण्याची मोठ्या नबाबी थाटाची जी थैली त्याखाली लटकवलेली होती, ती सुरकुतून गोळा झाल्यामुळे तिच्यावर नांगराने पडाव्यात तशा पण फार खोल नसलेल्या चाकोऱ्या दिसत होत्या, आणि तिच्या ऐसपैस आकारामुळे डोळे भरून जाऊन पोरगा बिनडोक असल्याची सिद्धता पूर्ण झालेली होती; पण सारंच काही वाया गेलेलं नव्हतं, कारण वरच्या मजल्यावर त्याची अवस्था अतिशय दुर्दैवी जरी असली, तरीदेखील विशिष्ट ठिकाणी शाही बडेजाव असणं हा त्या अनुषंगाने येणारा बहुमान त्याला भरभरून मिळालेला होता; तेव्हा याच कारणासाठी हलक्या लोकांत अशी म्हण आहे, की 'खुळ्याचं भिरभिरं ते बायलीला प्यारं.' आणि थोडंफार तथ्य यात आहेच, कारण युद्धाप्रमाणे प्रणयातही लांब शस्त्राची सरशी होते. तात्पर्य सांगायचं, तर तिथल्या भूप्रदेशात निसर्गदेवतेने त्याच्यासाठी इतकं केलेलं होतं, की त्याच्या डोक्यासाठी फारसं न केल्यास चालेल अशी सबब तिने स्वत:ला सांगितली असावी.

फक्त दर्शन घेऊन आपलं कुतूहल भागवणं यापलीकडे ही मस्करी ताणण्याचा माझा खरोखरीच इरादा

नव्हता; त्यामुळे हे प्रलोभन सामोरं येऊन जरी एकटक माझ्याकडे पाहात असलं, तरीदेखील दुसरीला माळ लटकवता यावी म्हणून काठी उभारण्यावर मी समाधानी होते: कारण यावेळेपर्यंत लुईसाच्या आसक्त डोळ्यांत तिच्या वासना सहजच वाचता येण्यासारख्या होत्या, आणि बाकी कशासाठीही नसेल इतका ह्या खेळासाठी तिला उत्साह होता; तेव्हा मी समजूतदारपणाची भूमिका घेतली, आणि ह्या साहसातून सहीसलामत पार पडण्याकरिता तिला हरतऱ्हेने प्रोत्साहन दिलं; यापुढे तिला मी असंही सुचवलं, की मी इथेच थांबून खेळ नियमांना धरून होतो की नाही ते पाहीन: निसर्गशक्तीची लाडकी कृती करण्याच्या प्रसंगी ती खुळ्या माणसाला कसकसले हावभाव करायला लावते याचं निरीक्षण करून माझ्यातली ही नव्याने जन्माला आलेली उत्सुकता शमवावी, असाही माझा यामागे गर्भित हेतू होता.

लुईसाची भूक आता चांगलीच पाजळलेली होती; आणि एखादं दुर्मीळ फूल शेणात जरी उमललं असलं तरीही त्यातला मध गोळा करायला कामकरी माशी जशी नाही म्हणत नाही, तशाच मनोवृत्तीची ती असल्यामुळे, मी शरणागती पत्करल्याचा फायदा उठवायला एका पायावर तयार होती. तेव्हा आता अंगच्या कामनांनी आर्जवी आग्रह धरल्यामुळे आणि त्याच जोडीला मीही तिची हिंमत वाढविल्यामुळे, ह्या बैलोबाबरोबर अवयवांची परस्परतुलना करून पाहण्याची जोखीम पत्करायला ती तयार झाली. सुखभोगाचे मूलघटक व्यवस्थित गतिमान होऊ लागावेत आणि त्याचं प्रमुख तंतुवाद्य तारसप्तकापर्यंत पिळलं जावं म्हणून जी काही खिजवाखिजव आम्ही कामी आणली होती, तिच्यामुळे तो मात्र तिचं उद्दिष्ट साध्य करण्याकरिता अत्युच्च कोटीपर्यंत प्रज्वलित झाला होता; परिणामी ही वस्तू ताठरपणे ताणलेल्या अवस्थेत उभी होती, आत कोंडलेल्या रक्तामुळे व उर्मींमुळे टरटरून फुटण्याच्या बेतात होती, आणि तिचा घोसदारपणा...! नाही, मला विसरणं शक्य नाही...

आमंत्रण देत समोरच असलेला तो छानदार कोयंडा लुईसाने आता हातात पकडून धरला; आणि ह्या आज्ञाधारक पोराच्या बलशाली अवजाराला धरून ती पलंगाकडे मागेमागे जाऊ लागताच, वासनेच्या अंकुशाखाली आलेली अगतिकता व दैहिक प्रेरणांची चिथावणी अशा दुहेरी प्रभावाखाली असल्यामुळे त्याने तिची मर्जी हर्षभरित होऊन मान्य केली. पलंगाचा अडथळा जाणवताच ती थांबली, आणि तिच्या आवडीची अधोगती पत्करीत त्यावर पहुडली; हातातलं घट्ट धरून ठेवून, धीम्या गतीने मागे रेलून, पुढच्या सोयीकरिता तिने स्वत:चे कपडे वर उडवले; यानंतर मांड्या रीतसर उघडल्या जाऊन वर नेण्यात येताच, प्रेमाच्या कोषागाराबाहेरचा संपूर्ण देखावा समोर उभा राहिला: गुलाबी ओठांच्या कमानी दरवाजातून आखाड्याकडे नेणारा रस्ता आता इतका स्पष्ट दिसत होता, की कुठे जायचं हे

समज नसलेल्यालाही समजलं असतं. आणि त्याला ते समजलंच; कारण आव्हानाला भिडण्यासाठी लुईसा इरेलाच पेटलेली असल्यामुळे, आणि टिवल्याबावल्या करीत वेळ काढण्याइतका तिला धीरही नसल्यामुळे, मुसळाच्या टोकाला तिने अचूक दिशा दाखवली; आणि आत घुसताना त्याने दिलेल्या ढोसणीची भेट घेऊन तिची मदत करण्याकरिता बकासुरी भुकेने भडकून अशी सामोरी गेली, की उभयपक्षी आक्रस्ताळी कारवायांमुळे फाकून ताणलं जाऊन तिला महाभयानक दुखलं; आणि मी घायाळ झाले आहे, मला हे सहन होत नाही, मी आता मरणार आहे, अशा आशयाचे उद्गार तिने तारस्वरात किंचाळून काढले.

पण एव्हाना उशीर झाला होता: सोसाटा उधळला होता, आणि रेट्याला रस्ता देणं इतकंच काम तिला उरलं होतं; पूर्णपणे अभिलाषेच्या अधिपत्याखाली गेलेल्या ह्या यंत्रमानवाला स्वत:मधल्या पुरुषी ताकदीची व पुरुषी वर्चस्वाची जाणीव आता इतक्या प्रकर्षाने झाली, सुखवेदनेचा दंश त्याला इतका असह्य झाला की तो डोकं गमावून बसला; आणि त्याचे हर्षभरित हातवारे असं काही सैरभैर स्वरूप धारण करू लागले, की ह्या कोवळ्या लुईसाचं काय होणार अशा धास्तीने माझा थरकाप झाला. स्वत:मध्ये तो मावत नव्हता; आणि आत्ताआत्तापर्यंत कसलाही भाव किंवा अर्थ न वागवणारा त्याचा चेहरा, याक्षणी मात्र जी भारदस्त कृती त्याच्याकडून घडत होती, तिच्या जाणीवेने फुलून मोठा झाला होता. तात्पर्य असं की त्याला वेडा समजून वागवण्याची ही वेळ नव्हती. पण गंमतीची गोष्ट म्हणजे, त्याच्या आविर्भावामुळे ज्या मोहक रुद्रावतारात तो दिसू लागला होता, त्यामुळे दबून जाऊन मला त्याच्याविषयी एक प्रकारचा आदर वाटू लागला: त्याच्या डोळ्यांतून आता ठिणग्या उडत होत्या, फुलून आलेल्या उन्मादामुळे तोंडवळ्याला नवा जन्म मिळाला होता, दात करकरा वाजत होते, उफाळून आलेल्या अनावर आवेगातून अख्खी शरीरयष्टी कंपायमान होत होती: पशुजातीमध्ये जी निसर्गदत्त अंत:प्रेरणा प्रजननप्रक्रियेला कारणीभूत असते, ती विक्राळ स्वरूप धारण करून त्याच्या मानगुटीवर बसलेली आहे, हे या साऱ्यातून स्पष्ट उघडकीस येत होतं.

समोर मुसंडी मारून, सगळं रक्तबंबाळ करून, पराण्या टोचून टोचून हाकलेल्या बैलाप्रमाणे बेभान व बेताल होऊन, लुईसाच्या काकळूतीकडे लक्षही न देता, त्याने नाजुक चाकोरी नांगरून काढली; अशा प्रकारचा उन्माद थोपविणं किंवा हद्दीबाहेर रोखून धरणं कशालाही शक्य नसतं: तेव्हा एकदा आत शिरकाव होताच, वाट काढण्याचं उरलेलं काम, फाडाफाडी आणि घुसवाघुसवी करीत, सारे अडथळे हाणून पाडीत, त्याच्या आंधळ्या त्वेषाने लवकरच पुरं केलं. ह्या फाटलेल्या व चिरल्या गेलेल्या जखमी मुलीने आरडाओरडा केला, ती झगडली, मला तिने मदतीची हाक दिली, आणि ह्या तरण्याबांड रासवटाखालून निसटण्याचा व त्याला हलवून फेकून देण्याचा प्रयत्न केला; पण दुर्दैवाने

त्याचा काहीही उपयोग झाला नाही: तिच्या अंगच्या बळावर त्याचा धबडगा हल्ला थोपवणं किंवा त्याची दिशा बदलणं, यापेक्षा तिच्या श्वासाने हिवाळ्यातलं वादळ शमवणं ही गोष्ट अधिक शक्य कोटीतली होती.

आणि वास्तविक पाहता तिच्या प्रयत्नांमागे व झटापटींमागे पद्धतशीर विचार असा काहीच नसल्यामुळे, त्याच्या बाहुपाशांच्या दोरखंडामध्ये ती आणखी लवकर दुमडली जाऊन गुंतून पडायला त्यांमुळे मदतच झाली; परिणामी आता ती वधस्तंभाला जखडली गेलेली होती, आणि मरेपर्यंत झगडत राहणं तिला भाग होतं. ह्या घटकेला तो त्याच्या अंत:प्रेरणांच्या पुरता कह्यात असल्यामुळे, त्याच्या चुंबनांपेक्षा व मधूनमधून तिच्या गालांवर आणि मानेवर केलेल्या उतावळ्या हावरट प्रेमदंशांपेक्षा, हिंस्रपणाला सोबत घेऊन प्रकट होणाऱ्या त्याच्या पाशवी उर्मी अधिक इजा करणाऱ्या होत्या; तरीपण अर्थात ह्या दंशांच्या खुणा नंतर कित्येक दिवस पुसल्या गेलेल्या नव्हत्या. परंतु बिचाऱ्या लुईसाकडून जितपत अपेक्षा करता येण्यासारखी होती, त्यापेक्षा हा प्रकार एकूण पाहता तिने जास्त बरा सहन केला; जरी तिला दुखलं, आणि भयानक दुखलं; तरीसुद्धा आपल्या आद्य कर्तव्यकर्माला जागून तिने सुखाने दुखवून घेतलं, आणि वेदनेतला आनंद वेचला. आता यापुढे मात्र, रौद्रभाव मानगुटीवर बसल्यामुळे चक्रीवादळाप्रमाणे घोंघावत जाणाऱ्या ह्या यंत्रपशूने चहूंबाजूंना धुराचे लोट उठवले, आणि पाचर घुसावी तसा खोलवर शिरत जात अंत्यबिंदूपर्यंत पोहोचून, 'मर्मभेद' ह्या विषयात तिला यानंतर कसलीच भीती किंवा आकांक्षा वाटायची शिल्लक राहू दिली नाही. शेक्सपियरने म्हटल्याप्रमाणे

"Gorg'd with the dearest morsel of the earth"

(सृष्टीतल्या सर्वांत चविष्ट घासाने बकाणा भरला)

अशी लुईसाची गत होऊन, हृदयापर्यंत सुखावून, सुख मावत नाही इतकी सुखावून, त्या अवयवातला प्रत्येक तंतू तुटेपर्यंत ताणला गेला आहे अशा अवस्थेत सुखवेदनेच्या कंटकशय्येवर ती पडून राहिली; आणि त्याचवेळी, ह्या शिगोशीग कोंबाकोंबीला कारणीभूत असणारं उपकरण तिच्या संवेदनांच्या कानाकोपऱ्यात जीव तोडून शोध घेत होतं; पण आता सुखाची मस्ती तिच्यावर अशी चढली, सुखाची नांगी तिला अशी नेमक्या जागी डसली, की तिच्यावरील बेफाम घोडेस्वारामध्ये भिनलेल्या त्वेषाची तिलाही लागण होऊन व त्याच्या बेहोश रानटी कल्लोळात तीही सहभागी होऊन, स्वत:चं मन मागे सोडून देऊन ती आपल्या लाडक्या अवयवात जाऊन बसली; तिथे मात्र सारं काही ओतप्रोत ओहरलेलं

आणि वेगाने कृतिशील होतं: ह्या घटकेला तिचं अस्तित्व फक्त तिथेच असल्याचं आणि संवेदनांच्या बेभान बेधुंदीमध्ये ती पुरेपूर हरवून गेल्याचं, तिच्या लवलवत्या डोळयांतून, खोलवरून पृष्ठभागावर आणलेल्या हर्षभरित निश्वासांतून, आणि ओठांच्या व गालांच्या गडदलेल्या रक्तिम्यातून, अत्यंत बोलकेपणाने व्यक्त होत होतं.

त्या क्षणी जशी ती निव्वळ एक यंत्र होती, तशीच कारागीराच्या रंध्याखालची निव्वळ एक फळी होती; ह्या खुळचटाचा स्वत:च्या हालचालींवर जसा ताबा नव्हता, तसाच तिचाही तिच्यावर नव्हता; आपला झंझावाती हळवेपणा, आणि मारा करण्यासाठी वापरात आणलेल्या पोलादी कांबीचा तडाखा अशा दोन्हींही गोष्टी तिला अंगभरून जाणवतील अशी पुरेपूर काळजी घेत, तो तिला फोडून आत घुसला; त्यांच्या कृतिमग्न मांड्या ह्या द्वंद्वयुद्धाच्या आवेगाने थरथरू लागल्या; आणि आता मात्र सुखभावना उसळून येऊन, फेसाळून उंच उंच चढत जाऊन, हे चक्रीवादळ शांत करणाऱ्या मोत्यांच्या पावसाला घेऊनच खाली आली. केवळ शारीर जाणीवांपुरत्याच उरलेल्या ह्या वेड्याने आनंदाच्या अंतिम क्षणांची सोबत करणारे आनंदाश्रू ढाळले; लोंढा त्याच्यातून बाहेर निसटताच तो हर्षवेदनांनी विव्हळून उठला, आणि ब्रह्मानंदी टाळी लागून त्याने जवळजवळ डरकाळीच फोडली; त्या संवेदना लुईसामध्येही अशा घुसल्या की तिने व्रतबद्धपणे त्याला साथ केली; आणि त्याच क्षणी तिचाही स्फोट होताना तीच प्राचीन लक्षणे पुन्हा दृग्गोचर झाली: एक गोड बेशुद्धी, झटके येऊन अवयवांत भिनून गेलेली चंचल थरथर, आणि प्राण जातानाचा 'ओऽ!' असा उद्गार...

तो उठून बाजूला होताच, सुखाने चिंब भिजलेल्या अवस्थेत, त्याच्या अर्कातून बनविलेली मिठाई पुन्हापुन्हा चाखीत ती पडून राहिली; पण तिच्यातलं त्राण पुरतं गेलेलं होतं, श्वास प्रयत्नपूर्वक होत होता, आणि आनंदाच्या तारांवर अजूनही थरथरणाऱ्या सूक्ष्म कंपनांखेरीज तिला आता जाणीवा उरल्या नव्हत्या; पण इतक्या उत्कटतेने त्या छेडलेल्या होत्या, आणि सृष्टिशक्ती त्यांमुळे इतक्या गहिरेपणाने हेलावली होती, की अशा अनुभवातून गेलेल्या संवेदना लवकर शांत होण्यासारख्या नव्हत्या.

ह्या भोळूबद्दल सांगायचं, तर त्याच्या अजब हत्यारावर वाजविलेली धून यशस्वीरित्या समेवर आल्यामुळे त्याच्या तोंडवळयात व हावभावांत जो थारेपालट झाला, त्यामध्ये खुदकन हसायला लावणारं, किंवा जास्त नेमकं बोलायचं तर हास्य व शोकरसाचा मिलाफ झालेलं असं काहीतरी होतं: त्याच्या नेहमीच्या अर्थशून्य, बथ्थड चेहऱ्यावर आता एका खिन्न, हिरमुसल्या अजागळपणाचा लेप चढून बसला; जरत्कारू, मलूल व शून्यमनस्क होऊन फडफडू लागलेली त्याच्या पौरुषाची चिठ्ठी

मांड्यांच्या अर्ध्या लांबीपर्यंत खाली आलेली असल्यामुळे पतनाच्या क्षणी देखील भीतीदायक वाटत होती; आणि आता ओघानेच आलेल्या मनाच्या व शरीराच्या विषण्णतेमुळे, त्याचे डोळे आळीपाळीने एकतर त्याच्या खच्ची झालेल्या मानदंडाकडे खाली वळू लागले, किंवा दीनपणे लुईसाच्या दिशेने वर उचलले जाऊन, जे काही त्याला सोडून तिच्याकडे गेलेलं होतं व अभावाने त्याला बेचैन करीत होतं, ते तिने परत द्यावं अशी याचना करू लागले.

पण सुखभोगाच्या सर्वसाधारण नियमाला धरून त्याच्यावर कोसळलेली ग्लानी आता हळूहळू विरून जाऊन त्याचा नेहमीचा तरतरीतपणा लवकरच परत आला; त्याची टोपली ही पुन्हा एकदा त्याच्या जिव्हाळ्याची गोष्ट बनली, तेव्हा ती शोधून आणून मी त्याला दिली; लुईसाने त्याचे कपडे पुन्हा पहिल्यासारखे केले; आणि त्याला काहीतरी बक्षीस देऊन ते आपल्याला कसं मिळालं याचं स्पष्टीकरण देण्याचा पेच त्याच्यासमोर टाकण्याऐवजी (आणि इतरांना माग काढण्याची संधी देण्याऐवजी), तिने त्याची सगळी फुलं त्याने सांगितलेल्या दराने विकत घेऊन, त्याला बहुतेक आणखीनच खूष करून टाकला.

याच बुरुजावर तिने पुन्हा कधी धडक मारली का हे मला ठाऊक नाही; पण माझी मनोमन खात्री आहे की नाही. आडरानात सहल करायची ती तिने करून घेतली होती, आणि सुखाच्या अजीर्णामध्ये आपलं कुतूहल ओतप्रोत बुडवून घेतलं होतं; यातून निष्पन्न इतकंच झालं, की ह्या पोराच्या डोक्यात त्या सगळ्या प्रकरणाची फक्त अस्पष्ट आठवण तेवढी राहिल्यामुळे, पुढचे काही दिवस तिला पाहताच तो आनंदून जाऊन त्याच्या वेडगळ पद्धतीने ओळखीचं हसून दाखवीत असे; आणि यापुढे लवकरच, त्याच्या सामग्रीबद्दल वदंता पसरल्यामुळे मोह पडून अशाच दुसऱ्या कुठल्यातरी बाईने त्याला घरात घेतल्यानंतर तिच्या बदल्यात तो लुईसाला विसरून गेला.



# भाग दहावा

ह्या पराक्रमाचे काही वाईट परिणाम होणार नाहीत अशी निश्चिंती होण्याइतपत वेळ जाईपर्यंत मिसेस कोलकडे त्याबद्दल फुशारकी मारायची नाही, इतका सावधपणा आम्ही बाळगला होता; पण यानंतर लुईसा तिथे फार दिवस टिकली नाहीच; एका तरण्या पोरग्यावर जडलेलं हिरवट प्रेम आपल्या शहाणपणाची किंमत देऊन सिद्ध करण्याची संधी चालून येताच, सगळं काही तिच्या निसर्गदत्त स्वभावाप्रमाणेच घडून, अर्धा दिवस आधी सांगून आपल्या सगळया कपडेबाटल्या गुंडाळून ती त्याच्याबरोबर पळून गेली; त्यानंतर माझा व तिचा संपर्क अगदीच तुटला, आणि तिचं पुढे काय झालं हे कळण्याचा काही प्रसंग आला नाही.

पण ती आमच्यातून निघून गेल्यानंतर काही दिवसांतच, मिसेस कोलच्या अकादमीत सतत उठबस असणाऱ्या तिच्या खास मर्जीतल्या दोन देखण्या तरुणांनी, त्यांच्यापैकी एकाच्या मालकीच्या सुंदरशा छोटेखानी बंगलीत मी व एमिली अशा दोघींनी मौजमेळाव्याला यावं म्हणून मिसेस कोलची अनुमती मागितली, आणि ती त्यांना विनासायास मिळाली; टेम्सच्या काठाने सरीच्या बाजूला गेलं की थोड्याशा अंतरावर ही जागा होती. सारा बेत ठरला; तो एक छान झगझगीत उन्हाचा दिवस होता पण उकाडा अंमळ जास्तच होता, तेव्हा आम्ही जेवणखाण करून निघून दुपारी चारच्या सुमाराला भेटायच्या जागी येऊन दाखल झालो; तिथे एका टुमदार पॅव्हिलियनपाशी उतरताच, आमचे हे दोघे राजकुमार, मला व एमिलीला हातात हात धरून आत घेऊन गेले; आणि तेथील निसर्गसौंदर्य, वातावरणातली निरव शांतता व आमच्या ह्या उत्साही तरुण यजमानांचं सौम्य आतिथ्य, यांमुळे साहजिक मन प्रसन्न होऊन, नंतर आम्ही चहा वगैरे प्यायलो.

त्या दोहोंपैकी माझा स्वत:चा खाजगीतला हा त्या घराचा मालक देखील होता, आणि सदर मौजमेळावा शुष्क वाटावा असा त्याचा बिलकुल इरादा नव्हता; तेव्हा चहा होऊन बागेत एक फेरफटका झाल्यानंतर, मिसेस कोलशी त्याची चांगलीच घसट असल्यामुळे जो मोकळेपणा त्याच्या हक्काचाच झालेला होता, त्याचा उपयोग करीत तो आम्हाला म्हणाला की उकाडा फार असल्यामुळे आपण आता सगळे एकत्र आंघोळ करू; नदीतून एक ओहोळ निघतो, तिथे या कामाकरिता मी मुद्दाम एक ऐसपैस आडोसा तयार करून घेतलेला आहे; पॅव्हिलियनमधल्या बाजूच्या दाराने थेट तिथे जाता येतं, आणि त्या ठिकाणी खात्रीने कोणाचाही त्रास न होता व कोणालाही न दिसता आपल्याला मजा करता येईल.

एमिली कशालाच कधी नाही म्हणत नसे, आणि पाण्यात जायला मला नेहमीच उत्साह असे; शिवाय हा प्रस्ताव मांडणाऱ्याला व्यक्तिश: जसा माझा आक्षेप नव्हता, तसाच यामध्ये जी सहज ओळखता येण्यासारखी मजा अभिप्रेत होती तिलाही नव्हता; त्यामुळे सद्यप्रसंगी मिसेस कोलच्या शिकवणीला बट्टा लागणार नाही अशी दक्षता घेऊन, शक्य तितक्या समजूतदार हालचाली करीत आम्ही राजी झालो. हे होताच मात्र, फार वेळ न दवडता सारी मंडळी ताबडतोब पॅव्हिलियनमध्ये परतली, आणि तिथल्या एका दारातून बाहेर येऊन समोर ठोकलेल्या तंबूत शिरली; त्याच्या कनातींमुळे सूर्याच्या प्रखर उन्हापासून व वाऱ्यापावसापासून छान आडोसा तयार झालेला होता, आणि ही जागा अगदी आम्हाला हवी तशीच, जाणाऱ्यायेणाऱ्याला मुळीच न दिसण्यासारखी होती.

तंबूच्या कापडावर घुमटाजवळच्या भागात घनदाट माजलेल्या रानाचा देखावा छापलेला होता, आणि उतरत्या बाजूंवर उंच संगमरवरी खांब दाखवलेले असून त्यांच्या मधली जागा फुलदाण्यांच्या चित्रांनी भरून काढलेली होती; डोळे कुठेही फिरवले तरी सुखावतील, अशा तऱ्हेने याचा एकत्रित परिणाम साधलेला होता. हा तंबू पुष्कळसा पाण्यात उतरला होता; पण भोवतालच्या कोरड्या जमिनीवर सोयिस्करपणे जी बाकं मांडलेली होती, त्यांचा उपयोग कपडे ठेवण्यासाठी, किंवा... थोडक्यात विश्रांती घेण्याऐवजी इतरही गोष्टींसाठी करता येण्यासारखा होता. बाजूच्या एका टेबलावर मिठाई, जॅम्स आणि ताव मारण्यासाठी इतर बऱ्याच वस्तू होत्या, पाण्यामुळे हुडहुडी भरली किंवा इतर कुठल्या कारणामुळे चक्कर आली, तर तात्काळ बरं वाटावं याकरिता वाईनच्या बाटल्या व सरबतं इत्यादि ठेवलेली होती; खरं तर माझा जोडीदार मेजवान्या या प्रांतातला मुरब्बी असल्यामुळे एखाद्या रोमन सम्राटासाठी भोगवस्तू पुरवठा मुख्याधिकारी होऊ शकला असता (अर्थात सम्राटाच्या अभिरुचीला कदाचित तुम्ही नाक मुरडाल हा भाग अलाहिदा); तेव्हा सारांश असा की चैनीत व आरामात जिच्यामुळे भर पडेल, अशी कुठलीही वस्तू त्याने आणायची म्हणून शिल्लक ठेवली नव्हती.

खुणावून बोलावणाऱ्या ह्या जागी येऊन पोहोचताच आम्ही इकडेतिकडे पाहून घेतलं, आणि खाजगीपणा मिळावा याकरिता सर्व तरतूद होताच कपडे काढण्याचा बूट निघाला: आता ह्या दोघाही तरुणांनी आपापल्या जोडीदारिणीवरचे कपडे उतरवण्याचं काम तडकाफडकी पुरं करून, जी गुपितं सहसा कपड्यांमागे दडलेली असतात त्यांची आम्हाला धडधडीत कबुली द्यायला लावली, पण अर्थात ती उघडकीस येण्यामुळे ह्या सामन्यात स्त्रीपक्षाचा काही तोटा होणार नव्हता. ही गोष्ट खरी, की आमच्यातल्या सर्वांत चित्तवेधक अवयवांकडे आमचे हात आपसूकच वळले आणि वनराई वाढलेल्या टेकाडापासून खालचा भाग निदान सुरवातीला तरी त्यांनी झाकोळून टाकला; पण ह्या दोघांच्या

इच्छेनुसार ते आम्ही बाजूला घेतले, आणि कपडे उतरवण्याकरिता त्यांना मदत करून त्यांच्या सेवेची परतफेड करण्याच्या कामी आणले; ही प्रक्रिया चालू असताना जो पुष्कळसा बारीकसारीक चावटपणा करण्यात आला, तो तुम्हाला कल्पनेने सहज डोळ्यांसमोर आणता येईल.

आता माझ्या मनसबदाराने त्याच्या आतल्या सदऱ्यापर्यंत कपडे उतरवले होते, आणि त्याने आळसटून माझ्यावर कलंडताना हसतहसत सदऱ्याच्या पुढल्या पट्टीकडे बोट दाखवताच मला असं दिसलं, की तिच्या मागील बाजूस होणाऱ्या नाठाळ दचकादचकीप्रमाणे ती वरखाली होते आहे किंवा फुगून येते आहे; पण हा प्रश्न लवकरच सोडवण्यात आला; आणि आता सदरा काढूनच टाकून, कामदेवाप्रमाणे संपूर्ण नग्न होऊन त्याने ती वस्तू मला अशा खड्या सलामीत असलेली दाखवली की ताबडतोब आराम पडावा म्हणून तो आत्ताच माझ्यावर प्रयोजन करतो की काय असं मला वाटलं; पण तिचा डौलदार आकार मला प्रज्वलित करण्यासाठी जरी पुरेसा होता, तरीदेखील निसर्गावस्थेत मला लागणारी आजूबाजूची चावरी हवा, आणि पहिल्यांदा पाण्यात डुंबून घेण्याची इच्छा यामुळे ही कृती थोपवून धरणंच इष्ट समजून, रहस्य थोडंसं ताणलं तर सुखाची धार आणखी वाढेल अशी टिपणी करून मी त्याला नामोहरम केलं.

तेव्हा आता मार्ग दाखवीत व आमच्या सहचाऱ्यांना संयमाचा दाखला घालून देत (कारण त्याचा ते अनादर करताहेत अशी चिह्नं दिसू लागली होती), आम्ही हातात हात घालून प्रवाहात शिरलो आणि तो आमच्या मानेपर्यंत येईल इतके पुढे आलो; तेव्हा सुख वाटावं इतपतच गार असलेल्या पाण्यामुळे वातावरणातल्या उष्म्यापासून मला फार छानदार दिलासा मिळाला, तरतरी आली, बरं वाटू लागलं, आणि हळूहळू कामसुखाच्या संवेदनांकरिता माझं शरीर अधिक आतुर व अधिक तल्लख होऊ लागलं. पाणी इकडेतिकडे उडवीत मी अंग धुऊन घेतलं, आणि एमिलीच्या जोडीदाराचं काय करायचं हा निर्णय तिच्या विवेकबुद्धीवर सोडून देऊन, माझ्या जोडीदाराबरोबर टवाळक्या केल्या. डोक्याच्या वरपर्यंत मला बुचकळी मारायला लावण्यावर समाधान न होऊन माझा जोडीदार माझ्यावर पाणी मारत, त्याला सुचेल ती किरकोळ मस्करी करीत मला डिवचत राहिला, आणि याबाबतीत त्याच्या ऋणात आपण राहू नये म्हणून मीही प्रयत्नशील राहिले.

थोडक्यात असं की मौजेची गाडी आम्ही अगदी सुसाट सोडली; आणि आता माझा गळा, स्तन, पोट, मांड्या इत्यादि कल्पनाशक्तीचे फार आवडते अवयव चोळून धुवून काढण्याच्या मिषाने आपल्या हातांचा श्रमपरिहार केल्याखेरीज कशानेच त्याचं समाधान होईना; बेंबीपर्यंत पाण्यात आम्ही दोघे उभे असल्यामुळे माझ्या स्त्रीत्वाचं व्यवच्छेदक लक्षण असलेली चीर हाताळून तिच्याशी चाळा

करताना त्याला विशेष अडथळा आला नाही, आणि ती होतीही अशी चिरेबंदी की उघडून मोठी करून पाहण्याचा वृथा प्रयत्न करणाऱ्या त्याच्या बोटांमुळे आत पाणी कमी व धगच अधिक शिरली, असं अलंकारिक भाषा न वापरता मी म्हणू शकत्ये.

याचवेळेला त्याने मला त्याच्या उपकरणाचा स्पर्श करवून दिला, आणि त्याला पीळ असा बसला होता की पाण्यात देखील ते चालू शकलं असतं; तेव्हा तो माझ्या गळयाभोवती एक हात लपेटून आजूबाजूच्या द्रवामुळे वाढलेल्या अडचणीवर मात करण्याचा प्रयत्न करू लागला, आणि आत शिरू पाहणाऱ्या यंत्रामुळे माझ्या खालच्या ओठांना सुखद ताण बसलेला जाणवू लागावा इतपत त्याची प्रगती झालीही होती; पण एकतर हा आडनिडा आनंदमार्ग मला आवडला नव्हता, आणि त्याला अगदी न राहवून अडवण्यामागचा माझा दुसरा हेतू असा होता, की उभयतांनी मिळून पाहावा असा एक सुखोत्सव एमिली व तिचा जोडीदार यांच्यात मोठ्या जोषाने सुरू झालेला होता; पाण्यातल्या बालिश थट्टामस्करीत मन रमेनासं होऊन तो आपल्या वनपरीला काठावरच्या एका बाकाकडे घेऊन गेला होता, आणि थट्टा कोणती व मन लावून करायच्या बाबी कोणत्या, ह्या दोहोंतला फरक तिला तिथे आवर्जून समजावून देण्याच्या बेतात होता.

त्याने तिला आपल्या मांडीवर बसवलेलं होतं; आणि चमकणाऱ्या जलबिंदूंमुळे जिचा झगमगाट द्विगुणित झाला आहे अशा तिच्या गुळगुळीत, लकाकत्या, हिमशुभ्र त्वचेवर एक हात घसरवीत नेत असताना कल्पनेच्या प्रांतातली जिवंत हस्तिदंताच्या स्पर्शाची अनुभूती त्याच्याकरिता प्रत्यक्षात येत होती; पण इतकंच नव्हे, तर हातांना ज्यांचं प्रणयाराधन करावंसं वाटेल अशा माणकांची बोंडं असलेल्या गोलाकार स्तनांमुळे हा स्पर्शानुभव सुखाच्या परमोच्च श्रेणीपर्यंत पोहोचला होता; त्याचवेळी तिच्या मांड्यांमध्ये उंच उभ्या असलेल्या आणि विनाविलंब आत येण्यासाठी लसलसणाऱ्या आपल्या भारदस्त अवजाराला जागा करण्यासाठी त्याचा दुसरा हात तिच्याजवळचं निसर्गाचं गोड गुपित मोठ्या मिठ्ठासपणे चाचपडून पाहात होता; मात्र तरीदेखील, रुसवेफुगवे करण्याची लहर आलेली कोवळी एमिली, ज्या सुखाकरिता तिचा श्वास खोळंबला होता त्यालाच लटका नकार देत, ते लांबणीवर टाकू पाहात होती खरी, पण तिने हा बनाव इतक्या लोभस खट्याळपणे चालविला होता की जेणेकरून त्या सुखाची धार दसपट तीक्ष्ण व्हावी; मरणासन्न मांद्यभावाने ओथंबलेल्या तिच्या डोळयांमध्ये छद्मी नकार व अनावर झालेल्या अभिलाषा एकाच वेळी वाचता येत होत्या, आणि तिच्यातल्या गोडव्याला नखरेलपणाची अशी तोंड चाळवणारी फोडणी मिळालेली होती, व आपल्या जोडीदाराला थोपविताना तिने धारण केलेल्या विभ्रमांचं आकर्षण इतकं प्रबळ होतं, की त्याने तिच्यावर केलेल्या चुंबनांच्या वर्षावामागच्या बेफाम अधिरेपणाला आता दुप्पट जोर आला: यातून

ती स्वत:चा बचाव करण्याचा आव आणीत असली व कांगावे जरी करीत असली, तरीदेखील त्या पाताळयंत्री चावट मुलीने ह्या चुंबनांची परतफेड करण्याची बेरकी तजवीज अशा तऱ्हेने केली, की चोरून घेतल्याची चव त्यांच्यात मिसळल्यामुळे ती अधिक चविष्ट लागली यात संशय नाही.

सुख घेणं हा जो निसर्गदेवतेचा मुख्य उद्देश, तो साध्य करण्याच्या हेतूने तिनेच अंगी रुजविलेली, सोबत्याच्या इच्छेप्रमाणे करण्याची कला इतकीच काय ती एमिलीपाशी होती; तेव्हा तिने नखरा केला पण नेम धरून केला; कारण तिची झटापट, ओढाताण व त्याच्या मिठीतून सुटण्याची धडपड, हे सारं खरंखुरं न करण्याइतकी शहाणी ती निश्चितच होती, आणि त्या हातापाईमागचा तिचा अंतस्थ हेतू हाच होता की शरीरावर अधिकाधिक ठिकाणी आपल्या जोडीदाराचा स्पर्श व्हावा, व एका वेलीच्या दोन उपशाखांप्रमाणे परस्परांना सगळीकडून बिलगून खुपसून ठेवणाऱ्या घड्या अधिकच दाट व्हाव्यात; तेव्हा याचा परिणाम म्हणून, खुळचटापासून अंग सोडवून घेण्यासाठी लुईसा जिवाच्या कराराने झगडत असतानाचं चित्र, ह्या ठिकाणी वेगळ्या कारणांमुळे पुन्हा उमटलेलं होतं.

दरम्यान गार पाण्यात डुंबल्यामुळे त्यांच्या त्वचेवर लकाकी आलेली होती, एक मुसमुसलेला रक्तिमा हलकेच सर्वदूर पसरला होता; आणि दोघेही एकसारखेच गुळगुळीत गोरेशुभ्र असल्यामुळे, त्यांचे अवयव प्रेमकल्लोळाने एकमेकांत गुंफले जाऊन मोठा गोड गोंधळ निर्माण झालेला असताना, दोहोंपैकी जे अधिक सशक्तलिंग, त्याच्या मालकीचे स्नायू जर जास्त ठसठशीत व धष्टपुष्ट नसते तर कोणता कुणाचा हे सांगणं बरीक मुश्किलच झालं असतं. पण थोड्याच अवधीत ह्या गड्याने तिच्यात पुरता शिरकाव करून सर्व बाजूंनी खरोखरीची प्रेमगाठ मारून टाकली होती, आणि आता मात्र बारीकसारीक कलाकुसर करीत घेतलेले लुटूपुटूचे आढेवेढे व खोटेनाटे नाटकनखरे ह्या सगळ्यालाच निरोप देण्यात आला. तडकाफडकी जोरकस दट्ट्या लागून, कोणतेही विभ्रम वापरण्याची सोय राहू नये अशी तिची अवस्था होऊन गेली; आणि अर्थात जेव्हा निसर्गप्रेरणेने त्या हल्लेखोराशी संगनमत करून तिच्या राजधानीच्या मर्मस्थळी धडक मारली, साऱ्या नगरीत हल्लकल्लोळ उडवून दिला, आणि संपूर्ण यश मिळवून गर्वाने फुगून गेलेल्या अरिहंत सम्राटापुढे तिला सपशेल लोळण घ्यायला लावली, तेव्हा कुठल्या विभ्रमांचा काय निभाव लागणार होता? पण ह्या सम्राटाला, काही क्षणांतच, खंडणी देणारा मांडलिक व्हावं लागलं: कारण हातोहात जुंपलेली रणधुमाळी अधिकाधिक घनघोर होऊ लागून एमिलीने त्याच्यावर शेवटी निसर्गाचं कर्ज फेडण्याची नामुष्कीची वेळ आणली; परंतु तिच्याकरवी ते वसूल होतं न होतं तोच, आपल्या प्रतिस्पर्ध्याला पायाशी लोळण घ्यायला लावीत असतानाच ज्याला स्वत:लाही प्राणघातक जखम झाली आहे अशा द्वंद्वयोद्ध्याप्रमाणे, विजयाचा आनंद फारसा चाखायला न मिळताच ती गोळी लागून घायाळ होऊन पडली; आणि मोठ्या आवाजात एक

प्राणांतिक सुस्कारा सोडून, डोळे मिटून, सारे अवयव लांब ताणून व सारी अंगयष्टी लुळी पाडून, व्हायचं ते होऊन गेल्याच्या स्पष्ट खुणा तिने आमच्यापर्यंत पोहोचविल्या.

इतका सारा वेळ अतिशय शांतपणे, विचलित न होता ही धुमश्चक्री पाहात मी पाण्यात उभी होते असं मात्र नाही, व तिचा शेवट होताच हलकेच माझ्या जोडीदारावर रेलून मी त्याला डोळ्यांनी विचारलं की ह्या प्रकाराबद्दल तुझं काय मत आहे? पण शब्दांनी किंवा दृष्टिक्षेपाने नव्हे तर कृती करून माझं समाधान करण्याची त्याची इच्छा असल्यामुळे, आम्ही पाणी कापत किनाऱ्यापर्यंत येत असताना त्याने आपला प्रेमदंड इतका औत्सुक्याने उभा असलेला मला दाखवला, की आधी जवळच्यांना मदत करावी या भावनेने आम्हा दोघांची सुटका करायला जरी मी उद्युक्त झाले नसते, तरीदेखील ह्या पोराला इतका तुटेपर्यंत ताणू देणं हे फार निर्दयीपणाचं झालं असतं; आणि तेही उपाय इतका साधा व सहज करण्यासारखा असताना. त्याप्रमाणे आम्ही एक बाक निवडला, तेव्हा एमिली आणि समुद्री आयुष्याकरिता बनवल्यासारखा वाटणारा तिचा जोडीदार हे दोघे टेबलापाशी उभे राहून आमचा प्रवास सुखकर व्हावा अशा सदिच्छेपोटी वाईन ढोसत होते; तो म्हणाला की तुमचा नांगर वर आलेला आहे, पुढे कालव्यात जोरदार वारा वाहतो आहे, आणि मालही गच्च भरलेला आहे; त्याप्रमाणे खरोखरीच, दर्यापार होऊन जुन्या बंदरातल्या गोदामात तो माल उतरवायला आम्हाला फार वेळ लागला नाही, पण असल्या घडामोडींमध्ये वैविध्याला फारसा वाव नसल्यामुळे, तपशील सांगून मी तुमचा अंत पाहात नाही.

ते काही असो, पण अलंकारलेल्या भाषाशैलीचं कदाचित अध्येमध्ये अवाजवी प्रदर्शन केल्याबद्दल मी तुमची माफी मागायला हवी याची मला टोच आहे, तेव्हा तुमची अनुमती असल्यास ह्या ठिकाणी ती बोलून दाखवित्ये; अर्थात आपला हा विषय वास्तविक पाहता केवळ काव्याच्या प्रांतातलाच नव्हें तर अंतर्बाह्य काव्यच असल्यामुळे, आणि जनरीतीची व कानांची बूज राखण्याकरिता रोखठोक शब्दप्रयोगांना जरी त्यामध्ये मज्जाव असला, तरीदेखील कल्पनासृष्टीच्या फुलोऱ्यांचा आणि लडिवाळ उत्प्रेक्षांचा कारखानाच असल्यामुळे, अशी शैली जर कुठे खपून जायची तर इथेच जाईल.

पुन्हा माझ्या कथानकाकडे वळत्ये. जितका वेळ आम्ही तिथे होतो, त्यामध्ये सर्वसाधारणपणे एकच सूर लावून ठेवून, जमतील तितकी आवर्तने घेत (अर्थात अशा पुनरावृत्तीत भलतीच मौज असल्याची जाणीव आपल्याला निसर्गतःच असते), आणि सुखप्रदेशातल्या वेगवेगळ्या प्रांतांत हलक्या पावलांनी भटकंती करीत राहात, एकही क्षण आम्ही आनंदाशिवाय जाऊ दिला नाही; शेवटी रात्र बरीच होऊन गेल्यानंतर घरी परतताना ह्या दोघा तरुणांनी आमची सोबत केली, आणि आमच्या सहवासाबद्दल

उदारहस्ते आभार व्यक्त करून, मिसेस कोलजवळ आम्हाला सुखरूप सुपूर्द केलं.

एका अर्थाने एमिलीची ही अखेरची मोहीम होती, कारण यानंतर जेमतेम आठवडाभरातच तिच्या आईवडिलांना तिचा पत्ता लागला (हे योगायोगानेच झालं, पण विस्ताराने सांगण्याइतकी ही कथा महत्त्वाची नाही); त्यांची सांपत्तिक स्थिती बरी होती, पण आपल्या मुलाच्या चैनबाजीचे फाजील कोड पुरवल्यामुळे एक उलथापालथ घडून तो त्यांना सोडून गेला होता, आणि त्याला झुकतं माप दिल्याबद्दल त्यांना चांगलीच अद्दल घडली होती; तेव्हा आतापर्यंत इतरत्र अडकलेला त्यांच्या मायेचा झरा, अमानुष वागून वाऱ्यावर सोडून दिल्यामुळे बेपत्ता झालेल्या ह्या मुलीकडे वेगाने वळला; पण वास्तविक परिस्थिती अशी होती, की तिची चौकशी करण्यात जर त्यांनी हेळसांड केली नसती तर खूप पूर्वीच ती त्यांना सापडली असती. ती भेटल्यामुळे त्यांना इतका पराकाष्ठेचा आनंद झाला की शहानिशा करून वस्तुस्थिती तपासून पाहण्याची त्यांनी फारच कमी तसदी घेतली असावी असा माझा कयास आहे; पोक्त आणि सभ्य अशा मिसेस कोलने मनाला येईल ती गप्पा त्यांना खपवली, त्यांनी ती राजीखुषीने जशीच्या तशी गिळून टाकली, आणि गावी परतल्यानंतर आभारप्रदर्शन म्हणून लगेच तिला एक घवघवीत बक्षिसीदेखील पाठवून दिली.

पण इतकी गोड मुलगी आमच्या कुटुंबातून निघून गेल्यानंतर तशीच दुसरी मिळवणं तितकंसं सोपं नव्हतं: ती दिसायला सुंदर तर होतीच, पण तिच्यासारख्या काहीजणी अशा भाबड्या व निमूट स्वभावाच्या असतात की त्यांच्याबद्दल फारसा आदर जरी नाही वाटला तरीदेखील जिव्हाळा वाटल्याखेरीज राहात नाही, आणि ही भरपाई माझ्या मते कमी नाही. सरळमार्गी स्वभाव व प्रथमदर्शनी झालेलं मत कायम होऊन जावं असा बुद्धीचा मंदपणा, यांमुळे तिच्यातले सगळे दोष आलेले होते; पण आपल्याला कुणीतरी वेसण बांधून चालवलं पाहिजे हे कळण्याइतपत हुशारी तिच्यापाशी होती, व जो कोणी तिच्या हिताचा विचार करून तिला रस्ता दाखवण्याची तसदी घेईल अशा माणसाबद्दल तिला फार कृतज्ञता वाटे. थोडंसं चुचकारलं तर तिला केवळ समंजसच नव्हे तर मोठी गुणाची बायको बनवणं शक्य होतं: कारण प्रसंग तसे आले नसते, दाखले समोर नसते, किंवा स्वत:पेक्षा भोवतालच्या परिस्थितीवर ती जास्त अवलंबून राहिली नसती, तर बहुतेक तिने वाकडा मार्ग निवडला नसता किंवा तो तिच्या नशिबीही आला नसता.

ती नंतर जशा प्रकारे वागली त्यामुळे ह्या मताला पुष्टीच मिळाली: कारण तिचा नवरा होण्याकरिताच जन्माला आलेला तिच्याच पायरीचा एक शेजारी राहणारा पोरगा होता; त्याला अक्कल आणि शिस्त होती, व समुद्रप्रवासात गायब झालेल्या एका खलाशाची विधवा म्हणून त्याने हिला पदरात

घेतल्यानंतर (कारण हिचा पूर्वीचा तसा एक प्रियकर होता, आणि त्याचं नाव हिने नवरा म्हणून दडपून दिलेलं होतं), जणू काही आपल्या बालसुलभ निरागसतेपासून कधीही व किंचितही ढळली नसावी, अशा प्रकारे ती मोठ्या नेटाने व नेमाने आपल्या घरगुती आयुष्याच्या रामरगाड्यात सहजगत्या रमून गेली.

दिवसांमासी एकेक सैनिक परागंदा झाल्यामुळे मिसेस कोलची पलटण इतकी रोडावली होती, की एकच पिल्लू असलेल्या कोंबडीसारखी फक्त मी तिच्याजवळ उरले होते; आणि तिने पुन्हा सैन्यभरती करावी असा फार कळकळीचा आग्रह जरी झाला तरी हळूहळू ती आता थकू लागली होती, शिवाय कुठल्याच उपायाला दाद न देणारी कंबरेची चिवट सांधेदुखी जडल्यामुळे कंटाळली देखील होती; त्यामुळे आपला व्यवसाय गुंडाळून, बऱ्यापैकी साठलेल्या पुंजीसह गावी निवृत्त होण्याचा तिचा निर्णय झाला; तेव्हा मीही असं पक्कं ठरवलं, की आणखी थोडंसं जग पाहून झाल्यानंतर व आत्तापर्यंत जमलेल्या गंगाजळीत भर टाकून कुणाचा आधार न घेता स्वतंत्रपणे जगता येईल अशी तजवीज झाल्यानंतर तिच्याजवळ जाऊन राहायचं; कारण मिसेस कोलच्या सल्ल्यामुळे हा विचार सदोदित समोर ठेवण्याइतकी आता मी शहाणी झालेली होते.

अशा रीतीने, नेहमी सुज्ञपणाचा मार्ग दाखवणाऱ्या माझ्या भरवशाच्या सोबतिणीला मी मुकले, आणि तिच्या व्यवसायात पांढऱ्या कावळ्याइतक्या दुर्मिळ असलेल्या मालकिणीला लंडनमधले आनंदयोगी मुकले. ती आपल्या गिऱ्हाईकांना कधीही नागवीत नसे, व त्यांची अभिरुची काय आहे ह्याची नेहमी आवर्जून वास्तपुस्त करीत असे; याखेरीज तिच्या विद्यार्थिनींकडून गैरमार्गाने पैसे उकळून त्यांना कधी छळत नसे, किंवा त्यांनी खडक फोडून केलेली मिळकत (तिचा शब्दप्रयोग) कात्रीखाली आणून हडप करीत नसे. कुमारिका मुलींना नादी लावण्याला तिचा कडाडून विरोध होता, आणि ज्या हतभागी मुलींचं कौमार्य आधीच हरवलेलं असल्यामुळे कीव करण्यासारखी ज्यांची परिस्थिती होती, अशांपैकीच कोणी तिला चालत असे; त्यांतही तिच्या स्वभावाशी जुळणाऱ्या मुली निवडून, त्यांना आपल्या छत्राखाली घेऊन, रस्त्यावर पडल्या असत्या तर हाल भोगावे लागून ससेहोलपट होण्याचा जो धोका होता त्यापासून त्यांना ती संरक्षण देत असे; आणि यापुढे त्यांच्याकरिता भलंबुरं जे काही ती करीत असे, ते मी वर सांगितलंच आहे.

तेव्हा आपले देण्याघेण्याचे सर्व व्यवहार पुरे करून, तिने अतिशय भावनाविवश होऊन माझा निरोप घेतला; आणि मला फार मोलाच्या सूचना देऊन, आईच्या मायेने मला स्वत:ची काळजी घ्यायला सांगून ती प्रवासाला निघाली. माझ्याकरिता ती इतकी जवळची होऊन गेली होती, की मला बरोबर

घेतल्याविना तिला जाऊ दिल्याबद्दल अनेक दिवस मी स्वत:ला बोल लावीत राहिले; पण प्रारब्धाच्या मनात माझ्यासाठी दुसराच बेत होता असं नंतर स्पष्ट झालं.

मिसेस कोलपासून वेगळी झाल्यानंतर मी मेरीबोनमध्ये एक छानदार घर घेतलं होतं, ते लहानसं असल्यामुळे भाडंही कमी होतं व त्याची व्यवस्था पाहणंही सोपं होतं; तिथे मी साधं पण नीटनेटकं सामानसुमान आणून लावलं. मिसेस कोलचा सल्ला मनावर घेतल्यामुळे साठलेले आठशे पाउंड, आणि याखेरीज काही कपडे, दागिने व चांदीची भांडी, इतक्या पुंजीच्या भरवशावर कित्येक दिवस थैली खुळखुळत ठेवता आली असती; आणि म्हणूनच, इथून पुढच्या आयुष्यात कायकाय घडामोडी होतात याची मनाचं स्थैर्य न गमावता वाट पाहात राहणं मला शक्य होणार होतं. जिचा नवरा समुद्रप्रवासावर गेलेला आहे अशी एक चांगल्या घरची बाई ही नवी भूमिका मी पांघरली, आणि वागण्याच्या विशिष्ट सीमारेषा स्वत:करिता आखून घेतल्या; जेणेकरून घरंदाजपणा व गुप्तपणा यांच्या मर्यादांमध्ये कटाक्षाने राहूनही, सुख अथवा संपत्ती मिळवण्याच्या दिशेने स्वत:च्या इच्छांचा पाठपुरावा करण्याकरिता पुष्कळसं स्वातंत्र्य माझ्यापाशी शिल्लक उरलं: माझ्या ह्या चालीमध्ये तुम्हाला मिसेस कोलची खरी विद्यार्थिनी दिसल्याखेरीज राहणार नाही.

पण मी माझ्या नव्या घरी स्थिरस्थावर होते न होते त्यानंतर काही दिवसांतच, एकदा सकाळी लवकर ताजी हवा खाण्यासाठी मी माळरानावर फिरायला गेले होते; सोबतीला नव्यानेच नोकरीवर ठेवलेली मोलकरीण होती; आणि झाडांमधून आम्ही निरुद्देश रमतगमत निघालो असताना जोराने खोकल्याची ढास ऐकू येऊन दचकलो, तेव्हा तिकडे मान वळवताच भारी कपडे घातलेला एक वयस्क माणूस दिसला; परिस्थिती अशी होती, की एकदम अनावर उबळ आल्यामुळे तिला वाट करून देण्याकरिता एका झाडाच्या बुंध्याजवळ त्याला बसून राहावं लागलं होतं; त्याचा चेहरा काळाठिक्कर पडला होता, आणि फार त्रास होऊन तो गुदमरतो आहेसं वाटत होतं: मी जितकी घाबरून गेले तितकीच मला कणव येऊन लगेच त्याच्या मदतीला धावले, आणि अशा प्रसंगी नेहमी काय करतात हे पूर्वी पाहिलं असल्यामुळे त्याचा नेकटाय सैल करून त्याच्या पाठीवर थापट्या मारल्या; आता याचा काही उपयोग झाला म्हणून की उबळ यायची ती येऊन गेली होती म्हणून ते माहित नाही, पण त्याची ढास पूर्ण शमली, पुन्हा त्याला व्यवस्थित चालताबोलता येऊ लागलं, आणि जणू मी त्याचा जीव वाचवला असावा इतक्या आवर्जून त्याने माझे आभार मानले. यातून आपसूकच बोलणं निघालं, आणि आपण कुठे राहतो हे त्याने मला सांगितलं; मी त्याला जिथे भेटले तिथून त्याचं घर पुष्कळच लांब होतं, आणि तोही सकाळी फिरायला निघालेला असताना नकळत भरकटत इथे येऊन पोहोचला होता.

ह्या लहानशा अपघाती भेटीमुळे आमची ओळख होऊन अधिक परिचयांती मला कळलं ते असं, की हा साठेक वर्षांचा, आयुष्यभर निष्ठेने अविवाहित राहिलेला गृहस्थ होता; पण स्वतःच्या क्षमतेवर ताण येईपर्यंत वासनांना शिरजोर होऊ देऊन प्रकृतीचा चुथडा करण्याची चूक त्याने टाळलेली असल्यामुळे त्याची त्वचा इतकी सतेज व टवटवीत राहिलेली होती की तो जेमतेम पंचेचाळिशीचा वाटत असे. हलक्या वर्गातून आलेले, नाकासमोर चालणारे व आयुष्यात फारसं काही न साधलेले असे आईबाप त्याच्या नशिबी होते, आणि त्याला जितपत तपास करता आला त्यातून कळलेल्या माहितीनुसार त्यांनी आपल्या पोराला अनाथ म्हणून तान्हेपणीच पॅरिश चर्चवर सोपवून दिलेलं होतं; त्यानंतर एका धर्मादाय शाळेत शिकून, आपल्या कष्टाळूपणाच्या व प्रामाणिकपणाच्या जोरावर त्याला एका व्यापारी कंपनीच्या हिशेब विभागात नोकरी लागली, तिथून स्पेनमध्ये कादिस शहरी कामावर पाठवल्यानंतर त्याने आपली अक्कल आणि हुन्नर वापरून प्रचंड पैसा मिळवला; पण तो घेऊन मायदेशी परततात्तच, त्याचा जन्मच मुळात कुणाला काही ठाऊक नाही अशा परिस्थितीतला असल्यामुळे स्वतःच्या एकाही नातेवाईकाचा आगापिछा त्याला सापडला नाही. तेव्हा कामातून निवृत्ती पत्करून मजेने दिवस घालवावेत अशी इच्छा होऊन, गुप्तपणे बाई ठेवावी त्याप्रमाणे आपल्या श्रीमंतीचं थोडंही प्रदर्शन न करता तो तिचा ऐषारामी उपभोग घेत होता; आपली सांपत्तिक स्थिती लोकांच्या डोळ्यावर न येता लपून राहील अशी अभ्यासपूर्वक योजना त्याने केलेली होती, आणि जगरहाटीची पक्की समज ठेवून तिच्याकडे खिडकीतून खाली पाहात असताना, स्वतः मात्र स्वेच्छेने अंधारात बसून नामानिराळा राहिलेला होता.

पण ज्याला मी कधीही विसरायची नाही अशा ह्या अतिशय खास मित्राबरोबर माझा परिचय कसकसा वाढत गेला, हे सारं तुम्हाला तपशीलवार लिहिण्यातला आनंद घेण्याकरिता मी नंतर एक वेगळं पत्रच खर्ची घालणार आहे; तेव्हा बांधकाम करताना सांध्याला चुना वापरावा त्याप्रमाणे माझ्या वैयक्तिक इतिहासाची संगती राखण्याकरिता पुरेल, आणि माझ्यासारख्या उष्ण रक्ताच्या व आयुष्य चवीने जगणाऱ्या मुलीला साठीचा पुरुष इतका हवाहवासा वाटला याबद्दलचं तुमचं आश्चर्य पुसून जाईल, इतपत बाबी ह्या पत्रामध्ये जाताजाता सांगून भागवत्ये.

सुरवातीला निरागस असलेलं आमचं साहचर्य नकळत बदलून कोणकोणत्या पायऱ्यांनी प्लेटोत्तर पातळीपर्यंत जाऊन पोहोचलं याचं वर्णन अधिक विस्ताराने करायच्या कथाकथनासाठी मी राखून ठेवत्ये; पण अर्थात माझा स्वभाव पाहता ही प्रगती साहजिक आहे, आणि याहीपेक्षा म्हणजे विद्युतशास्त्राचं तत्त्व असं आहे की दोन भिन्नलिंगी व्यक्ती एकत्र आल्यानंतर ठिणगी पडायची बहुधा राहात नाही. इथे मी इतकंच म्हणेन, की स्त्रीजातीविषयीचा त्याचा हळुवारपणा उतारवयाने नासवून

टाकला नव्हता, तशीच सुख देण्याची शक्तीही चोरून नेली नव्हती; आणि यामागचं स्पष्टीकरण असं, की तरुणाईच्या मोहिनी घालणाऱ्या आकर्षणांमध्ये जिथे तो कमी पडे, तिथे त्याची भरपाई अनुभवाच्या पुंजीतून, स्वभावातल्या गोडव्यातून, आणि मुख्य म्हणजे समोरील व्यक्तीच्या बुद्धीशी संवाद साधून, तिच्या हृदयाला स्पर्शून जाईल अशा हव्याहव्याशा वाटणाऱ्या मृदुभाषणातून करीत असे. ज्याची मशागत करायला हवी असा काही प्रांत माझ्या मनामध्ये आहे ही गोष्ट मी सर्वप्रथम त्याच्याकडून शिकले, आणि जेव्हा शिकले तेव्हा मला अत्यानंद झाला; आपल्या मनावर श्रेणीश्रेणीने संस्करण कसं करावं यासाठी मला उत्तेजनाबरोबरच मार्मिक मार्गदर्शन मिळालं ते त्याच्याकडूनच, आणि तेच पुढे नेऊन आज जी थोडीफार प्रगती मी केलेली आहे ती तुम्ही पाहताच आहात. त्यानेच मला ही जाणीव करून दिली की मनाची सुखं शरीराच्या सुखांपेक्षा उत्कृष्ट असतात, पण तरीदेखील या दोहोंत परस्परांना मारक किंवा विसंगत असं काहीही नसतं; वैविध्यामुळे व दोन्ही प्रकारांत रुचिपालट करीत राहिल्यामुळे एकतर गोडीत भरच पडते, आणि दुसरं असं की शारीर जाणीवांची अभिरुची सुधारून त्या दोषरहित करण्याचं जे काम मानसिक प्रगल्भतेकडून होतं, त्या प्रमाणात ते केवळ ऐंद्रिय संवेदनांकडून कधीच होण्यासारखं नसतं.

तो एक बुद्धिनिष्ठ सुखवादी होता, आणि माणसांच्या संपर्कातून मिळणाऱ्या सुखांची शरम वाटून न घेण्याइतका शहाणा होता; तेव्हा त्याने माझ्यावर प्रेम केलं खरं, पण स्वतःचा मान राखून केलं; आणि ते करीत असताना, वाढलेल्या वयाची जी ओंगळ खूण म्हटली जाते ती वृत्तीमधली आंबटलेली विकृती, किंवा याउलट अनेकदा त्याला लाज आणणारा बालिश म्हातारचळ, ह्या दोन्हीं टोकांपासून तितक्याच लांब अशा मध्यममार्गावर तो राहिला. असला पोरपणा करणाऱ्यांची तोच नेहमी खिल्ली उडवी; आणि म्हणत असे की म्हातारलेल्या बोकडाने कोवळ्या कोकराच्या चपळाईचा आव आणावा, तसलं हे वागणं आहे. सारांश असा, की सर्वसाधारणपणे नावडण्यासारखं जे जे काही उतारवयाला धरून येतं, त्या साऱ्याची त्याच्यामध्ये कित्येक आकर्षक गुणांमुळे भरपाई झालेली होती; परिणामी निदान माझ्याकरिता तरी ही गोष्ट सिद्ध झालेली होती, की वय झालेल्या माणसाने दुसऱ्याला सुख देण्याचा काळजीपूर्वक प्रयत्न केला तर ते त्याला अशक्य नाही; पण याबाबतीत तारतम्य बाळगून त्याने हे विसरता कामा नये, की ज्याप्रमाणे ऋतू अनुकूल नसताना झाडाला फळं आणायची असतील तर जास्त मेहनत व जास्त निगराणी लागते, त्याचप्रमाणे आनंदाच्या निसर्गदत्त वसंतऋतूत राहणाऱ्या तरुणापेक्षा त्याला ह्या कामी जास्त लक्ष व जास्त धोरण खर्ची घालावं लागेल.

ह्या गृहस्थाची माझ्याशी ओळख झाल्यानंतर काही दिवसांतच त्याने माझ्यासाठी आपल्या घराचे दरवाजे उघडले, आणि मी जवळजवळ आठ महिने त्याच्याबरोबर राहिले; ह्या कालावधीत, माझ्या

स्वभावातील मार्दव आणि समजूत, त्याचा स्नेह आणि विश्वास मिळविण्यासाठी मी केलेली खटपट, आणि एकूणच दिखाऊपणावर नव्हे तर त्याच्याबद्दलच्या माझ्या मनातल्या खऱ्याखुऱ्या आत्मीयतेवर आधारित अशी माझी वागणूक, यामुळे त्याला मी इतकी जवळची वाटू लागले की मला स्वावलंबी होऊन जगता यावं यासाठी त्याने माझ्या नावावर उदारमनाने तरतूद तर करून ठेवलीच; पण याखेरीज स्वत:च्या स्नेहभावाची आणखी एक खूण म्हणून स्वत:चं रीतसर मृत्युपत्र करून मला त्याची एकुलती एक वारसदार व हक्कदार बनवलं: पण यानंतर तो दोन महिनेही जगला नाही; कारण एके रात्री, काही रस्ते सोडून पलिकडे कुठेतरी आग लागलेली आहे असा ओरडा होताच तो खिडकीकडे पळत जाऊन सर्द हवेत छाती उघडी टाकून तिथेच उभा राहिला, आणि जबरदस्त थंडी लागल्याचं निमित्त होऊन मला सोडून गेला.

दिवंगत झालेल्या माझ्या उपकारकर्त्याकडे रुजू असलेली माझी कर्तव्ये पुरी केल्यानंतर निर्व्याज दु:खाची फूलमाळ मी त्याला अर्पण केली; आणि काळपुरुषाने तिची जी एक हळवी आणि कृतज्ञ आठवण बनवली, ती मात्र मी आयुष्यभर जपून ठेवणार आहे. तेव्हा आता आयुष्यात मला आनंद मिळो अथवा न मिळो; पण निदान वैभवात राहून, स्वत:चा चरितार्थ कुणाकडे तोंड न वेंगाडता मी स्वत: चालवू शकेन, अशी शक्यता निर्माण झाल्यामुळे मला थोडंफार हायसं वाटू लागलं. आपण मुसमुसत्या तारुण्याच्या ऐन बहरात आहोत अशा दृष्टीने मी स्वत:कडे पाहात होते (कारण माझ्या वयाला अजून एकोणीस पुरी झालेली नव्हती), आणि आत्ताच इतक्या प्रचंड संपत्तीची मालकीण झाले होते, की एकेकाळी तशी आशा बाळगणं तर सोडाच पण इच्छा करणंही फार निलाजरेपणाचं ठरलं असतं; परंतु मिसेस कोलकडे मी राहात असताना जी धोरणी काटकसर शिकले होते, तिचा पडताळा मी तिथे असतानापासूनचे साठवून ठेवलेले पैसे पाहून माझ्या उपकारकर्त्याला आलेला होता; परिणामी जी गडगंज मालमत्ता तो मला सोडून चालला होता, तिची व्यवस्था मी शहाणपणाने ठेवेन असा त्याला हुरूप वाटून ह्या संभाव्य गोष्टीकरिता माझी मानसिक तयारी व्हावी म्हणून त्याने बरेच परिश्रम घेऊन ठेवलेले होते; आणि याचंच फलित म्हणून, अनपेक्षितपणे इतक्या उंचावर जाऊनही माझं डोकं फिरलं नव्हतं.

पण अरेरे! आपल्याजवळ असलेल्या जगातल्या सर्वोत्कृष्ट मिष्टान्नांची चव, जो आपल्याजवळ नाही त्याच्या आठवणीने किती सहज कडवट होऊन जाते! माझं खरंखुरं प्रेम ज्या केवळ चार्ल्सवर होतं, त्याच्या आठवणीमुळे ही खंत मला फार प्रकर्षाने वाटावी यात टीकास्पद काही नाही. आमची ताटातूट झाल्यानंतर त्याच्याकडून काहीसुद्धा न कळल्यामुळे मी त्याची पुरती आशा सोडलेली होती; पण मला नंतर समजलं त्याप्रमाणे यामागचं कारण त्याची बेफिकिरी हे नसून माझं दुर्दैव हेच होतं; त्याने मला

जी अनेक पत्रं लिहिली ती सगळी गहाळ झाली होती, पण त्याला मी विसरले मात्र कधीच नव्हते. जरी मी व्यक्तिश: त्याच्याशी कित्येकदा प्रतारणा केलेली असली, तरीदेखील तो वगळता दुसऱ्या कुणाबद्दल खरी प्रेमभावना आत शिरूच न देणाऱ्या माझ्या हृदयावर सुईच्या टोकाइतकाही त्यातल्या कशाचा परिणाम झालेला नव्हता. पण ह्या अचानक मिळालेल्या संपत्तीची मी मालकीण होताच, मला सुखी करण्यासाठी ती किती अपुरी आहे हे तिचा उपभोग घेताना चार्ल्स माझ्याजवळ नसल्यामुळे मला उमगलं; आणि तो माझा किती आवडता आहे, ह्याची पुन्हा एकदा खोल जाणीव झाली. त्याची काही ना काहीतरी बातमी मिळवण्याकरिता सुरवातीला मी खटपट केली, पण माझ्या सगळया चौकशांतून निष्पन्न झालं ते इतकंच की त्याचे वडील पूर्वीच वारलेले होते आणि तेही हलाखीच्या परिस्थितीत; दक्षिण पॅसिफिकमधल्या त्या बंदरावर पोहोचताच चार्ल्सला असं समजलं, की काकांचा बहुतेक पैसा ज्या दोन जहाजांत अडकलेला होता ती बेपत्ता असल्यामुळे, जी वारसा मालमत्ता गोळा करण्यासाठी आपली पाठवणी झालेली होती ती आता अगदीच रोडावली आहे; तेव्हा शिल्लक राहिलेलं थोडंफार घेऊन तो निघाला होता, आणि ह्या प्रकरणाची ज्यांना जास्तीतजास्त माहिती होती त्यांच्या सांगण्यानुसार, कदाचित काही महिन्यांत इंग्लंडला परतण्याची शक्यता होती. हा सारा तपास मी करवून घेतला, तेव्हा त्याला मायदेश सोडून दोन वर्षं सात महिने झालेले होते. प्रेमाच्या हिशेबात याला एक छोटंसं युगच म्हणायला हवं.

माझा हृदयसखा मला पुन्हा पाहायला मिळेल, ही आशा मी किती आनंदाने कवटाळून धरली याची कल्पना तुम्हाला येणार नाही. पण त्याला अजून कितीतरी महिने अवकाश असल्यामुळे, वाट पाहात असताना माझ्या अधिरेपणाचं लक्ष भुलवून विचलित करण्याकरिता, लंडनमधल्या माझ्या आर्थिक व्यवहारांची नीट व्यवस्था लावून, माझ्या पैशाअडक्याला साजेसा इतमाम बरोबर घेऊन, लँकेशायरच्या दिशेने मी प्रवासाला निघाले; माझ्या जन्मगावाबद्दल मी अजूनही फार हळवी असल्याकारणाने त्या ठिकाणी पुन्हा भेट द्यावी एवढाच एक उद्देश या प्रवासामागे होता; आता माझं खूपच बरं चाललेलं असल्यामुळे तिथे पुन्हा तोंड दाखवायला मी अगदीच अनुत्सुक नव्हते; आणि तेही विशेषकरून अशासाठी, की एस्थर डेव्हिस त्या इनमध्ये मला अचानक सोडून गेल्यानंतर तिच्यापासून जे मी स्वत:ला पूर्ण दडवून ठेवलं होतं, त्याचं काहीच स्पष्टीकरण तिच्यापाशी नसल्यामुळेच केवळ, मला कुणीतरी वेस्ट इंडिजमध्ये पळवून घेऊन गेलं अशी आवई तिने उठवलेली होती. याखेरीज असंही माझ्या मनात फार होतं की माझ्या नातेवाईकांपैकी कुणी मिळाल्यास शोधून काढून (अर्थात असले तर लांबचेच असणार) त्यांचं काही भलं करावं. शिवाय मिसेस कोल निवृत्त होऊन जिथे वसतीला होती, ते ठिकाण माझ्या वाटेवरच असल्यामुळे तिच्या भेटीचं आकर्षणही कमी नव्हतं.

माझ्याबरोबर सोबतीला म्हणून (नोकरमाणसं जमेस न धरता) फक्त एक चांगल्या घरची, मितभाषी स्वभावाची बाई होती; आणि पुढे लंडन वीसेक मैल मागे पडल्यानंतर, जेवण करून रात्र घालवण्यासाठी म्हणून आम्ही रस्त्यावरच्या एका इनमध्ये शिरलो तेवढ्यातच अचानक असा वादळी पाऊस उफाळून आला की त्याला सुरुवात होण्यापूर्वीच आसरा गाठल्याबद्दल मी स्वतःची पाठ थोपटून घेतली. तो चांगला अर्धाएक तास चालू राहिल्यानंतर, कोचमनला काही सूचना द्यायच्या लक्षात येऊन मी त्याला बोलावणं धाडलं; आणि जेवायची व्यवस्था मांडलेल्या इतक्या स्वच्छ पार्लरमध्ये त्याच्या बुटांनी घाण येऊ नये म्हणून तो जिथे होता तिथे हॉल-किचनमध्ये गेले; तेव्हा त्याच्याशी बोलत असताना, वादळाच्या तडाख्यामुळे आत यावं लागलेले आणि ओलेचिंब झालेले दोन घोडेस्वार डोळ्याच्या कोपऱ्यातून मला दिसले; त्यातला एकजण म्हणत होता की आमचे कपडे वाळेपर्यंत तात्पुरते दुसरे मिळतील तर बरं होईल.

देवा रे! माझ्या हृदयात जो आवाज सदोदित जागा होता, तो पुन्हा घुमून ऐकू येताच मला काय वाटलं असेल, याचं वर्णन कसं करू?! घोडेस्वाराचा मोठा डगला, गळ्याभोवती बांधून मागे सोडलेला घोळदार तागा व कानांवर येणारी टोपी असे ह्या व्यक्तीने घातलेले कपडे ओळख लपवण्याकरिता मुद्दाम निवडले असावेत असा संशय येत होता, आणि मध्ये बराच काळ लोटला होता; पण अशाही परिस्थितीत, त्या दिशेला रोखलेल्या माझ्या डोळ्यांनी आवाजातून मिळालेल्या सूचनेला दुजोरा दिला: तुम्हीच सांगा की प्रेमाची मदत असल्यामुळे ज्या संवेदनेला मर्मभेदक तल्लखपणा आलेला आहे, तिच्यापासून काही लपू शकेल?! आणि आता साधकबाधक विचार किंवा चकित करण्याचे मनोरथ हे सारं मागे राहावं इतकी मी हेलावून गेले; तत्क्षणी वेगाने दाटून येणाऱ्या भावनांचा अणकुचीदारपणा जाणवून त्याच्या मिठीत बाणासारखी शिरले, आणि माझे हात त्याच्या गळ्याभोवती टाकून आक्रंदन करीत म्हणाले, "चार्ल्स! माझ्या प्राणप्रिया..." यापुढे बोलण्याची शक्ती मला सोडून गेली; आणि आनंद व आश्चर्य यांच्या प्रचंड ताणाखाली माझी शुद्ध हरपली.

माझ्यावर पडलेल्या मोहिनीतून जेव्हा मी जागी झाले, तेव्हा माझ्या जादुगाराच्या बाहुपाशात होते, पण दिवाणखान्यामध्ये होते, आणि ह्या प्रसंगामुळे आमच्या आजूबाजूला गोळा झालेल्या घोळक्याने वेढली गेलेली होते; पण त्याला माझा नवरा समजून चाललेल्या इनच्या शहाण्या मालकिणीने इशारा करताच पांगापांग झाली, आणि अगदी आमच्या इच्छेप्रमाणेच, पुनर्मीलनाच्या त्या अथांग हर्षसागरात आम्हाला एकटं सोडण्यात आलं. आमची दुर्दैवी ताटातूट झाल्याप्रसंगी मला जो शोक झाला होता, त्यापेक्षा आपली शक्ती जास्त आहे हे माझ्या प्राणाची किंमत देऊन सिद्ध करण्याचा आजच्या माझ्या आनंदाचा प्रयत्न होता.

माझे डोळे जेव्हा उघडले, तेव्हा त्या दोहोंची आराध्यमूर्ती आणि माझ्या मनीची सर्वोत्कट इच्छा असलेला चार्ल्स, एक गुडघा टेकून, माझा हात घट्ट धरून, प्रेमातिरेकाने भान हरपून माझ्याकडे एकटक पाहात होता. माझा आवाज पुन्हा ऐकून ती मीच असल्याचं पुन्हा एकदा आपल्या मनाचं समाधान करून घ्यावं, याकरिता तो उतावीळ झाला होता; त्यामुळे मी जागी झालेली पाहून त्याने बोलण्याचा प्रयत्न केला: पण हे भलंथोरलं आश्चर्य फार अचानक त्याच्यावर आदळलेलं असल्यामुळे त्याला आलेली बधिरता जाता जाईना, आणि वाचा बसलेलीच राहिली: फक्त काही मोडकेतोडके, अर्धवट जन्माला आलेले, धडपडते शब्द तो चाचरत्या स्वरात उच्चारू शकला, आणि माझ्या कानांनी ते हावरेपणाने पिऊन टाकीत एकत्र जुळवून त्यांचा अर्थ लावला: "अगं किती दिवसांनी! ... काही दयामाया – कुठे होतीस गं! ... माझी लाडकी फॅनी! ... तूच का तू?!" पण त्याच वेळी मला चुंबनांनी गुदमरून टाकून, ज्या उत्तराची तो कमालीच्या अधिरेपणाने वाट पाहात होता ते बाहेर पडण्याचा रस्ता त्याने बंद केला; आणि ज्या गोड गोंधळामध्ये माझ्या संवेदना आनंदवनभुवनी हरवून गेलेल्या होत्या, त्यात आणखीनच भर टाकली.

पण ह्या पराकोटीच्या आनंदात जवळजवळ पूर्णपणे विष कालवणारी एकच क्रूर शंका त्या साऱ्या सुखदायक कल्पनांच्या भाऊगर्दीमध्ये धक्काबुक्की करून हजर झालेली होती; आणि अर्थात ती म्हणजे, इतकं ओसंडून वाहणारं हे सारं खरं नसलं तर? हे केवळ स्वप्न आहे, आणि यातून मी आता जागी होऊन तशी काळीकुट्ट जाणीव मला वेढून टाकणार, अशा भीतीने मी थरथरत होते. न जाणो हा अत्यानंद नाहीसा होऊन मला पुन्हा वैराणात सोडून देईल ह्या माझ्यात घर करून बसलेल्या धास्तीमुळे, तसं होण्याआधी मी जितका तो भोगेन तितका थोडाच आहे किंवा त्याचा खरेपणा जितका खडसून तपासून पाहीन तितका थोडाच आहे; अशा भावनेने जणू काही चार्ल्सला माझ्यापासून निसटता येऊ नये म्हणून मी त्याला चिकटले, बिलगले, आणि म्हणाले: "कुठे होतास रे तू?! असा कसा रे मला सोडून गेलास? अजून तू माझाच आहेस असं मला सांग... तुझं अजून माझ्यावर प्रेम आहे असं मला सांग... (आणि त्याचेमाझे ओठ जणू एकत्र डकवून टाकण्यासाठी मी त्याचं चुंबन घेतलं) ... मी तुला क्षमा करते, हे पुनर्मीलन घडवून आणल्याच्या बदल्यात माझ्या कमनशिबाला क्षमा करते."

प्रेमाच्या व्यवहारात जे सैरभैर बोलणं समजूतदार लोक वाक्पटुत्व म्हणून खपवून घेतात, तशा प्रकारचे हे तुटकेफुटके उद्गार माझ्या तोंडून घरंगळून निघताच, माझ्या अनुरक्त हृदयाला जी उत्तरं हवीहवीशी वाटत होती ती सारी त्याच्याकडून मिळाली. निदान पुढले काही क्षण तरी आमच्या मिठ्यांना, प्रश्नांना व उत्तरांना काही शिस्त म्हणून नव्हतीच; एकमेकांना तोडत, दोन समांतर

रुळांवरून असंबद्ध बोलत सारा गंमतीदार गलबला होऊन गेला; आमच्या डोळ्यांकरवी आम्ही हृदयांची अदलाबदल केली, आणि कालौघाने किंवा ताटातुटीने किंचितही न ओसरलेल्या प्रेमाचा पुनरुच्चार केला: ज्यावर त्या प्रेमाचा खोल ठसा उमटलेला नाही असा एकही श्वास, एकही आविर्भाव आम्हा दोघांकडून प्रकटला नाही. एकमेकांत कुलूपबंद झालेले आमचे हात एकमेकांना भावनावेगाने वारंवार गच्च धरीत होते, आणि त्यांच्यातला ज्वालाग्राही थरार पुन्हापुन्हा आमच्या हृदयांपर्यंत पोहोचत होता.

अशा त्या अवर्णनीय आनंदाच्या मध्यभागी गुंगून पडलेल्या माझ्या हे लक्षातच आलं नव्हतं, की माझ्या आनंदाचा निर्माता पुरता ओलाचिंब झालेला असून त्याला थंडी भरण्याचा धोका आहे; पण तेव्हाच मालकिणीने योग्य वेळेस आत येऊन आमची तंद्री मोडली (माझ्या लवाजम्यामुळे तिला माझ्यात व माझ्या जवळच्या व्यक्तींत रस वाटू लागला होता, पण अर्थात चार्ल्सला याबद्दल काहीच ठाऊक नव्हतं); त्याच्यासाठी तिने बऱ्यापैकी कपडे बदलायला आणले होते, आणि आता तिसऱ्या माणसाच्या हजेरीमुळे माझं मन काहीसं स्थिरस्थावर होऊन, चार्ल्सच्या प्रकृतीची मला फार मिटमिट काळजी वाटू लागल्यामुळे, मी ते त्याला घ्यायला लावले. इथे पुन्हा एकदा मालकीण आम्हाला एकटी सोडून जाताच, इतक्या प्रदीर्घ ताटातुटीनंतर आमची पुनर्भेट होत असतानाच्या गंभीर क्षणांना साजेसा विनय पाळून तो कपडे उतरवू लागला; पण हे करीत असताना मध्येमध्ये निसटून जाणाऱ्या त्याच्या अनावृत्त त्वचेच्या झगझगत्या क्षणचित्रांची भुरळ पडून तिकडे डोळे न वळवणं मला जमेना, आणि तिचा न कोमेजलेला वर्ण व तजेला पाहून, मार्दव आणि आनंद ह्या भावना बाजूला ठेवता येईनात; पण त्या दोहोंचा आराध्यबिंदू केवळ तो स्वत:च असल्यामुळे, त्यांच्यात अवेळी आणि उच्छृंखल वासनांची भेसळ मुळीसुद्धा झालेली नव्हती. चार्ल्सने चढवलेले तात्पुरते कपडे त्याला बसतही नव्हते, किंवा माझ्या उचंबळून आलेल्या मनाला जसा तो भासत होता त्याला निदान माझ्या मते साजेसे नव्हते; पण ज्या ज्या वस्तूशी त्याचा स्पर्श होईल किंवा संबंध येईल, त्यात जादू ओतण्याचं काम प्रेमाने केल्यामुळे ते त्याला फार शोभून दिसले: आणि खरं तर त्याच्यासारख्या अंगकाठीला खुलून दिसणार नाही असा पोषाख होताच कुठे?

मात्र आता अधिक बारकाईने न्याहाळून पाहताच, दूर गेलेला असताना त्याच्या शरीरामध्ये झालेले त्याला अधिकच खुलवणारे बदल माझ्या लक्षात आल्याखेरीज राहिले नाहीत. रूपरेषा अजूनही त्याच होत्या, अजूनही तोच सळसळता लालिमा व तजेला चेहऱ्यावर होता: पण गुलाब अधिक खुललेले होते, भटकंतीमुळे आलेला रापलेपणा आणि थोडीशी वाढलेली दाढी यांच्या परिणामी त्याला सहज परवडेल इतपतच कोवळेपणा खर्च होऊन, त्याबदल्यात तो अधिक पुरुषी व प्रगल्भ दिसू लागला

होता, आणि भारदस्तपणाच्या सोबतीला मुश्किलीनेच आढळणाऱ्या माधुर्याचा जो ठसा निसर्गाने त्याच्यावर उमटवला होता त्याला हा बदल मोठा शोभून दिसत होता. पण तरीदेखील, त्याला अंगभूत असलेला, तजेलदारपणामुळे झगझगणारा, पुष्पगुच्छाप्रमाणे डोळ्यांना सुखावणारा, आणि स्पर्शाला चविष्ट असा गुळगुळीत मांसलपणा त्याने बिलकुल गमावला नव्हता; खांदे मात्र अधिक रुंद झाले होते, आणि आकार अधिक भरीव व पुष्ट झाला असला तरीदेखील मोकळा व हलका राहिलेला होता. सारांश असा, की अनुभवी डोळ्यांना तो कोवळ्या वयात होता त्यापेक्षा अधिक वाढलेला, थोराड व बांधेसूद वाटण्यासारखा होता; वयाने मात्र तो आता बावीसपेक्षा फारसा जास्त नव्हता.

त्याने अडखळत, आणि सुखदायक कारणांमुळे मध्येमध्ये थांबून, स्वत:चा जो वृत्तान्त सांगितला, त्यावरून मी इतकं वेचून घेतलं की आत्ता या क्षणी तो लंडनकडे निघालेला होता, आणि तेही त्याची सद्यपरिस्थिती फारशी बरी नसताना; कारण समुद्रप्रवासाकरिता योग्य वेळेच्या आधीच आयर्लंडला यायला निघाल्यानंतर तिथल्या किनाऱ्यावर त्याचं जहाज फुटून दक्षिण पॅसिफिकवरून त्याने थोडंसं आणलेलं सगळं गेलं होतं; यापुढे फार हालअपेष्टा सोसून व अनेक स्थित्यंतरं होऊन त्या जहाजाच्या कप्तानाबरोबर प्रवास करीत तो इथपर्यंत आला होता; आपले वडिल गेले आणि तेही मागे फारसं काही न ठेवता, हे कळल्यानंतर त्याला आयुष्य पुन्हा नव्याने सुरू करावं लागणार होतं: तेव्हा प्राप्त परिस्थिती पाहता माझ्या इच्छेप्रमाणे मी तुला सुखात ठेवू शकत नाही याचं मला फार वाईट वाटतं, असं त्याने मला ज्या प्रांजळपणाने सांगितलं; ते थेट त्याच्या हृदयातून आलेलं असल्यामुळे माझ्याही हृदयाला चिरून गेलं.

इथे एक गोष्ट विसरता नये, की माझ्याकडच्या संपत्तीबद्दल मी त्याच्याजवळ काहीही सूतोवाच केलेलं नव्हतं, आणि एखाद्या अधिक निवांत क्षणी त्याला चकित करून त्याची प्रतिक्रिया मिटक्या मारत पाहण्याचा माझा बेत होता. माझ्या कपड्यांवरून खरा प्रकार त्याला मुळीच कळण्यासारखा नव्हता; कारण एकतर मी शोकात असल्याने ते काळे होते, पण इतकंच नव्हे तर साधा व डोळ्यांवर न येणारा पोषाख करण्याची जी सवय मी अभ्यासून जोपासलेली होती, तिच्याशी साजेसे होते. त्याला माझ्यापासून तोडून वेगळं करण्यात आल्यानंतर मी काय केलं व सध्या काय करते आहे, याबद्दल त्याची भडकलेली उत्सुकता शमवण्यासाठी त्याने मला पुष्कळ हळुवार आग्रह केला: आणि जी चतुर उत्तरं देऊन त्याचे प्रश्न मी चुकवले, त्यांमुळे त्याचं समाधान झाल्यासारखं जरी दिसलं नाही; तरीदेखील माझ्यावर त्याचा पुरता विश्वास असल्यामुळे, योग्य वेळी सर्व काही कळेल असं पटून त्याच्या उतावळेपणाला तात्पुरती मुरड बसली.

पूर्वीइतकाच प्रेमळ, एकनिष्ठ आणि धडधाकट राहिलेला चार्ल्स माझ्या आसुसलेल्या बाहुपाशांमध्ये परत यावा, हेच स्वर्गाचं देणं माझ्या कल्पनेला न पेलवेल इतकं मोठं होतं: पण चार्ल्स कचाट्यात असणं! ... आणि पैशाचं पांघरूण गमावून बसून अंगच्या गुणांपुरता नागडा उरलेला असणं, ही परिस्थिती मी स्वप्नातही कधी इच्छा केली नसेल इतकी माझ्या भावनांना अनुकूल होती; ह्याचा परिणाम म्हणून, त्याची संपत्ती गेल्याचं ऐकून मी उघडच इतकी खुशीत दिसले, इतकी अव्वाच्या सव्वा, काळावेळाचं भान न राहून हरखून गेलेली दिसले, की असं का व्हावं हे त्याला कळेचना; तेव्हा पुन्हा त्याला भेटल्याच्या आनंदामुळे माझ्या बाकी साऱ्या संज्ञा आणि समजुती बावचळून गेलेल्या आहेत, असं कारण त्याने स्वत:पुरतं मानून घेतलं.

मध्यंतरीच्या काळात, माझ्या सोबतीण बाईने चार्ल्सच्या प्रवासातील सोबत्याची सगळी काळजी घेतली होती; आता रात्रीचं जेवण आत येताच त्याची व माझी ओळख करून देण्यात आली, आणि चार्ल्सशी मैत्री किंवा परिचय असलेल्या सर्वांबद्दलच मला आत्मीयता असल्यामुळे मी त्याच्याशी तदनुसार वागले. किती आनंदाच्या वातावरणात, एकमेकांची कौतुकं करण्यात व सुखावणाऱ्या अनागोंदीत आम्ही चौघांनी एकत्र जेवण केलं असेल, याची कल्पना करणं अवघड नाही. सततच्या मानसिक आंदोलनांनी, माझ्या कामदेवाला पाहायला मिळणं ही कधीही न वीट आणणारी मेजवानी वगळता, बाकी कशाचीच भूक माझ्यात शिल्लक ठेवलेली नव्हती; पण इतक्या घोडदौडीनंतर त्याची झीज भरून निघण्याची गरज आहे असा अंदाज बांधून, त्याच्याकरिता दाखला म्हणून मी बळेबळेच थोडंसं खाल्लं; आणि खरोखरीच तो जेवला मुशाफिरासारखा, पण माझ्याकडे एकटक पाहात राहिला व माझ्याशी बोलत राहिला तो प्रेमिकासारखा. जेवणाची सर्व सामग्री आवरली जाऊन आता झोपायची वेळ झाली; तेव्हा अधिक समारंभ न माजवता चार्ल्स आणि मी यांना एका अतिशय उंची सजवलेल्या खोलीत नवराबायकोप्रमाणे नेण्यात आलं, शिवाय वर असंही सांगण्यात आलं की समोर दिसतोय तो आमच्याकडचा सर्वांत उत्तम पलंग बरं का!

आणि इथे मात्र, हे सभ्यते, जरा सबूर! खिडकीचे पडदे उघडे ठेवून जर पुन्हा एकदा मी तुझे संकेत मोडणार असेन; आणि माझ्या बेलगाम तरुणाईतल्या सर्वांत कळीच्या प्रसंगांचा सडेतोड वृत्तांत सांगण्याचं ज्या प्रांजळपणाने कबूल केलं होतं, त्यासमोर जर आज शेवटच्या खेपेला तुझा बळी देणार असेन, तर मला माफ कर!

आता खोलीत जेव्हा आम्ही दोघेच उरलो, तेव्हा समोरचा पलंग पाहून आमच्या पहिल्यावहिल्या आनंदसोहळ्याची मला आठवण आली; आणि माझ्या कलिकाहृदयाच्या स्वामीबरोबर आत्ताच्या आत्ता

मी तिथे पहुडलेली असणार, ह्या कल्पनेनेच मी इतकी गलबलून गेले की त्याच्या अंगावर रेलले हे चांगलंच झालं; कारण इतक्या अनावर होऊ लागलेल्या मधाळ शिरशिरीने अन्यथा पुन्हा एकदा माझी शुद्ध हरपली असती. माझा गोंधळ उडालेला चार्ल्सने पाहिला; आणि तो दूर करण्याकरिता त्यापेक्षा फारसा कमी नसलेला स्वत:चा त्याला विसरावा लागला. पण आता मात्र, मनातील हीण काढून टाकण्याची जिच्यात शक्ती आहे अशा एकमेव कामनेने माझा पुरता ताबा घेतला होता; आणि एक गोड थरथर, हळुवार भित्रेपणा, आणि शालीनता व मनाची चलबिचल यांच्या दुहेरी दबावामुळे लक्ष्मणरेषेच्या आत घोटाळणारा प्रेमज्वर, ही तिची लक्षणे एकामागून एक माझ्यात दिसू लागली होती: ह्या साऱ्यामुळे माझ्या आत्म्यावर जे दास्यत्व येऊन पडलं, ते माझ्या हृदयाला दीर्घकाळ (खरंतर फारच दीर्घकाळ!) मिळालेल्या स्वातंत्र्यापेक्षा कितीतरी जास्त हवंहवंसं वाटू लागलं; आणि हे स्वातंत्र्य उपभोगीत असताना विकारांचे जे वेडेवाकडे सोहळे मी साजरे केले होते, त्यांच्या आठवणींनी खंतावून जात मी पश्चात्तापदग्ध निश्वास सोडला. जिच्या निरागसतेवर डाग नाही अशी कुणी बावन्नकशी अक्षतकुमारिकादेखील मीलनरात्रीचा पलंग पाहून जितकी शरमून लाजली नसेल तितकी मी अपराधी भावनेने लाजले; आणि चार्ल्सवर माझं इतकं अव्याज प्रेम होतं, की मी त्याच्या लायकीची नाही असं मला फार प्रकर्षाने वाटू लागलं.

मनाला खिन्नता आणणाऱ्या ह्या तरल आणि विचलित अवस्थेत काय करावं हे मला उमगत नसताना, मोठ्या गोड अधिरतेने चार्ल्सने माझे कपडे उतरवले; आणि माझ्या संवेदना सैरभैर होऊन पंखांप्रमाणे उघडमीट करीत असताना, आनंदाचे व वाखाणणीचे काही उद्गार चार्ल्सच्या तोंडून निघालेले तेवढेच मला आठवतात; यामागचं विशेष कारण असं, की जखडणाऱ्या कपड्यांतून मोकळ्या केल्या गेलेल्या माझ्या स्तनांचा स्पर्श होताच, वेड्या वेगाने ते धपधप करीत वरखाली होऊन त्याच्या हव्याहव्याशा वाटणाऱ्या हस्तस्पर्शाने फुलारून आले, आणि ते आता मोठे सुडौल बनले असून त्यांची घट्टाईही कमी झालेली नाही, असं आश्वासक सुख त्यांनी या हातांकडे सुपूर्द केलं. लवकरच मी बिछान्यात शिरले, व माझ्या प्रियसख्याची वाट पाहात क्षणभर तळमळते आहे, तितक्यातच तो कपडे काढून पांघरुणाखाली आला; त्याने जेव्हा आपल्या बाहुपाशात मला घट्ट धरून स्वागतप्रीत्यर्थ एका अवर्णनीय चवीच्या चुंबनाची देवाणघेवाण केली, तेव्हा माझ्या हृदयाने ओठांपर्यंत उसळी मारून येऊन, ज्यांना जागृत करण्याची गुह्यशक्ती केवळ चार्ल्समध्येच होती व ज्यांच्यात सुखवेदनेचा प्राण आणि सुखवेदनेचा अर्कच सामावलेला होता, अशा नखरेल व कामरसाने सळसळणाऱ्या भावनांचा तापलेला शिक्का त्याच्यावर उमटवला.

आमच्या शेजारच्या टेबलावर जळणाऱ्या दोन मेणबत्त्या आणि मन प्रसन्न करणारी धगधगत्या

लाकडांची शेकोटी यांमुळे बिछान्यावर जो प्रकाश भिरकावला जात होता, त्याचा परिणाम म्हणून पाचांपैकी आमच्या आनंदाकरिता फार आवश्यक असणाऱ्या एका इंद्रियाकडे आपला वाटा न देऊन फसवल्याची तक्रार करायला बिलकुल सोय उरलेली नव्हती; आणि खरोखरीच, एखाद्या मूर्तीप्रमाणे दिसणाऱ्या माझ्या प्रियतमाची ज्या अधिरेपणाने मी वाट पाहिली होती; त्यामुळे बाकी सारं जमेस न धरताही, तो फक्त पाहायला मिळणं, हेच सुख जीव ओवाळून टाकण्यासारखं होतं. पण इतक्या धारेवर आलेल्या आमच्या अभिलाषांना कृतीची फार निकड असल्यामुळे, नमनाखातर थोड्याशा कामचेष्टा करून, चार्ल्सने माझा व त्याचा सदरा उतरवून त्याच्या मर्दानी छातीचा भरगच्च खजिना माझ्या स्तनांपाशी लावून धरला; तशी दोघांतही नाजुक धडधड होऊ लागली: त्याच्या लखलखत्या शरीराचा माझ्या शरीराला नग्नस्पर्श होतो आहे ह्या जाणीवेने विचारांवरचा माझा ताबा पुरता सुटला, आणि संवेदनांचं अत्युच्च स्वरूप गाठणाऱ्या त्या आनंदाकडे माझ्या अंतरात्म्यातली प्रत्येक शक्ती सुपूर्द झाली. माझा सोबती पुरुष असण्यापेक्षाही चार्ल्स असणं, हे या आनंदामागचं शतपटींनी अधिक प्रबळ कारण असल्यामुळे माझ्या सजग हृदयापर्यंत तो आता जाऊन पोहोचला: ते मात्र नेहमीच चार्ल्सशी एकनिष्ठ राहिलेलं होतं; आणि लाभाकरिता, आज्ञापालनाकरिता किंवा माझ्या शारीरिक गरजांकरिता प्रसंगी मला जे त्याग करावे लागले, त्यांमध्ये त्याने कधीही भाग घेतला नव्हता.

पण आता घनदाट सुखाचा अंमल मला वेढू लागताच, माझ्या लुटल्या गेलेल्या कौमार्याच्या विजयचिन्हांनी नटलेला तो निमूळता कठीण दंड माझ्या एका मांडीविरुद्ध घट्ट टणटणीतपणे रेलून बसलेला मला जाणवल्याखेरीज राहिला नाही; अजून त्या मी उघडलेल्या नव्हत्या यामागे मला वाटणारा संकोच हेच जरी एकमात्र कारण असलं, तरीदेखील माझ्यामध्ये ह्या संकोचाचं पुनरुज्जीवन करणाऱ्या निवळशंख प्रेमभावनेला, प्रवेश अवघड असल्याचं खोटं श्रेय घेऊ पाहणं किंवा निलाजरे नखरे करणं मुळीच आवडलं नसतं. मागे कुठे मी म्हटलंही असेल कदाचित – मनात करुणा भरून यावी असं काहीतरी विलक्षण ह्या लडिवाळ पुरुषांगाच्या स्पर्शात आहे. त्वचेशी तिचा संपर्क होत असताना याहीपेक्षा लोभस किंवा सूक्ष्मभावी वस्तू नसते. आता मग प्रेमात पडलेली मुलगी जसा विचार करील तसा तुम्ही करून पाहा! संवेदनांपैकी सर्वाधिक चलाख अशा त्या स्पर्शसंवेदनेला झालेला आनंद, तोही तिच्या मध्यवर्ती दालनामध्ये, कुठल्यातरी सीमारेषेत मावेल का?! जो विवक्षित राजदंड आपल्या सर्वांवरच सत्ता गाजवतो, पण एवढंच नव्हे तर विशेष म्हणजे जो संपूर्ण जगातल्या माझ्या प्रियतम व्यक्तीचा होता, त्याचा दबाव जाणवू लागताच, इतके दिवस उपास घडलेलं हे दालन पुन्हा एकदा फुलून धगधगू लागलं.

त्या घटकेला निष्ठुरतेच्या परमोच्च बिंदूवर असताना तो मला असा भारदस्त, असा चित्शक्त, असा भरीव आणि असा मोहक वाटला, की त्याने मला दिलेल्या एकमेवाद्वितीय अनुभवाला कसं म्हणून उल्लेखावं ते कळत नाही: पण माझ्या प्रेमाचा मालक असलेल्या तरुणाचा तो आहे, ही जाणीव अंगात भिनताच सुखवेदनांनी माझा कंप होऊ लागला; आणि त्यांनी माझ्या अंतर्मनाची अशी घाई उडवून दिली, की त्या इंद्रियदंडाचं आदरातिथ्य करण्यासाठीच असलेल्या माझ्यातल्या आनंदपंथी अवयवाकडे साऱ्या संवेदनांची त्वरित पाठवणी झाली. अंतर्वक्र आरशावर आदळणाऱ्या किरणांप्रमाणे त्या एका बिंदूभोवती केन्द्रित होऊन प्रकाशोत्सर्ग करीत अतिप्रखर उष्णतेने जळू लागल्या; सुखाच्या वेटोळयांमध्ये आता असा जबरदस्त पीळ भरला गेला होता की मला धाप लागली, समोर वाढून ठेवलेल्या आनंदाकरिता माझी भूक अशी कडाडली की वासनेने मी कासावीस होऊन गेले, पण माझ्या मनात मजेदार सरमिसळ करणाऱ्या दोन परस्परभिन्न कल्पनांचा हिशेब मला काही केल्या ठेवता येईना: सुख पोहोचविणाऱ्या इंद्रियाचा स्पर्श मला होतो आहे आणि त्याच क्षणी सार्वभौम प्रेमाच्या राजमुद्रेचाही होतो आहे, यापलीकडला कोणताच विचार माझ्या मनात मावत नव्हता. त्या दोन कल्पनांचे प्रवाह एकमेकांत मिसळून, नशा चढविणाऱ्या हर्षभावनेचा असा एक महासागरच त्यांनी माझ्या इवल्याशा, तकलादू भांड्यात ओतला की चोहोबाजूंनी गुदमरून जाऊन, भान हरपून, आनंदाच्या खाईत मी ढकलली गेले; आणि केवळ सुखाच्या अतिसेवनामुळे मृतवत पडून राहिले.

ह्या उत्फुल्ल बेभानीतून चार्ल्सने मला किंचित जागं करून, चुंबनांची झोड चालूच राहू देत, कुजबुजत अशी तक्रार केली, की त्याने आत येऊ देण्याकरिता घायकुतीने केलेला आग्रह ऐकून घेताना मी शरीराची जी रचना करून ठेवलेली होती, ती त्याच्या इच्छापूर्तीसाठी फारशी सोयीची नव्हती; त्याचा आग्रह हाच आनंद इतका मादक होता की त्यामुळे मी तर्कदुष्टपणे त्याहीपेक्षा खूप मोठा आनंद बाहेरच राहू दिलेला होता; पण ही चूक दुरुस्त करण्याचं काम किती गोड होतं!

अनुराग व निसर्गप्रेरणा या दोहोंकडून मिळालेल्या सूचना आज्ञाधारकपणे पाळून माझ्या मांड्या आपखुषीने उघडल्या, आणि सुखाच्या द्वाराकडे जाणाऱ्या मऊशार कमानीवरचा हक्क त्यांनी लागलीच शरण येऊन सोडून दिला: ते लोभस मखमली टोक मला दिसलं... मला ते भिडलं! जोर एकवटून तो माझ्यात शिरला! आणि ... ओहोहो! ... आपलं काम चोख बजावणाऱ्या माझ्या स्मृतीसमोर ह्या क्षणी सिद्ध असणाऱ्या त्या हर्षविस्फोटामुळे माझ्या हातातली लेखणी गळून पडते आहे! वर्णनक्षमता मला सोडून गेली आहे आणि तिच्या पंखांच्या आवाक्याबाहेर असलेली मजल कल्पनाशक्तीवर सोपवून देते आहे: पण ह्या कमालीच्या मिठ्ठास व राजसगुणमंडित संवेदनेला जर न्याय द्यायचा, तर ही

कल्पनाशक्तीदेखील माझ्यातल्याप्रमाणेच आंतरिक ज्वालेने तावून सुलाखून निघालेली असायला हवी. आता तिने मजल दरमजल करीत आत येत राहणाऱ्या त्या पाषाणहृदयी आगंतुकासमोर स्वागताच्या पायघड्या घालून शेवटापर्यंत त्याची सोबत केली, आणि आगमन पूर्ण होताच माझ्या डोळ्यांतून ज्या प्रेमाग्नीच्या ठिणग्या उधळवल्या, त्याने माझं अंगांग होरपळून टाकून माझ्या प्रत्येक रंध्रामध्ये व नीलेमध्ये वडवानल माजवला: चोहोबाजूंना आता मूर्तिस्वरूप आनंदाचा हल्लकल्लोळ उडाला. जो प्रेमाचा बाण टोकापासून पिसापर्यंत मी आत घेतलेला होता, त्याने त्या प्रदेशात आता नवी जखम उघडली; पण ज्या जुन्या जखमेने आपला पहिलावहिला श्वास ह्याच लाडक्या अवजाराच्या साहाय्याने घेतला होता, तिचे ओठ जणू काही कृतज्ञतेच्या भावनेने त्याला आतुरतेने चोखीत बिलगून राहिले; आतल्या यच्चयावत घटक अवयवांनी त्याला मोठ्या उत्साहाने कडकडून मिठी मारून, उबदार आपुलकीने त्याची हृदयभेट घेतली; आणि त्या जागचा प्रत्येक तंतू भोवताली घट्ट ताणला जाऊन, ह्या सुखावणाऱ्या स्पर्शातला आपला वाटा मिळावा म्हणून हावरेपणाने धडपडू लागला.

सावकाशीने चव घेता यावी म्हणून काही क्षणांपुरता आम्ही इंद्रियांना विराम दिलेला असताना, आणि आमच्या पुनर्मीलनातल्या सर्वांत परस्परनिकट असतानाच्या बिंदूवर मोठ्या मजेने रेंगाळत आनंदाचा रवंथ चघळीत असताना, त्या सुखाच्या सहजप्रकृतीत असलेला अधिरेपणा आम्हाला कार्यप्रवृत्त करू लागला. त्याच्या बाजूने धक्क्यांचा झंझावात सुरू झाला, आणि ह्या तालावर वरखाली होत मी प्रतिसाद देऊ लागले; आमच्या सुखभावना उच्चारून दाखवण्यापलिकडे जाऊ लागताच, कामातुर झालेले वाणीचे अवयव एकमेकांत मिसळून स्पर्शांचे अवयव झाले... हा स्पर्श असा चविष्ट होता!... असा खुमासदार मऊमुलायम होता! आणि... आता मला तो हृदयापर्यंत जाणवला. ह्या व्यवहाराचं सूत्रसंचालन करीत असताना प्रेमदेवता ज्या बलिष्ठ व तीक्ष्ण टोकाने सुखाकडे नेणारा रस्ता दाखविते, ते माझ्या हृदयाला शिवून गेलं! प्रेम ह्या वस्तूला कामसुखाचं मीठ असं म्हणता येईल; मुळात हा आनंद मोठा असतो हे मान्य, पण ही लज्जत जर त्यात नसेल तर राजाचा असो नाहीतर भिकाऱ्याचा, शेवटी हिणकसच राहतो; कारण त्याला शुद्ध करून, उदात्त स्वरूप आणून, त्याची पातळी उंचावण्याचं काम खरोखर फक्त प्रेमच करू शकतं. अशा प्रकारे, हृदयात आनंदीआनंद आणि संवेदनांत आनंदीआनंद अशी गत होऊन, सुखाच्या ज्या परमोच्च शिखरावर मी येऊन पोहोचले होते त्याही वर काही असू शकेल ही कल्पना पूर्णपणे माझ्या विचारशक्तीच्या पलिकडली होती.

चार्ल्सचं अवघं शरीर उन्मादामुळे हेलखावे खात होतं, आणि त्याच्या डोळ्यांत कोवळ्या ज्योती थरथरत होत्या, ह्या साऱ्यामुळे सुखाचे सूर आता बेचूक जुळले असल्याची मला पावती मिळाली; तो

माझ्यात इतका खोलवर शिरला, माझ्या मर्माला त्याने असा स्पर्श केला, माझ्या देहावरची मालकी मला सोडायला लावून त्याची माझ्याकडे अशी दिली, की जेणेकरून माझ्या बहरलेल्या कल्पनाविश्वामध्ये आमचे अंतरात्मे व आमची हृदयं परस्परांत मिसळून जाऊन एकजीव होऊन गेली; सारं काही एकच शरीर आणि एकच मन होऊन जाऊन, तो मी झाला आणि मी तो झाले. पण जन्मल्यापासूनच ज्याप्रमाणे जीवन स्वत:च्या विसर्जनाकडे वाटचाल करू लागतं, त्याप्रमाणेच ह्या रतिसुखाचीही गत झाली; इतक्या सुसाट वेगाने ते पुढे धावत होतं की मृत्यूचा मनोहर क्षण त्याने आततायीपणाने स्वत:वर ओढवून घेतला; ती हळुवार वेदना जवळ येत असल्याची चाहूल नेहमीच्या पद्धतीने मिळते न मिळते तोच, माझ्यातल्या काबीज केल्या गेलेल्या बोगद्यामध्ये माझ्या प्राणसख्याचा उत्सर्ग बंदुकीच्या गोळीप्रमाणे वेगाने भिरभिरत आत घुसला: सागरी हवेच्या झुळकेप्रमाणे हवीहवीशी वाटणारी व भगभग शांत करणारी जी गोड खाजवाखाजव तिथे यामुळे झाली, तिच्या परिणामी माझ्यातील सारे आनंदरस पाझरते होऊन बेभान भळभळा वाहू लागले, वासनेची लालभडक तगमग त्यांनी शमविली, आणि आमच्या सुखभावना तात्पुरत्या का होईना पण बुडवून टाकल्या.

पण लागलीच पुन्हा त्या तरंगून वर आल्या! कारण निसर्गनियमांना अनुसरून एका श्वासाच्या कालखंडामध्येच अंतापर्यंत जाऊन स्खलित झाल्यानंतर, त्या विरघळत्या धुंदीत चार्ल्स निष्क्रियपणे फार वेळ पडून राहिला नाही; पुन्हा एकदा लवकरच त्याच्यात उत्साह संचारला, आणि ह्या वस्तुस्थितीची त्याने मला जाणीव करून दिली की त्याच्या सुखेंद्रियाच्या दणकट वेटोळ्या, प्रेमाच्या शक्तीमुळे, आणि कदाचित लांबलचक सुट्टीमुळे, इतक्या घट्ट पिळल्या गेलेल्या होत्या की फक्त एका स्फोटाने त्यांचा ताण सैलावण्यासारखा नव्हता: त्याचा निष्ठुरपणा अजूनही माझी मदत करायला तयार होता.

तेव्हा स्थानभ्रष्ट न होता, किंवा माझ्या गोजिरवाण्या भाडेकरूचा विरह सहन करण्याची तसदी मला न देता, त्याने पुन्हा एकदा नव्या दमाने कृतीला सुरुवात केली; तितक्याच समरसतेने व परस्परसहकार्याने तीच धून आम्ही पुन्हा वाजवली: आमच्या प्रेमाला जशी ओहोटी नव्हती तशी कामनेलाही नव्हती: आणि आता त्याच्यावर लाट कोसळताच, सुखाच्या पान्ह्याने तटतटलेल्या माझ्या प्रेमिकाने आपल्याजवळचे साठे उदार मनाने खुले करून, त्याच्या अंडाकृती कुंभांमध्ये आकंठ भरलेल्या घनद्रवपदार्थाने माझं अंतरंग ओतप्रोत भिजवून काढलं: त्याच वेळेला माझी स्वत:ची भळभळा वाहणारी खंडणी सादर करीत असताना मी जो आचका दिला, त्यामुळे त्याचा आनंद वाढावा आणि ह्या आनंदाचा बाह्याविष्कारही वाढावा अशी गोड सेवा माझ्याकडून आपोआपच घडली: कारण माझं चलनवलन अशा तऱ्हेने झालं, की तिथल्या संवेदनासंपृक्त अंतर्यंत्रणेने आपली दाब लावून शोषून

घेण्याची शक्ती वापरून प्रेमाचं स्तनाग्र आसुसून ओढून रितं करून टाकलं; आणि तेही अशा उतावळया आवेगाने, की मोठ्याला छोट्याची उपमा द्यायची तर मायाळू निसर्गाने केलेल्या योजनेप्रमाणे, स्तनाला लागलेल्या अर्भकाला त्याच्या इवल्याशा तोंडाने व गालांनी हालचाल करून त्याच्या पोषणासाठी बनविलेला दुधाचा झरा पिण्यात जे सुख होतं, त्यामुळे ते तिथेच बिलगून राहातं.

पण अजूनही त्याचा जोम संपलेला नव्हता: हा दुप्पट मारा करूनही त्याच्या वासना विझल्या तर नव्हत्याच पण तितक्याशा थंडावल्याही नव्हत्या; आणि तरुणपणी इच्छा असेल तर शक्ती असते. तेव्हा अचंबा करण्यासारखी गोष्ट म्हणजे तिसऱ्यांदा विजयी मोहीम काढण्याकरिता तो सरसावला होता, व तेही अजून म्यानातून बाहेर न येता; पण अवाजवी श्रम होऊन तो थकून जाऊ नये अशी खऱ्याखुऱ्या प्रेमातून सहजगत्याच उद्भवलेली काळजी मला वाटू लागली, आणि हा मोह नाकारण्याइतका संयम तिनेच माझ्यात उत्पन्न केला: म्हणूनच मी त्याला कळकळीने म्हणाले, की आता तूही विश्रांती घे आणि मलाही दे; तेव्हा ह्या योजनेतून मी अल्पकाळ टिकेलसा शस्त्रसंधी जमवला; पण त्याला राजी होण्याआधी, मी न हरता मैदानातून मागे फिरतो आहे असं त्याने मला फुशारक्या मारीत सांगितलं. शिल्लक राहिलेली रात्र आणि दिवसाकडून उसनी घेतलेली पहाटेची धांदोटी आम्ही पुनर्मीलनाचा सोहळा अथकपणे साजरा करण्यात घालवली; सकाळी बऱ्याच उशीराने जेव्हा आम्ही उठलो तेव्हा झोपेचं तोंडही जरी पाहिलेलं नसलं तरीसुद्धा चांगले हुशार, चपळ आणि तरतरीत होतो; युद्ध जिंकल्याच्या आनंदातच ज्याप्रमाणे सैनिकांना विश्रांती, खाणंपिणं वगैरे सर्व काही पावतं, तेच काम आमच्याकरिता कामनापूर्तीच्या सुखांनी करून टाकलेलं होतं.

आता लँकेशायरला जाण्याचा प्रश्नच उरलेला नसल्यामुळे घोड्यांची तोंडं लंडनकडे वळवण्याच्या सूचना देण्यात आल्या, आणि ब्रेकफास्ट होताच आम्ही इन सोडून निघालो; पण त्याआधी, जो आनंद तिथे मला गवसला होता त्याबद्दलच्या कृतज्ञतेची प्रतीकं मी सढळ हाताने वाटली. कप्तान व माझी सोबतीण हे दोघे त्यांच्यासाठी मुद्दाम भाड्याने घेतलेल्या टांग्यात बसले, आणि मला व चार्ल्सला खाजगीत बोलता यावं म्हणून आम्ही दोघे माझ्या चार घोड्यांच्या बंद गाडीतून निघालो. रस्त्याला लागल्यावर काही वेळाने, माझ्या भावनांचा अंत:कल्लोळ पुरेसा शमलेला असताना, त्याच्यापासून ताटातूट झाल्यानंतर मला पत्कराव्या लागलेल्या आयुष्याची त्याला रीतसर कल्पना देऊ शकेन इतपत माझं मन ताळ्यावर आलेलं होतं: आणि याबद्दल माझ्याइतकाच तोही जरी हळहळला तरी त्याला धक्का असा फारसा बसला नाही; कारण मला ज्या परिस्थितीत तो सोडून गेला होता तिचा विचार करता हे त्याला पूर्ण

अनपेक्षित असणं शक्य नव्हतं.

पण यानंतर मी त्याला माझ्या सांपत्तिक स्थितीची कल्पना दिली, आणि त्याच्याकरिता माझ्यात स्वभावत:च असलेल्या प्रांजळ मोकळेपणाने म्हणाले, की हा पैसा तुला हवा तितका, हवा तसा घे. त्याने किती हरकत घेतली याचं यथार्थ वर्णन करण्याचा जर मी प्रयत्न केला, तर मी आपल्याच प्रेमिकाची तरफदारी करत्ये आहे असं तुम्ही म्हणाल; तेव्हा मी एवढंच खात्रीने सांगत्ये, की कसल्याही अटी मी घालीत नाही, तू वाटेल ते घे असा आग्रह करकरून मी त्याचा छळवाद मांडला असूनही, तो सरळसरळ नाही म्हणाला. पण तुझी ठेवलेली बाई म्हणून राहणं मी भाग्य समजत असताना माझ्याशी लग्न करण्याचा विचार करून तू खाली घसरतो आहेस, आणि केवळ पैशासाठी ह्या माणसाने अनाचाराला व नामुष्कीला कवटाळून स्वत:ची प्रतिष्ठा विकली असा (अन्याय्य का होईना) बट्टा लावून घेतो आहेस, अशी जेव्हा मी त्याची टीपेचा सूर लावून कानउघाडणी करीत राहिले; तेव्हा केवळ प्रेमामुळे माझ्यावर जडलेला त्याचा अधिकार वापरून शेवटी तो मला निक्षून म्हणाला, की हे कारण आता यापुढे मी ऐकून घेणार नाही.

प्रेमाच्या आग्रहामुळे सर्व आक्षेप मागे पडले, व माझं हृदय त्याच्यासमोर नेहमीच उघडं असल्यामुळे माझ्या मनातल्या भावनांचा खरेपणा त्याला सहजच वाचता आला; यामुळे आता तो पुरता जिंकला जाऊन आपलं पाणिग्रहण करायला त्याने मला भाग पाडलं, आणि ह्या अतिशय सुखी संसारामधून जी गोजिरी मुलं जन्माला आलेली तुम्ही पाहिली आहेत, त्यांच्या आयुष्यात अनुकूलता आणणाऱ्या इतर कित्येक गोष्टींबरोबरच, विशेष म्हणजे औरस असल्याची प्रतिष्ठा मला त्यांना देता आली.

अशा रीतीने मी सुखरूप बंदराला लागले; तिथे सदाचाराच्या स्तनाशी लागून राहून, जी एकमेव गोडी कधी नासत नाही ती मला चाखायला मिळाली: आणि माझ्या गतायुष्यामध्ये मला गुरफटून टाकणाऱ्या अतिचाराच्या दानवी प्रलोभनांची, दोषमुक्त राहिल्याने मिळणाऱ्या त्यांहून कितीतरी सरस अशा आनंदाशी जेव्हा मी तागडीतुलना केली, तेव्हा जे लोक केवळ बुदबुदणाऱ्या विषयवासनांत बुचकळ्या मारून, सुखप्राप्तीचा परममित्र आणि दुर्गुणाचा महारिपू असणाऱ्या सदाचाराच्या ऋजु आकर्षणांकडे डोळेझाक करतात, त्यांची व त्यांच्या अभिरुचीची कीव केल्याखेरीज मला राहवलं नाही. वासनांचे कोड पुरवल्यामुळे माणसं ज्या सुखांची गुलाम होतात, त्यांच्यावर संयमाने अधिसत्ता गाजवता येते: आरोग्य, शक्ती, वंशवृद्धी, आनंद, आणि जीवन सुखी करण्यासाठी जे जे इष्ट, त्या साऱ्याचा संयम हा पिता आहे; तर अनारोग्य, पंगुत्व, वंध्यत्व, आत्मघृणा, आणि मानवी स्वभावातील जे जे हिणकस, त्या साऱ्याची वासना ही माता आहे. दोन्ही अनुभवांचा साधकबाधक विचार

केल्यानंतर मला पटलेल्या व सत्यनिष्ठेने माझ्याकडून वदवून घेतलेल्या ह्या उपदेशाच्या शेपटाला कदाचित तुम्ही हसत असाल: इथे हे शोभत नाही आणि माझ्या स्वभावाशी हे जुळतही नाही, असं नक्कीच तुम्ही स्वत:शी म्हणत असणार; न जाणो तुमचं असंही मत होईल, की सद्गुणांच्या वेदीवरून निर्लज्जपणे ढापून आणलेल्या फाटक्यातुटक्या ओढणीने दुर्गुणांच्या भगतिणीला झाकून टाकण्याची ही फालतू हातचलाखी आहे: हा साराच आविर्भाव जणू काही वेषांतराच्या स्पर्धेमध्ये फक्त स्वत:चे जोडे बदलून सपाता घातल्यानंतर आपल्याला आता कोणीसुद्धा ओळखणार नाही अशी समजूत करून घेण्यासारखा आहे; किंवा एखाद्या बोरूबहाद्दराने राष्ट्रद्रोही मजकूर लिहिल्यानंतर स्वत:ची कातडी बचावण्याकरिता शेवटी राजाला उद्देशून स्तुतिस्तोत्र जोडण्यासारखा आहे.

पण माझी सचोटी व माझी समज यांविषयी तुमचं मत यापेक्षा बरं आहे अशी स्वत:ची खुशामत करून घेत असतानाच, नम्रपणाने मी हेही म्हणत्ये की असा ग्रह करून घेण्यामुळे माझ्यापेक्षाही सदाचारावर जास्त अन्याय होणार आहे: कारण त्यातून मिळणारी सुखं पापातून मिळणाऱ्या सुखांच्या तुलनेने फिकी पडतील, अशी धडधडीत खोटी भीतीच याच्या मुळाशी असू शकते असं माझं आपलं प्रांजळ आणि स्पष्ट मत आहे. सत्याचा लखलखीत प्रकाश पडताच तुम्हीच आपल्या डोळ्यांनी पाहाल, की पापातून मिळणारा आनंद सदाचाराला रुचणाऱ्या आनंदाच्या मानाने किती बेगडी, भिकार व हिणकस अभिरुचीचा असतो; सदाचारामुळे ज्या मनोभावना प्रज्वलित होतात त्यांमुळे ऐंद्रिय संवेदनांसाठी मिष्टखाद्य मिळत नाही असं तर नाहीच, पण अतिशय सुंदर चवीचं मिळतं; आणि याउलट अनाचार मात्र पंक्तीचा विचका करणाऱ्या बुभुक्षित कावळयांच्या थव्याप्रमाणे वागतात.

पापाच्या मार्गात क्वचित गुलाब विखुरलेले असतीलही, पण त्यांच्या बरोबरीने अतोनात काटे व किडेही माजलेले असतात हे सर्वज्ञात आहे: सदाचाराच्या मार्गात मात्र केवळ गुलाबच असतात, आणि ते कधी कोमेजत नाहीत. पूर्वग्रह न बाळगता जर तुम्ही माझा पक्ष समजावून घेतलात, तर सदाचारासमोर मी जे धुपारे जाळत्ये आहे त्या कृतीमध्ये विसंगती नाही असंच तुमचं मत पडेल. जर मी अनाचाराला तजेलदार आणि प्रसन्न रंगांनी चितारलं असेल, जर त्याला फुलांनी मढवलं असेल; तर ते फक्त यासाठी, की सदाचारासमोर त्याची आहुती देताना ती अधिक मोलाची व अधिक समारंभाची ठरावी म्हणून.

मिस्टर सी– ओ– यांना तुम्ही ओळखता; त्यांचा जमीनजुमला, पत आणि इभ्रत याबद्दल सारं तुम्हाला ठाऊक आहे: तेव्हा जर मी तुम्हाला त्यांच्याबद्दल सांगितलं, की आपल्या मुलाची नैतिक घडण उत्तम व्हावी अशी तळमळ वाटून, तो सदाचारी बनावा आणि अनाचाराविषयी त्याच्या मनात विचारांती

घृणा निर्माण होऊन ती पक्की बसावी याकरिता त्याला दीक्षा देण्याचं हलकं काम स्वत: पत्करून, लंडनमधल्या एकाहून एक नामांकित कुंटणखान्यांतून ते त्याला हात धरून घेऊन गेले; आणि अभिरुची शाबूत असलेल्या माणसाला ओकारी येईल अशी तिथे चालणारी इंद्रियसुखांची राडेराड त्याला आवर्जून पाहायला लावली; तर तुम्ही नावं ठेवाल? तुम्ही चिडून म्हणाल की हा प्रयोग फार धोक्याचा आहे. मूर्ख माणसावर केला तर आहे, पण मूर्खांची इतकी काळजी करायला हवीच का?!

आपण लवकरच भेटू; पण तोपर्यंत माझ्याविषयी तुमच्या मनात किल्मिष येऊ देऊ नका, आणि सदोदित मी आपल्या सेवेत राहीन अशी खात्री बाळगा.

आपली,

... ... ...

